श्रीगणेशाय नमः ॥ आत्मतत्त्वस्वप्रकाश सुविचार्य पुनः पुनः ॥ कुर्वेहं भाषया व्याख्यां गीताया कृष्णतुष्टये ॥ १ ॥ येषां संस्कृ
त भाषायामभ्यासो नास्त्यथापि च ॥ छंदोबद्धेषु ग्रंथेषु भाषया रचितेष्वपि ॥ २ ॥ तेषां गीतार्थबोधाय भाषया तन्निविस्तृ
त ॥ स्पष्टार्थं सुखबोधस्य दीपाय क्रियते मया ॥ ३ ॥ शास्त्रिणा रघुनाथेन रामचंद्रात्मजेन वै ॥ अनंतनीयनादेवो
भगवान् श्रीपतिः स्वराट् ॥ ४ ॥ अखंड सच्चिदानंद परिच्छेद विवर्जित ॥ श्रीकृष्णाख्य परधाम नदहं यानुपाश्रि
ति ॥ ५ ॥ भगवद्ध्यानमेवात्र विपदां भंजनं स्मृतं ॥ तृष्णानाशनं चैव नान्यदस्ति विमर्शितं ॥ ६ ॥ तथा युद्धाकर
स्येतत भयकृद्भयनाशनं ॥ अतस्मिन्नस्य स शास्त्रे प्रयासोऽयं मया कृतः ॥ ७ ॥ अत्र न्यूनोऽधिको वार्थो विरुद्धो वा
भवेद्यदि ॥ संशोध्य पंडितैरेव मदृशां जलि रर्थये ॥ ८ ॥ मीमांसान्याय पंचास्य राघवाचार्य सूरिणा ॥ शिष्यस्येयं
कृतिर्भूया द्रघुनाथस्य सन्मुदे ॥ ९ ॥ आत्मा स्वभावकरून सच्चिदानंदरूप आणि देशकाल वस्तूंचे जे परिच्छेद त्यां
हीकरून रहित अद्वितीय आणि असंगस्वरूप असा असताही अघटित घटना करणारी जी परमात्मशक्तिरू
प माया तिचे योगाने ईश्वर देव तिर्यक आणि मनुष्य इत्यादि अनंत जीवांचे स्वरूपाने भेदाभ्यास पावून उपास्योपास
क भावाप्रतही पावून या प्रपंचात नटतो ॥ या सर्व नटण्यास मायाच कारण आहे ॥ ती माया सत् किंवा असत् यातून
कोणत्याही स्वरूपाने वर्णन करण्यास शक्य नाही अशी जरी ती अनिर्वचनीय आहे आणि इंद्रियांस गोचर नाही
तथापि जशी वन्हीवरील दाहस्फोटास उत्पन्न करणारी शक्ति वन्हीपेक्षा पृथक प्रत्यक्ष दिसत नसता दाहस्फोटादि
क जी कार्ये होतात त्यावरून ती होते असे अनुमान होते। याप्रमाणे ज्याची रचना कशी होत असे मनात येण्यास
दुर्घट आहे असे जे जगरूप कार्य प्रत्यक्ष दिसते त्यावरून यास उत्पन्न करणारी अशी मूलकारणभूत ब्रह्माची शक्ति
आहे असे अनुमान होते। यावरून ही माया सिद्ध होते। परंतु तिचे स्वरूप पाहिले असता परब्रह्मस्वरूपाहून निराळे
नाही। परब्रह्माचेच सत्तेने ही आहे असते - अशा व्यवहारास योग्य होते ॥ या माया शक्तीने जीव आणि ईश्वर यांस

निर निराळें भासविलें आहे ॥ ते असें - ही माया सत्व रज तमो गुणांनी युक्त अशी त्रिगुणात्मक एकच आहे ॥ तथापि माया आणि अविद्या या भेदानें दोन प्रकारची आहे ॥ विशुद्ध सत्व म्हणजे रज आणि तम या गुणांनीं मलिन झालेला सत्वगुण त्याचे प्राधान्यानें तीस माया म्हणतात ॥ आणि मलिन सत्व म्हणजे रज आणि तम या गुणानीं मलिन झालेला सत्वगुण त्याचे प्राधान्यानें तीस अविद्या म्हणतात ॥ अविद्येस च अज्ञान असे म्हणतात ॥ मायेचे ठायी झालेला जो सच्चिदानंदरूप परब्रह्माचा प्रतिबिंब त्यास ईश्वर असें म्हणतात आणि अविद्येचे ठायीं झालेला जो परब्रह्माचा प्रतिबिंब त्यास जीव असे म्हणतात ॥ येथे बिंबप्रतिबिंब भाव जसा दर्पणात मुखाचा प्रतिबिंब होतो त्याप्रमाणें समजू नये ॥ मायारूप उपाधीचे संबधाने मायेवरील जे जगत्कर्तृत्वादिक धर्म त्याचें परब्रह्माचे ठायी भासणें आणि परब्रह्माचे सत्तेनें मायेवर भासणे। तसेच अविद्या किंवा तिचें कार्य जे अंत. करण बुद्ध्यादिक जीवाचे उपाधी त्यांवरील जे काम-संकल्प-कर्तृत्व भोक्तृत्वादिक धर्म त्याचे परमात्म्याचे ठायी भासणें। आणि परमात्म सत्तेनें आहे-भासतें-असें अविद्या अतःकरण इत्यादिकांवर सत्तादिकाचे भासणें-असा बिंबप्रतिबिंब भाव येथे समजावा ॥ माया प्रतिबिंब जो ईश्वर तो आपले उपाधिभूत मायेस आपले स्वाधीन ठेवितो ॥ मायेचे स्वाधीन आपण होत नाही-म्हणजे मायेने केलेलें जे-आपले स्वरूपाचे आवरण तेणे करून युक्त न होतां तो सर्वज्ञ-सर्व जगाचा कर्ता-नियंता असाच राहिला आहे ॥ अविद्या प्रतिबिंब जो जीव तो अविद्येचे स्वाधीन झाला आहे-म्हणजे अविद्येचे आवरणामुळे आपले सच्चिदानंद-अद्वय आणि असंग अशा स्वरूपाचे अज्ञानाने युक्त झाला आहे ॥ यास्तव तो अल्पज्ञ-परिच्छिन्न कर्ता-भोक्ता-संसारी-सुखी-दुखी असा झाला आहे आणि सत्वगुणाचे मालिन्याचे तारतम्यानें म्हणजे अधिक न्यूनपणानें तारतम्याप्रत पावलेली जी अविद्या तद्रूप उपाधीचे योगानें देव मनुष्य तिर्यगादि भेदानें प्रतिशरीरांत भिन्न भिन्न झाला आहे। अशी जी जीवेश्वराची प्रक्रिया आहे हीविषयी-जीव आणि ईश यांप्रत आभासे करून करते आणि आपण माया आणि अविद्या होते- अशा अर्थाची श्रुति प्रमाण आहे ॥

तो परमेश्वर जीवानें केलेले शुभाशुभ कर्माचें जें सुखदुःखानुभवरूप फल तें जीवास प्राप्त होण्यासाठीं आका-
शादिक पंचभूतें आणि त्यांचीं जीं देहेंद्रियादिक कार्यें यांची उत्पत्ति करून यामध्यें आपले सद्रूपानें किंवा-
आपला जो अंश जीव त्याचे स्वरूपानें प्रवेश करतो ॥ जीव तर मायेनें केलेले आवरणामुळें आपले सच्चिदानंद अ-
द्वय आणि असंग अशा स्वरूपाचे विस्मृतीनें अविद्या आणि तिचें कार्य जें अंतःकरण बुध्यादिक त्यांचे ठायीं
तादात्म्याच्या अभिमानानें त्यावशात् कर्तृत्व भोक्तृत्वादिक धर्म आपणावर मानून शुभाशुभ कर्मानुष्ठान करू-
न त्याचे फलोपभोगासाठीं कर्मानुसार देव मनुष्य तिर्यगादिक योनींचे ठायीं जन्मास येऊन मरण पावावें अ-
शा संसारचक्राच्या प्रवाहांत पडून सुखदुःखानुभवरूप कर्मफलें भोगितो ॥ याप्रमाणें संसारचक्रांत भ्रम-
ण करीत असतां त्यास कधींही विश्रांति प्राप्त होत नाहीं ॥ हा संसार जो जीवास झाला आहे हा वास्तविक न-
स्तून जसा जीव जागृदवस्थेंतील आपले मनुष्यादिक स्वरूपाचे अज्ञानामुळें पाहिलेले ऐकिलेले जे पदा-
र्थ त्याविषयींचे मनोधर्मानें स्वप्नकाळीं त्याचे योगानें मी इंद्र राजा गज अश्व खर झालों असे अनेक प्रकार-
चे प्रसिद्ध स्वप्न पाहतो त्याप्रमाणेंच आपले सच्चिदानंद अद्वय आणि असंग अशा स्वरूपाचे अज्ञानामुळें-
मी उत्पन्न झालों। माझा जनक। ही माझी माता। हे माझे गृहक्षेत्रादिक। ही माझी स्त्री। हे माझे पुत्रादिक। हें माझें कु-
ल। हे माझे शत्रु। हे माझे मित्र। हें माझें धन। ही माझी विद्या। हे माझे सुहृत्। हे माझे बांधव। असें स्वप्न अविद्या-
रूप निद्रेंत पाहतो - आणि संसारचक्रांत भ्रमतो ॥ या सर्व अनर्थास मूळ अविद्याच आहे - जी स्वरूपाचें अ-
ज्ञान असें म्हणतात ॥ प्रसिद्ध स्वप्नाची निवृत्ति जशी जागृत होऊन आपले मनुष्यादिक स्वरूपाचें यथार्थ ज्ञानावि-
वाय होत नाहीं तशी या अविद्यारूप निद्रेंत जीवास जो संसारभ्रमणरूप स्वप्न झाला आहे त्याची निवृत्ति आपलें-
जें वास्तविक सच्चिदानंद अद्वय आणि असंग असें स्वरूप त्याचे बोधाशिवाय होत नाहीं वास्तव परमेश्वराचें जें

ज्ञानें केलेलें जें स्वकर्मानुष्ठान तेणें करून चित्तशुद्धि होऊन तद्द्वारा आत्मस्वरूपाचे यथार्थ ज्ञानाविषयीं इच्छा होऊन गुरूस शरण होऊन गुरूपासून महावाक्याच्या उपदेशें करून ब्रह्मात्मतत्त्वसाक्षात्कार झाल्यानंतर अविद्येची निवृत्ति होऊन आपलें जें सच्चिदानंद अद्वय आणि असंग असें स्वरूप तेणें करून स्थिती होणें - असा जो धर्मार्थकाममोक्षरूप चतुर्विध पुरुषार्थीमध्यें मुख्य मोक्षरूप पुरुषार्थ - त्याची प्राप्ति होऊन जीवानें कृतकृत्य व्हावें यासाठीं कर्म उपासना आणि ज्ञान एतद्रूप सर्व त्रिकांड वेद प्रवृत्त झाले आहेत ॥ त्यांत कर्मकांडांत जीं कर्में सांगितलीं आहेत त्यांचें परमेश्वराचे उद्देशानें अनुष्ठान करून चित्त शुद्ध झालें म्हणजे परमेश्वराचे प्रसादानें या लोकचे आणि स्वर्गादिक लोकचे जे विषयसुख ते सर्व नाशवंत आहे व आत्मस्वरूपसुख हेंच नित्य आहे आणि ते सच्चिदानंदरूप आहे। त्यासच मोक्षसुख म्हणतात। असा नित्यानित्यवस्तुविवेक उत्पन्न होऊन या लोकांतील आणि ब्रह्मलोकापर्यंत जे स्वर्गादिक लोक त्यांतील सुखाचे भोगाविषयीं विराग म्हणजे वैराग्य उत्पन्न होतें ॥ नंतर शमदमादिक जीं साधनें तीं उत्पन्न होऊन सच्चिदानंद ब्रह्मस्वरूप जो स्वात्मा त्याचें अपरोक्ष म्हणजे प्रत्यक्ष ज्ञान व्हावें अशी इच्छा उत्पन्न होते ॥ त्या इच्छेसच विविदिषा असें म्हणतात ॥ ती उत्पन्न झाल्यावर ब्रह्मात्मतत्त्वज्ञान होण्यासाठीं वेदवेदांत वेत्ता जो गुरु त्यास शरण जाऊन गुरुपासून वेदांतश्रवण करावें ॥ वेदांताच्या आदिमध्यांताचा चांगला विचार केला म्हणजे सर्व वेदांताचें अद्वितीय आणि सच्चिदानंदात्मक ब्रह्मस्वरूप जो आत्मा त्याचें प्रतिपादन करणें याविषयींच मुख्य तात्पर्य आहे असा जो निश्चय त्यास उत्पन्न करणारी - जी मनाची विचाररूप क्रिया तीस वेदांतश्रवण म्हणतात ॥ अशाप्रकारें गुरूपासून श्रवण झालें म्हणजे कर्मकांडांत शाखाभेदानें किंवा काम्यफलभेदानें जसा कर्मस्वरूपाचा भेद सांगितला आहे - तो असा - होत्र ऋक्‌शाखीयानीं करावें। आध्वर्यव यजुःशाखीयांनीं करावें। औद्गात्र सामवेदीयांनीं करावें। असा कर्मभेद शाखाभे

दाने आहे॥ पुत्रकामाने पुत्रेष्टी करावी। वृष्टीची इच्छा जास आहे त्याणी कारीरीनामक इष्टी करावी। ज्यास इंद्रियाची
इच्छा आहे त्याणी दधिरूप द्रव्याने अग्निहोत्र होम करावा। असा फलभेदाने कर्मभेद आहे॥ त्याप्रमाणे वेदांत प्रतिपा-
द्य वस्तुचा भेद नाही ॥ सर्व वेदांताचे तात्पर्य एकच अद्वितीय ब्रह्मात्मतत्व प्रतिपादन करण्याचे आहे असा सांगि-
तलेले वेदांतश्रवणाने निश्चय होतो ॥ हे श्रवण जीव प्रधान म्हणजे प्रकृति आणि ब्रह्म यातून कोणते कोणत्या वाक्या-
चे प्रतिपाद्य आहे असा संशय होण्याजोगी जी वेदांतातील वाक्ये ती विचारात घेऊन त्याविषयी संशय दूर करून-
आणि सिद्धांत हा दाखवून त्यास ते ब्रह्मसूत्राचे प्रथम अध्यायात सविस्तर निरूपिले आहे॥ या प्रथमाध्यायास समन्वया-
ध्याय असे म्हणतात॥ सांगितलेले प्रकारचे वेदांतश्रवणाने अद्वितीय सच्चिदानंद परब्रह्मस्वरूप आत्मत-
त्व च सर्व वेदांत प्रतिपाद्य आहे असा जरी निश्चय झाला तरी मी कर्ता भोक्ता संसारी सुखी दुःखी असा कर्तृ-
त्व भोक्तृत्वादिक धर्मांनी युक्त असे आत्मस्वरूप प्रतीतीस येते। ते आत्मस्वरूप अकर्ते अभोक्ते असंग अ-
द्वितीय असे कसे होईल असी त्या श्रवण केलेले अर्थावर असंभावना होते॥ यामुळे श्रवणापासून झालेला जो
अद्वितीय ब्रह्मात्मत्वाचा तो दृढ होत नाही॥ यास्तव श्रुतार्थावर गेली असंभावना दूर होऊन त्याविषयीचा निश्चय
दृढ होण्यासाठी त्याचे मनन करावे असा वेदांतात श्रवणानंतर मननाचा उपदेश केला आहे॥ मनन म्हणजे श्रुता-
र्थाचे युक्तीहीं करून अनुचिंतन करणे॥ ते केले म्हणजे पूर्वोक्त असंभावना निवृत्त होते॥ तो असी - जरी मी क-
र्ता भोक्ता असे कर्तृत्व भोक्तृत्वादिक धर्म आत्म्यावर प्रतीतीस येतात तथापि ते वास्तविक आत्म्यावर नाही-
त॥ कर्ता भोक्ता हे आत्म्याचे वास्तविक स्वरूप नाही॥ कर्तृत्व भोक्तृत्वादिक मनाचे वृत्तिरूप धर्म आहेत असे
श्रुतीत सांगितले आहे आणि ते जेव्हा मन आहे तेव्हाच हे भासतात। सुषुप्तिकाली मनाचा लय झाला म्हणजे हे प्रती-
तीस येत नाहीत॥ आत्मस्वरूप तर सर्व अवस्थेत प्रतीतीस येते॥ यास्तव अन्वयेकामुळे जीवास जो मनाचे

यींना तादात्म्य भ्रम झाला आहे त्यामुळे मन बुद्धि इत्यादिकांवरील जे कर्तृत्वादिक धर्म ते तो आपले ठायी मानितो आणि मी कर्ता भोक्ता असा व्यवहार करितो ॥ जसा तप्त लोहाचा गोळा आणि वन्हि यांचे अभेद ज्ञानाने लोहच जाळते असा दग्धृत्व व्यवहार लोहावर होतो किंवा जलावर गंधन मनोहर गंधयुक्त जे पृथिवीचे अवयव त्यांचे संबंधाने जलावर-हें सुगंधित आहे-असा व्यवहार होतो तसाच हा वरचा व्यवहार होतो ॥ विवेके करून मी मन बुद्धि इत्यादिकांपेक्षा भिन्न आहें असे ज्ञान झाले म्हणजे आपलें स्वरूप कर्तृ भोक्तृ नाहीं। अकर्तृ अभोक्तृ आणि सच्चिदानंदात्मक ब्रह्मरूपच आहे असा दृढ निश्चय होऊन पूर्वोक्त असंभावना नाहींशी होते ॥ या प्रकारचे मनन व्यासांनी ब्रह्मसूत्रांतील द्वितीयाध्यायात सविस्तर निरूपिले आहे ॥ या अध्यायास अविरोधाध्याय असे म्हणतात ॥ या प्रकारचे मननानें श्रवण केलेल्या अद्वितीय ब्रह्म तत्त्वाविषयींची असंभावना जरी निवृत्त झाली तरी कोट्यावधि जन्माचे ठायीं झालेली जी मनदेहादिकांवरील मी मनुष्य गौर ब्राह्मण मी कर्ता भोक्ता इत्यादिक विपरीत भावनात्मक बुद्धि तिचे दृढ अभ्यासाचे-संस्कारामुळे देह मन इत्यादिकांवरील आत्मत्व बुद्धि आणि आत्म्यावरील कर्तृत्वादि विषयींची बुद्धि निवृत्त होत नाहीं ॥ ती पुनः पुन उत्कट संस्काराने उत्पन्न होते यास्तव ती विपरीत बुद्धि न होण्यासाठीं मननानंतर निदिध्यासन करावें असा वेदांतांत उपदेश केला आहे ॥ ध्येयाकार जी अंतःकरण वृत्ति तीमध्ये अन्यविषयाकार वृत्तींचा समावेश न होतां जो परमात्माकार वृत्तींचा निरंतर प्रवाह त्यास निदिध्यासन म्हणावे ॥ यासच ध्यान असें म्हणतात ॥ हें निदिध्यासन चित्तशुद्धि होऊन मनाची एकाग्रता झाल्याशिवाय होत नाही ॥ यास्तव कर्मे करून चित्तशुद्धि झाल्यावर सगुण परमेश्वराचे ध्यान करण्याविषयी उपदेश केला आहे ॥ त्या ध्यानास च उपासना असे म्हणतात ॥ त्या सगुण परमेश्वराचे उपासनेने परमेश्वररूप ध्येय वस्तूकडे मनाची एकाग्रता करण्याचा अभ्यास झाला म्हणजे ध्यानरूप जे निदिध्यासन ते साध्य होतें ॥ ते निदिध्यासन सांगितलेले श्रवण आणि मनन ज्या-

नीं केले नाहीं त्यास उपनिषदांत ज्या सगुण ब्रह्माच्या उपासना सांगितल्या आहेत त्यांचे अभ्यासानें प्राप्त होते ॥ ज्यांनी सगुण ब्रह्मोपासन केले नाही त्यास श्रवण मनना नंतर केलेल्या ब्रह्माभ्यासानें प्राप्त होते ॥ त्या अद्वितीय सच्चिदानंदासंग ब्रह्मात्मतत्वाचे गुरुपासून श्रवण केले आहे त्याच परस्पर एकमेकास वादकथारूप संवादानें कथन करणें आणि त्यांचेच निरंतर चिंतन करणें - किंवा त्या तत्वाचा दुसऱ्यास उपदेश करणें आणि आत्मतत्वाशिवाय दुसऱ्या विषयाचे मनात चिंतन न करणें - किंवा त्याविषयींचे शब्द न बोलणें आणि निरंतर आत्मतत्वाविषयींचेच चिंतन करणें - किंवा शब्द बोलणें - यास ब्रह्माभ्यास असें म्हणतात ॥ हें निदिध्यासन व्यासांनी ब्रह्मसूत्राचे तृतीया ध्यायांत सविस्तर निरूपिलें आहे ॥ अशा प्रकारच्या निदिध्यासनानें देहादिकांवरील जी आत्मत्वबुद्धि रूप विपरीत भावना तिची निवृत्ति झाल्यानंतर गुरूपदिष्ट महावाक्यापासून सच्चिदानंद अद्वितीय आणि असंग जें ब्रह्म तें मीच आहे असा अनुभवात्मक साक्षात्कार होऊन त्यानें योगानें सर्व अनर्थांस मूळकारण जी अविद्या तिची निवृत्ति झाल्यानंतर आपले सच्चिदानंदात्मक असंग ब्रह्मस्वरूपानें स्थितिरूप मोक्ष जो त्यास प्राप्त होऊन तो कृतकृत्य होतो ॥ हाच मुख्यार्थ सर्व वेदांतांत सांगितला आहे ॥ त्याचेंच सविस्तर प्रतिपादन वेदव्यासांनी ब्रह्मसूत्रांतचार अध्यायांनीं केलें आहे ॥ हा अर्थ सर्व वेदांताची उत्तम विचाररूप जी मीमांसा तीणें करून साध्य आहे ॥ परंतु ज्यांस मीमांसा समजण्यास साधनभूत जी तर्क सांख्य आणि योग इत्यादि शास्त्रें त्यांचे अध्ययन नाही त्यांस तो समजणें दुर्घट आहे आणि जे मंदमति आहेत त्यांसही समजणें दुर्घट आहे । यामुळें त्यास तत्वज्ञान होऊन मोक्ष होणार नाही ॥ यास्तव वेदव्यासांनी महाभारतांत श्रीकृष्ण आणि अर्जुन यांचा संवादरूप जें अष्टादशाध्यायात्मक गीताशास्त्र त्यांत सकल भरीतीनें अर्जुनानें प्रश्न करावा आणि भगवतांनी त्यांचे उत्तर सांगावें अशा प्रकारानें तो अर्थ सर्व निरूपिला आहे ॥ या गीताशास्त्रांत त्रिकांड वेद प्रतिपाद्य जी कर्म उपासन आणि ज्ञानही

तें न ही यथार्थ समजावें या साठीं तो प्रथमाध्यायापासून साहा अध्याया पर्यंत कर्म। साहाव्या अध्यायापासून बारा अध्याया पर्यंत भगवद्भक्ति रूप उपासना। आणि बाराव्या अध्यायापासून अठरा अध्याया पर्यंत ज्ञान - अशी प्रश्नोत्तर रूपानें भगवंताचे बोलण्यात त्याची निरनिराळी स्वरूपें - आणि त्याची निरनिराळी साधने - आणि त्याचीं निरनिराळी फळें सांगून निरूपिलीं आहेत ॥ कर्म आणि ज्ञान याचा समुच्चय म्हणजे अनुष्ठान ते एक कालीं संभवत नाहीं या स्तव प्रथमचे आणि शेवटचे अध्याय षट्कात त्याचे निरूपण केले आहे ॥ भगवद्भक्तीचे कर्म काली आणि ज्ञान काली अनुष्ठान संभवते या स्तव दोहोंच्या मध्ये मध्यम षट्कांत तिचे निरूपण केले आहे॥ ती भगवद्भक्ति कर्म मिश्र ज्ञान मिश्र आणि शुद्ध अशी तीन प्रकारची आहे ॥ त्यात प्रथम षट्कात कर्म आणि कर्मत्याग याच्या निरूपणाने महावाक्यांतील त्वं पदाचा शुद्धात्म रूप अर्थ निरूपिला आहे ॥ आणि त्याची उपपत्ती ही सांगितली आहे ॥ द्वितीय षट्कांत भगवद्भक्तीचे निरूपणाने तत्पदार्थ जो परमानंद भगवान त्याचे स्वरूपाचें निरूपण केले आहे ॥ तिसरे षट्कात त्वंपदार्थ आणि तत्पदार्थ यांचे ऐक्य रूप महावाक्यार्थीचे निरूपण केले आहे॥ या प्रमाणे तीन षट्कांचा परस्पर संबंध आहे॥ प्रत्येक अध्यायाचा संबंध तेथें तेथें सांगू॥ या प्रमाणे त्रिकांड वेदाचा सर्व अर्थ यांत सांगितला आहे ॥ या स्तव हें गीता शास्त्र सर्व उपनिषदात्मक च आहे - आणि उपनिषदा प्रमाणेच साक्षात् परमेश्वर जो कृष्ण त्याचे मुखातून निघाले आहे ॥ यास प्रमाण ॥ गीता सुगीता कर्तव्या किमन्यैः शास्त्रविस्तरैः ॥ या स्वयं पद्मनाभस्य मुखपद्माद्विनिःसृता ॥ असें पुराण वाक्य आहे ॥ या गीता शास्त्राचें पठनाचे फल - अध्येष्यते च परम धर्म्यं संवादमावयोः ॥ ज्ञान यज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः - एणे करून अठराव्या अध्यायांत - परमेश्वराने च सांगितलें आहे ॥ या गीता शास्त्राचें पठन करण्याचा पुष्कळ संप्रदाय सर्व देशांत चालला आहे - परंतु गीता शास्त्रांत जो सर्व उपनिषदांतील रहस्यार्थ सांगितला आहे - त्याचें जर यथार्थ ज्ञान नाहीं तर गीता शास्त्राचें मुख्य प्रयोजन जे जी

वास आत्मतत्त्वज्ञान होऊन मुक्त होणें ते - केवळ पठनानें होणार नाहीं म्हणून रहस्यार्थज्ञान अवश्य पाहिजे ॥ गीताशा स्त्रांतील रहस्यार्थ समजावा यासाठीं - त्यावर श्रीमत् शंकराचार्यांनी भाष्य केलें आहे आणि चतुर्धर मधुसूदन स रस्वती श्रीधरस्वामी प्रभृतींनी अद्वैत मताचे अनुरोधानें व्याख्या केल्या आहेत ॥ परंतु त्या सर्व ही संस्कृत भाषेंत- असून वादविवाद रूप आहेत - आणि न्याय मीमांसादिक जीं शास्त्रें त्याच्या त्या परिभाषा त्यांनीं भरल्या आहे त ॥ यामुळें त्या समजण्यास संस्कृत भाषेचा चांगला अभ्यास असून न्याय मीमांसा सांख्य योग इत्यादि शास्त्रां चें अध्ययन पाहिजे ॥ सांप्रतनर तर्कादिक शास्त्राचे अभ्यासाचे कारमान मिकच आहे ॥ यामुळें - कांहींदिवसांनीं तीं शास्त्रें सांगणार व पढविणार दुर्मिळच होणार. तेव्हां त्या शास्त्राचे सहायानें - गीतार्थ - त्या टीकांवरून समजणें दु र्घट होईल ॥ आतां या गीताशास्त्रावर - वामनादिक पंडित तीनी त्या समश्लोकी व्याख्या प्राकृत भाषेंत केल्या आहेत त्यांत कविताहाच मुख्यगुण आहे ॥ त्यांत श्लोकांतील तात्पर्य - किंवा पूर्व श्लोकाचा दुसरे श्लोकाशीं - किंवा पूर्वी ध्या- याचा दुसरे अध्यायाशीं संबंध सांगितला नाहीं ॥ तसाच कोठें कोठें श्लोकाचा अर्थ विरुद्ध दिसतो किंवा कोठें कोठें पूर्वापर विरोध दिसतो तो उघड करून त्या विरोधाचा परिहार केला नाहीं ॥ याप्रमाणेंच दुसऱ्या कित्येक कविता रूप टीका झाल्या आहेत ॥ त्यांत ही प्रतिश्लोकांतील निरनिराळ्या पदांचा अर्थ करून मागचा पुढचा संबंध स्पष्ट सांगितला नाहीं आणि पूर्वापर विरोधाचा परिहार ज्या रीतीनें संस्कृत टीकांत करतात त्या रीतीनें केला नाहीं ॥ यामुळें पदच्छेद करावा - अन्वय दाखवावा - समस्तपदांचा विग्रह करून दाखवावा - आक्षेप करून त्याचा परिहार करा वा - असें जें व्याख्यानाचें म्हणजे टीकेचें लक्षण सांगितलें आहे ते त्यांत नाहीं ॥ यास्तव वरती सांगितल्या सं स्कृत टीकांत ज्याप्रमाणें गीताशास्त्राचा अर्थ वर्णिला आहे आणि ज्याप्रमाणें पदपदार्थ केला आहे आणि ज्याप्र माणें पूर्वापर श्लोकाची किंवा पूर्वापराध्यायांची संगति सांगितली आहे आणि ज्याप्रमाणें विरोधाचें उद्घाटन

करून त्याचा परिहार केला आहे त्याप्रमाणे गीताशास्त्र पठन करणारास त्याचे अर्थाचे यथार्थ ज्ञान व्हावे - आ-
णि कर्म उपासना आणि ज्ञान याचे वास्तविक स्वरूप समजावें आणि ब्रह्मात्म साक्षात्कार होऊन त्यांनी या ज-
न्ममरणांतून मुक्त व्हावे - याहेतूने - आणि या गीताशास्त्रावरील संस्कृत आणि प्राकृत टीका आहेत त्यांहीकरून
गीताशास्त्रार्थाचे ज्ञान सर्वांस जरी होईल तरी - यइदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ॥ भक्तिं मयि परां कृत्वा मामे-
वैष्यत्यसंशयः - या वाक्यें करून - या गुह्यतम गीताशास्त्रार्थाचे निरूपण माझे भक्तांस जो करील - त्यास माझी भ
क्ति प्राप्त होऊन ज्ञान द्वारा माझी प्राप्ति होईल असे भगवंतांनी जे फळ सांगितलें आहे त्याप्रमाणे - प्रत्येक भगवद्भक्ता
स गीताशास्त्रार्थाचे निरूपण माझ्याने होणार नाही। याकरिता प्राकृत भाषेत व्याख्यान केले असता ते व्याख्यान जे अधि
कारी पाहतील त्यांस मीच गीताशास्त्रार्थाचे कथन केलें असे होऊन त्या योगाने परमेश्वर भक्ति मला प्राप्त होई
ल आणि मी जा दुःख प्रवाहात पडलों आहे त्यापासून परमेश्वर माझा उद्धार करून मला जीवन्मुक्त करतील या
स्वार्थासाठी - आणि माझी फक्त इ वाणी याव्याख्येचे संबंधानें अतिपवित्र जे भगवदुक्त गीताशास्त्र त्यास संगत-
झाल्यामुळे - जसें गांवांतील स्वल्प उदकाचे ओहोळ गंगेस मिळाल्ले तर अतिपवित्र जें गंगाजल तद्रूपच पवित्र हो
तात - त्याप्रमाणे माझी वाणी पवित्र होईल यासाठी - मी पर्वते त्युप नामक रामचंद्र पुत्र रघुनाथ शास्त्री यानें ही
भाषा विवृति या नावाची गीताशास्त्राची व्याख्या केली आहे ॥ हीव्याख्या जास गीता शास्त्र पठन करण्याचा अधि
कार आहे असे जे ब्राह्मण क्षत्रिय वैश्य रूप तीन वर्ण त्यांनी स्वत वाचून अर्थ समजावयाजोगी झाली - आणि
शूद्रांस गीताशास्त्र पठन करण्याचा अधिकार नाही - त्यांस - ब्राह्मण पुरोभागी करून त्याचे उद्देशाने चारही
वर्णांस भारतादिकाचे श्रवण करावे। असे - श्रावयेच्चतुरो वर्णान् कृत्वा ब्राह्मणमग्रतः - इत्यादिके करून पुराणा
त सांगितले आहे त्याप्रमाणे - ब्राह्मणाचे मुखाने अर्थ ऐकून समजावयाजोगी झाली असे परमेश्वराने करावें ॥

आता लोकांत याच्या ग्रंथाचा पाहण्याचा प्रचार ब्राह्मण यांनीच जो भगवंत अमर्त्यांस टीका दाखवून त्यातून अं-
लंत पूर्ण करून तिचा लोकांस फार उपयोग व्हावा असा मी परमेश्वरास आणि त्याचे जे भक्त दयाळु निर्मत्सर प
डित यास साष्टांगपूर्वक प्रार्थना करून या भाषाविवृति नामक व्याख्येचा आरंभ करतो ॥ उपोद्घात समाप्त ॥
अनादि जी अविद्या तिच्या योगाने झालेला जो संसाररूप दुःखभ्रम त्याचे तापाने संतप्त झालेले जे शरणागत भ-
क्तजन त्यांची जी अविद्यारूप निद्रा तिचे नाशाविषयी बहु परिकर - आणि शोभायमान ज्या नखांच्या कांति
त्याही करून किर्मिरवर्ण ज्याचे रथस्थ आसन झाले आहे असा - आणि रसातळी गेलेली जी पृथिवी तिचा
रथ दाढांनी उद्धार करते समर्था ज्याचे शरीरास मोठे मोठे पर्वतांचे घर्षण झाले आहे असा - आणि वराहरूपा
ने पृथिवीचे उद्धरण करते समर्था ज्याचे दंष्ट्रेचे अग्रभागी सकल पर्वत समूह स्थित झाला आहे असा - आ-
णि आपले पराक्रमाने ज्याने त्रैलोक्याचे आक्रमण केले आहे असा - आणि प्रबल बाहू करून उचललेला जो गो
वर्धन पर्वत तद्रूप छत्राने - इंद्राने अकाळी करविलेली जी प्रलय कालासारख्या मेघाकडून वृष्टि तिचे निवारण
ज्याने केले आहे असा - आणि त्या वृष्टीने त्रास पावलेले जे सर्व गोकुळ त्याचे संरक्षण करून त्याचे योगाने सर्व जगास ज्या
ने विस्मययुक्त केले आहे असा - आणि त्रास पावलेला जो हिरण्यकशिपु नामक दैत्य त्याचे हृदयस्थलाचे विदार-
ण करण्याविषयी अकुंठित अशी जी नखे ती ज्यास आहेत असे जे हस्त त्यांच्या अंजलिपुटातून पडलेला जो
रक्त प्रवाह तद्रूप समुद्रात त्रैलोक्य ही ज्याने मग्न केले आहे असा - आणि त्रिभुवनाचे शत्रु जे मधुकैटभना
मक दैत्य त्यांच्या दृढ ज्या अस्थि त्यांचे पर्वतप्राय समुच्चयावर ज्याचा प्रभाव व्यक्त झाला आहे असे जे सुद
र्शन त्याचा प्रकाश ज्याचे भुजावर आहे असा - आणि चंद्रमौलि जो महादेव त्यास मोठा प्रिय - आणि अति
प्रबल बाहुदंडाने भ्रमविलेला जो मंदराद्रि पर्वत तेणेकरून क्षुब्ध झालेला जो क्षीर समुद्र त्यापासून उत्प

न्न झालेली जी लक्ष्मी तिच्या आलिंगनें करून चिन्हें न्ननांवरची जीपत्रावली म्हणजे वेलबुटी ती ज्याचे विशाल वक्षस्थलावर उठली आहे असा- आणि मोठ मोठ्या मुक्ताफलाचा जो हार त्याच्या प्रभेनें देदीप्यमान आहे कंठ ज्याचा असा- आणि आपल्या भक्तांचा जो समार मोह त्यातें आपल्या स्वरूपाचे तत्वावबोधानें नाशकरणारा असा- आणि लीलेनें ज्यानें अवतार घेतले आहेत असा- जो श्रीकृष्ण परमात्मा त्यानें- आत्मस्वरूपाचे अज्ञानामुळे प्रवृद्ध झालेले जे शोक आणि मोह त्यांमुळे युद्धरूप स्वकीय धर्म टाकावयास उद्युक्त झालेला जो अर्जुन त्यास- धर्म आणि आत्मतत्व याचा जो उपदेश तद्रूप नौकेनें शोकमोहरूप जो समुद्र यापासून तारिलें॥ श्रीकृष्ण भगवंतानें- स्वभक्त जो अर्जुन त्यास सांगितलेला जो तत्वार्थ तो सर्वज्ञ वेदव्यासानें शतशः श्लोकांनी महाभारतीं भीष्मपर्वांत श्रीकृष्ण आणि अर्जुन यांचे प्रश्नोत्तररूप संभाषणानें लिहिला आहे॥ श्रीकृष्ण भगवंताचा- अतिप्रिय सकलविद्यापारंगत आणि ज्ञानी जो अर्जुन तो युद्धांतील सर्व गुणदोष जाणून- आणि युद्ध हा आपला धर्म आहे असें समजून प्रश्न झाल्यावर- स्वधर्म त्याग करण्यास उद्युक्त झाला असें संभवत नाहीं॥ शत्रूस- मारल्यावर राज्यप्राप्ति होईल परंतु आपले बध्वादिक मारावे लागतील अशाप्रकारचे युद्धांतील सर्वगुण दोष अर्जुनास माहित होते- असे- भारताचे उद्योग पर्वांतील कथासंदर्भानें स्पष्ट आहे॥ तें असें- उद्योगपर्वीं जेव्हां श्रीकृष्ण मध्यस्थी करण्यास कौरवांकडे चालले तेव्हां पांडवांचे मनांत- युद्ध आणि साम यांतून कोण ते करावें असें आहे- हे समजण्याकरितां त्यांनीं प्रत्येकास विचारल्यावरून प्रत्येकानें आपआपला- अभिप्राय सांगितला॥ त्यावेळेस- अर्जुनानें जो आपला अभिप्राय सांगितला त्यांत युद्धांतील सर्वगुण आणि सर्व दोष यांचें चांगलें कथन करून युद्धांत भीष्मादिक मारावे लागतील यास्तव साम करावें असा आपला अभिप्राय सांगून नंतर सर्वज्ञ आणि आमचा हितकर्ता तूं आहेस- तुला योग्य दिसेल ते कर असें सांगितलें।

नंतर भगवान परत आल्यावर श्रम होत नाहीं असें स्पष्ट समजल्या वर सर्व गुण दोष माहित असतां युद्ध हा आपला धर्म आहे असें मानून युद्धा विषयीं प्रवृत्त झाला असे असतां मग मी युद्ध करीत नाही असें अर्जुन कसे बोलेल या स्तव याचे तात्पर्य निराळे आहे असे कोणी वर्णितात ॥ ते असें- वेदव्यास सर्व वेदांतील अर्थ भारतांत लिहिण्यास प्रवृत्त होऊन त्यानी सर्व उपनिषदाचा अर्थ या गीता शास्त्रात वर्णिला आहे ॥ अर्जुन जेव्हां युद्ध समयीं मोह पाऊन स्वधर्म त्याग विषयीं उद्युक्त झाला तेव्हा या शास्त्राचा उपदेश साक्षात् भगवान कृष्णानें अर्जुनास केला आणि तेणे करून अर्जुनाचे शोक मोह जाऊन अर्जुन कृतार्थ झाला अशा प्रकारची या गीता शास्त्राची प्रशंसा करण्या साठीं महाभारतांत युद्ध प्रसंगाचे प्रस्तावनेत हा संवाद व्यासानी वर्णिला आहे ॥ असे पुष्कळ संवाद विद्यांचे स्तुत्यर्थ आहेत ॥ उपनिषदांत - जनक आणि याज्ञवल्क्य यांचा संवाद असाच आहे ॥ तो खरोखरी झाला आहे असे नाहीं ॥ तो केवळ ग्रंथाचे स्तुत्यर्थ आहे ॥ तसाच हा ही संवार गीता शास्त्राचे स्तुत्यर्थ आहे ॥ असो ॥ कसेंही तात्पर्य कोणी वर्णो परंतु गीता शास्त्र हें अति पवित्र जी सर्व उपनिषदें त्याचे रहस्य आहे ॥ या स्तव त्याचे पठन पूर्वक अर्थ श्रवण मुमुक्षूनीं केलें असता सर्व संसाराची मूलभूत जी अविद्या तिची निवृत्ति करणारे जे ब्रह्मात्मतत्व ज्ञान ते होऊन मोक्षफल भगवंताचे प्रसादाने होईल यांत संशय नाहीं ॥

॥ मंगलाचरण समाप्त ॥ ॥ ॥

आतां गीताशास्त्रांत श्रीकृष्ण आणि अर्जुन यांचा संवाद जो झाला त्याचा प्रस्ताव करण्याकरितां प्रथम कथा सांगतात ॥ धृतराष्ट्र बोलतो ॥ हे संजया - धर्मक्षेत्र म्हणजे यज्ञादिक कर्म झाल्यामुळे पुण्यास उत्पन्न करणारें असें जें - जेथें मरणसमयीं तारक ब्रह्मोपदेश करून महादेव जीवास ब्रह्मप्राप्तिरूप मोक्ष देतात त्यास अविमुक्त कुरुक्षेत्र आणि ब्रह्मसदन असें म्हणतात - असें जें वेदप्रति पाद्य कुरुक्षेत्र त्याहून निराळें जें कर्मकांडांत यज्ञभूमि म्हणून मागितलेलें कुरुदेशांतील - कुरुक्षेत्र तेथें एकत्र मिळालेले आणि युद्ध करण्याची ज्यांची इच्छा आहे असे मामक म्हणजे माझे पुत्र दुर्योधनादिक - आणि पांडव म्हणजे पंडूचे पुत्र हे काय करते झाले ॥ पूर्वीं युद्धेच्छु होते तथापि भीष्मार्जुनादिक वीरपुरुष निमित्तक दृष्टभयानें किंवा पुण्यक्षेत्राचे माहात्म्यानें त्यांस वैराग्य होऊन ज्यांत हिंसा पुष्कळ अशा युद्धापासून निवृत्त झाले किंवा युद्धच करते झाले असें प्रश्नाचें तात्पर्य ॥ संजय या संबोधनानें रागद्वेषादिकांचा उत्तम जय करणारा तूं आ

धृतराष्ट्र उवाच ॥ धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ॥ मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥

संजय उवाच ॥ दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ॥ आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥

हेस यास्तव निष्कपट सांग असें सुचविलें ॥ १ ॥ मूळचा अंध आणि कृपा लोकव्यवहार यानेंच्यांनींही हीन यामुळें मोठा अंध-आणि पुत्रस्नेहांत मग्न असा जो धृतराष्ट्र त्याचे प्रश्नाचें तात्पर्य समजून मोठा धार्मिक संजय उत्तर सांगतो असें वैशंपायन जनमेजयास सांगतात ॥ पांडवांस दृष्टभयाची शंकाच नाही ॥ अर्जुनास मात्र अदृष्ट भय उत्पन्न झालें। त्याचें भगवंतानें निवारण केलें। यासाठीं आपले पुत्र पांडवांस राज्यपरत देतील म्हणून खिन्न होऊन कां ॥ असें राजास सुतुष्ट करण्याकरितां प्रथम दुर्योधनाच दृष्टत्वाचेंच वर्णन करीत संजय बोलतो ॥ राजा दुर्योधन त्यावेळेस - व्यूहरचनेनें उभें राहिलेल्या पांडवांच्या सैन्यास पाहून धनुर्विद्या संप्रदाय प्रवर्तक जो द्रोणाचार्य त्याजवळ जाऊन ज्यांत अर्थ बहुत आहेत असें असून संक्षिप्त किंवा गूढ अशा वचनानें बोलता झाला ॥ एणेकरून पांडव सैन्य पाहून दुर्योधन भय पावला असें सुचविलें ॥ २ ॥

अहो द्रोणाचार्य अथवा अहो पांडुपुत्रांचे आचार्य - बुद्धिमान जो तुमचा शिष्य द्रुपदाचा पुत्र धृष्टद्युम्न - याने व्यूहरचनेने अधिष्ठिलेली अशी ही पांडवांची मोठी सेना ही पाहा ॥ द्रुपदपुत्र म्हणे करून पूर्वीचे वैराचे स्मरण दिले ॥ तुझा शिष्य म्हणे करून तुझे यथार्थ उत्पन्न झाला असतांही तू त्यास धनुर्विद्या शिकविली हे तुझें अज्ञान मोठे अनर्थास कारण झाले असे सुचविले ॥ शत्रूपासून ही विद्या संपादिली हे त्याचे मोठे बुद्धिमत्व असे धीमता म्हणे करून कळविले ॥ असे तुम्ही अज्ञानी आहां आणि पांडवांचे आचार्य आहां । यामुळे त्यांचे सैन्य पाहून तुम्हास आनंद होईल - यास्तव तुम्हांलाही सेना दाखविली

पश्यैतां पाण्डुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ॥ व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥
अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ॥ युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥
धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ॥ पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५ ॥

ती । असा मनांतील द्रोणाचार्यावरचा आपला द्वेष व्यक्त केला ॥ अशी त्याची धर्मसेवी जाऊनही गुरुवर दुष्ट बुद्धि त्यास नाही प्रकट करून असा भाव ॥ ३ ॥ या पांडवांचे सैन्यांत त्यांची धनुष्ये मोठी आहेत असे - आणि युद्धाविषयी । अतिप्रसिद्ध जे भीम आणि अर्जुन या सारखे असे शूर आहेत ॥ त कोणते म्हणशील तर - युयुधान - विराट - आणि महारथ द्रुपद ॥ म्हणे करून एकटे द्रुपदपुत्राने अधिष्ठिलेली सेना आमच्यातील कोणीतरी एकादा जिंकील । तू का भितोस । अशा शंकेचे निवारण केले ॥ ४ ॥ तसाच धृष्टकेतु - चेकितान व शूर काशिराज - पुरुजित - कुंतिभोज आणि नरामध्ये श्रेष्ठ असा शैब्य ॥ ५ ॥

पराक्रमी युधामन्यु - बलवान उत्तमौजा - सुभद्रेचा पुत्र अभिमन्यु - आणि द्रौपदीचे पुत्र पाच - हेसर्व महारथी आहेत ॥ च-या शब्दाने पाशिवाय पांडव घटोत्कचादिक ही महारथी आहेत असे सुचविले ॥ धर्मराजा पासून झालेला - प्रतिवि न्ध्य - १ भीमसेनापासून झालेला - सुतसोम - २ अर्जुना पासून - झालेला - श्रुतकीर्ति - ३ नकुला पासून झालेला - शतानीक - ४ सहदेवा पासून झालेला - श्रुतकर्मा - ५. हे द्रौपदीचे पांच पुत्र जाणावे ॥ धनुष्य धारण करणाऱ्या अकरा हजार योध्या बरोबर जो एकटा युद्ध करील आणि शस्त्रास्त्रात जो प्रवीण असेल त्याला महारथ असे म्हणतात ॥ असंख्य योध्या बरोबर जो युद्ध करील - त्यास अतिरथी म्हणतात ॥ एका बरोबर जो युद्ध करील त्यास रथी म्हणतात ॥ रथापेक्षां जो न्यून त्यास अर्धरथी म्हणतात ॥ ६ ॥ हे ब्राम्हणश्रेष्ठा - द्रोणाचार्या - आमचे सेनेंत जे मोठे मोठे सेनेचे ना

युधामन्युश्च विक्रान्त उत्तमौजाश्च वीर्यवान ॥ सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥

अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ॥ नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥

भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ॥ अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥

यक म्हणजे सरदार आहेत ते संज्ञार्थ म्हणजे शत्रु कईल्य नवल योद्धे पाहून तुम चा उत्साह भग न व्हावा यासाठी आमचे ही सेनेत मोठमोठे महारथी योद्धे आहेत असे चागले समजण्या साठी - तुम्हाला सागतो। ते ऐका ॥ एणे करून जर शत्रूचे सैन्य पाहून भ्याला स तर त्या बरोबर साम कर। युद्ध का करतो स। या शंकेचे निराकरण केले। आणि - प्रियशिष्य जे पांडव त्याची सेना पाहून हर्षा मुळे आपले कडील वीराची तुम्हा विस्मृति न व्हावी या साठी मी बोलतो असे सुचविले ॥ ७ ॥ तुम्ही - भीष्म - कर्ण - समाच युद्धात जय पावणार कृपाचार्य — अश्वत्थामा - माझा भ्राता विकर्ण - आणि तसाच - सोमदत्ताचा पुत्र भूरिश्रवा ॥ आपले युद्ध कार्या विषयी प्रवृत्ति व्हावी म्हणून हे ब्राम्हण श्रेष्ठा अशी स्तुति केली ॥ दोस्य पसी। तू जरी पांडवाचे स्नेहाने युद्ध चागले केले नाहीं किंवा ब्राम्हणत्वामुळे भिऊन पळाला

स तरी आमचेकडे भीष्मादिक क्षत्रिय मोठे मोठे योद्धे आहेत यास्तव मला भय नाही असे कळविले ॥८॥ ॥
आणि माझेसाठी ज्यांनी आपले प्राण टाकिले आहेत असे - आणि नाना प्रकारची शस्त्रे म्हणजे छेद करणारी खड्गादिक
आणि प्रहरणे म्हणजे केवळ प्रहार करणारी गदादिक ज्यापाशी आहेत - असे - दुसरेही शल्यकृतवर्मादिक पुष्कळ शू
र आहेत ॥ ते सर्वही युद्ध करण्यात कुशल आहेत॥ माझेसाठी ज्यांनी प्राण टाकिले आहेत - म्हणून त्यांचा आप
ले ठायी स्नेहातिशय - याचे शौर्य व युद्धभक्ति - आणि आपले नन्, कळ्ळ ही कळविली ॥९॥ भीष्म दोघाकडील पक्ष
पाती आहे यास्तव भीष्माने रक्षिलेले आमचे सैन्य - पांडवांचे सैन्यास जिंकण्या जोगे दिसत नाही ॥ भीम पांडवा
चाच पक्षपाती आहे यास्तव - भीमाने रक्षिलेले पांडवांचे सैन्य आमचे सैन्यास जिंकण्या जोगे दिसते ॥ अथवा - आ

अन्येच बहव शूरा मदर्थे त्यक्तजीविता ॥ नानाशस्त्रप्रहरणा सर्वे युद्धविशारदा ॥९॥
अपर्याप्त तदस्माकं बल भीष्माभिरक्षित ॥ पर्याप्त त्विदमेतेषा बल भीमाभिरक्षित ॥१०॥
अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिता ॥ भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्त सर्व एव हि ॥११॥

मचे सैन्य अकरा अक्षौहिणी आहे। आणि त्याचा महिमा प्रसिद्ध आहे असा भीष्माने रक्षिलेले आहे। यास्तव ते पांड
वांचे सैन्याने वेढा घालावया जोगे नाही ॥ पांडवांचे सैन्य सात अक्षौहिणी आहे - आणि अतिचंचल बुद्धि जो भीम त्याने र
क्षिलेले आहे यास्तव ते आमच्या सैन्याने वेढा घालावया जोगे आहे ॥ अथवा त्याचे नाशासाठी पराक्रमी भीष्माचे रक्षण आ
म्हीकेले ते पांडवांचे सैन्य आमचे जयार्थ असमर्थ आहे आणि त्याचे नाशासाठी अतिदुर्बल भीमाचे रक्षण पांडवानीं केले ते
आमचे सैन्य पांडवांचे जयार्थ समर्थ आहे ॥ म्हणजे आमचाच जय आहे असा भाव ॥१०॥ तुम्ही सर्वही व्यूहरचनेने उभेरा
हिलेले सैन्यात प्रवेश करावयाचे सर्व मार्गी आपआपले नेमलेले भागात - आपली जागा न सोडता उभे राहून भीष्माचे रक्षण क
रा॥ सेनापति चंचल झाला तर सर्व सेना व्याकुळ होईल। आणि तो स्थिर असला तर ती स्थिर राहील। यास्तव सेनापतीचे रक्षण करा
असा भाव ॥११॥

पांडव सैन्य पाहून भयपावलेला आणि आचार्यास कपट बुद्धीने शरण गेलेला जो दुर्योधन त्याची आर्त्ती ही आपणाशीं प्रता रणा आहे-अशा बुद्धीने द्रोणाचार्यांनी त्याचा अनादर केला असे पाहून आणि आपले बहुमानाचे वाक्य ऐकून-कुरूमध्ये वृद्ध आणि प्रतापी असा-पितामह म्हणजे भीष्म पूर्वी विराट नगरींत ज्याचा प्रताप पाहिला होता अशा पांडवांस पाहून दु र्योधनास भय न व्हावे या साठी दुर्योधनास युद्धाविषयी हर्ष उत्पन्न करीत मोठ्याने सिंहनाद करून शंख वाजविता झा ला ॥ कुरुवृद्ध एणेकरून आचार्य आणि दुर्योधन यांचे अभिप्रायाचे ज्ञान-पितामह एणेकरून उपेक्षा नकरणे-आणि-प्रतापवान् एणेकरून निर्भयता॥ही कर्ववेली ॥१२॥ सेनापतींचा उत्साह पाहून शंख-भेरी-म्हणजे नगारे-पणव-आनक। आणि गोमुख यांनांवाची वाद्ये सर्व सैन्यांत अकस्मात वाजविली तेव्हा तो शब्द मोठा झाला ॥१३॥ तदनतर पांढरे घो

तस्य संजनयन् हर्षं कुरुवृद्धः पितामहः ॥ सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥१२॥
ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ॥ सहसैवाभ्यहन्यंत स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥१३॥
ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यंदने स्थितौ ॥ माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥१४॥
पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ॥ पौंड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥१५॥

डे जोडले आहेत अशामोठे रथात बसलेले-लक्ष्मीपति श्रीकृष्ण-आणि पंडूचा पुत्र अर्जुन-हे दोघे दिव्य शंखांने वा जविते झाले। एणेकरून हे दोघे अग्नीने दिलेले विजयरथांत बसले होते तेव्हा हे सर्वथा अजेय असे सुचविले॥१४ इंद्रियांचा प्रेरक कृष्ण-पांचजन्य या नावाच्या शंखांत वाजविता झाला॥ शत्रूचे धनास जिंकणारा अर्जुन-देवदत्त या नावाच्या शंखाने वाजविता झाला॥ हिडिंबादिक मारण्या सारखे भयकर ज्याचे कर्म आहे असा भीमसेन पौंड्र या नावाच्या मोठ्या शंखाने वाजविता झाला ॥१५॥

कुंतीचा पुत्र युधिष्ठिर राजा - अनंतविजय या नांवाच्या शंखाने वाजविता झाला ॥ नकुल-सुघोष या नांवाच्या शंखाते - आणि सहदेव - मणिपुष्पक या नांवाच्या शंखाते वाजविते झाले ॥ शंखाची नावे सांगितलीं म्हणेकरून तुमेपुत्राचे सैन्यांत अशाविरव्यात नांवाचा एकही शंख नाही। यास्तव पांडवांचा उत्कर्ष आहे असे सूचविले ॥ धनंजय या पदाने राजसूययज्ञांत सर्व राजांस जिंकून अर्जुनाने धन आणिले - तेव्हां तो सर्वांस अजेय - आहे - असे सूचविले। वृकोदर म्हणेकरून भीमसेन पुष्कळ अन्नाचे पचन करणारा मोठा बलिष्ठ आहे असे सूचविले ॥ कुंतीपुत्र म्हणेकरून धर्म राजा कुंतीने मोठे तपाने यम धर्म राजाचे आराधन केल्यामुळे तो सम्राट झाला आहे आणि युधिष्ठिर म्हणेकरून त्याने राजसूय केल्यामुळे मुख्य राजा असे सूचविले ॥ १६ ॥ मोठे-

अनंतविजयं राजा कुंतीपुत्रो युधिष्ठिरः ॥ नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥

काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः ॥ धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥

द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ॥ सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक्पृथक् ॥ १८ ॥

सघोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ॥ नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥

अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वज ॥ प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥ २० ॥

ज्याचे धनुष्य मोठे आहे - असा काश्य राजा - तसाच - महारथी शिखंडी - तसाच - धृष्टद्युम्न - विराट - आणि पराजय न पावलेला सात्यकि ॥ १७ ॥ द्रुपद आणि द्रौपदीचे पांच पुत्र - प्रतिविंध्यादिक - आणि मोठे ज्याचे बाहु आहेत असा सुभद्रेचा पुत्र अभिमन्यु हे सर्वही - हे पृथिवीपते धृतराष्ट्रा निरनिराळ्या शंखातें वाजविते झाले ॥ १८ ॥ कौरवांचे सैन्यांत झालेला शंखध्वनि मोठा असताही पांडवांस भय करणारा झाला नाहीं ॥ पांडवांचे सैन्यात झालेला जो शंखांचा मोठा नाद तो मात्र आकाश आणि पृथिवी यांते नादयुक्त करीत धृतराष्ट्राचे पुत्रांच्या हृदयातें दुभागता झाला ॥ १९ ॥ कौरवांस भय झाले असे सांगून पांडवांस तें झाले नाही असे सांगतो ॥ तदनंतर हनुमान् ज्याच्या ध्वजावर आहे असा पांडव म्हणजे अर्जुन उभे राहिलेल्या धृतराष्ट्राच्या पुत्रांतें पाहून शस्त्रास्त्रे टाकण्याचा समय प्राप्त झाला त्यासमयीं धनुष्य उचलून ॥ २० ॥

हे महीपते धृतराष्ट्रा। सर्वांची अंतःकरण इंद्रिय जाणणारा जो कृष्ण त्यास त्यासमयीं वक्ष्यमाण वाक्य बोलता झाला॥ कृष्णाचारि
त्वार घेतल्या शिवाय अर्जुनानें स्वतः कांहींकेले नाही एणेकरून त्याचीनीति आणि धर्म याविषयी कौशल्य सांगून दुर्विचा
र केल्या वांचून पांडवाचें राज्य घेतलें यामुळें तुझे ठायीं नीति आणि धर्म हे नाहींत॥ याकारणामुळें तुलाजय नाहीं असें मही
पते यासंबोधनानें स्कचविलें॥ राजास धर्म आणि नीति अवश्य पाहिजेत॥ अर्जुन बोलतो॥ हे अच्युता-दोन्हीं सेनांचे मध्यें
माझारथ उभाकर॥ सर्वेश्वर भगवंतास अर्जुन अशी आज्ञाकरतो। एणेकरून भगवद्भक्तांस काय दुर्लभ आहे। भगवान ही त्यां

हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते॥ सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत॥ २१॥
यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान्॥ कैर्मया सह योद्धव्यमस्मिन्रणसमुद्यमे॥ २२॥
योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः॥ धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षव॥ २३॥

चे आज्ञेंत राहतो। यास्तव पांडवाचा जय निश्चित आहे असे सुचविलें॥ आणि अच्युत या संबोधनानें निर्विकार जो तूं यास शत्रु
मारतील असे भयच नाही असे स्कचविले॥ २१॥ या युद्ध प्रसंगीं युद्ध करण्याचे इच्छेनें-उभे राहिलेल्या मध्यें मासेबरोबर
कोणी युद्ध करावें आणि मी कोणाबराबर युद्ध करावें असे-जोपर्यंत मी पाहतों॥ तोपर्यंत रथ उभाकर असा दुसरेश्लोकाशी संबंध॥ २२
मी-दुष्ट बुद्धि असा जो धृतराष्ट्राचा पुत्र दुर्योधन याचें हित करावें असे इच्छिणारे आणि साम न करता युद्धच करावें अशीज्यां
चीइच्छा आहे असेजे भीष्मादिक योद्धे-पाश्चलीआले आहेत त्यास पाहतो॥ २३॥

या प्रमाणें अर्जुनानें सांगितल्यावर-भगवान अहिंसा धर्माचा आश्रय करून अर्जुनाकडून युद्ध करविणार नाही-असा धृतराष्ट्रा-
स भ्रम न व्हावा याविषयी संजय बोलतो ॥ हे भरत कुलोत्पन्ना धृतराष्ट्रा -निद्रेवाजय करणारा यामुळे सर्वदा सावध जो अ
र्जुन त्याणे ज्यास सांगितलें आहे असा जो कृष्ण तो-दोन्ही सैन्यांच्या मध्यभागी आणि भीष्मद्रोणांचे आणि सर्व राजांचे
संमुख अग्निदत्त आणि आपण भगवान ज्यावर सारथी असा श्रेष्ठ रथ उभाकरून हे पार्थ म्हणजे अर्जुना - एकत्र मि
ळालेल्या कुरूंते पहा असें बोलता झाला ॥ भरतया संबोधनानें भरत वंशाचे मर्यादे कडे पाहून ज्ञातीचा द्रोह करूं नको अ
सें सूचविलें ॥ २४ - २५ ॥ पृथा जी कुंती तिचा पुत्र अर्जुन - त्या सग्रा मात दोन्ही सैन्यात उभेरा हिलेले - पितृ म्हणजे भूरि
श्रवादिक चुलते - पितामह म्हणजे भीष्मादिक - आचार्य म्हणजे द्रोण कृपादिक गुरु - मातुल म्हणजे शल्यादिक - भ्राते म्हणजे-

संजय उवाच ॥ एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ॥ सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमं ॥ २४ ॥
भीष्मद्रोण प्रमुखतः सर्वेषांच महीक्षिता ॥ उवाचपार्थपश्यैतान् समवेतान् कुरूनिति ॥ २५ ॥
तत्रापश्यत् स्थितान् पार्थः पितॄनथ पितामहान् ॥ आचार्यान् मातुलान् भ्रातॄन् पुत्रान्पौत्रान् सखींस्तथा ॥ २६ ॥
श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ॥ तान् समीक्ष्य स कौंतेयः सर्वान् बंधूनवस्थितान् ॥ २७ ॥

दुर्योधनादिक - पुत्र म्हणजे लक्ष्मणादिक - पौत्र म्हणजे लक्ष्मणादिकाचे पुत्र - सखे म्हणजे अश्वत्थामादिक मित्र-यांते पाहता
झाला ॥ २६ ॥ तसेच दोन्ही सैन्यात उभे राहिलेले श्वशुर म्हणजे पांड्यादिक-सुहृत् म्हणजे आपणावर उपकार केलेले कृतवर्मादिक यांते पा
हता झाला ॥ युद्धांत हिंसा करणें हा क्षत्रियाचा धर्म आहे अशा ज्ञानाचा प्रतिबंध करणारी जी - हिंसा मोठा अधर्म - अशी
विपरीत बुद्धि - जीस मोह म्हणतात - तिणे करून झालेला जो ममतालक्षण स्नेह तत्कृत चित्ताची विकलता होणें एतद्रूप जो
शोक तेणेकरून ज्याचें विवेक ज्ञान नष्ट झाले आहे अशा अर्जुनास पूर्वीं आरंभिलेले युद्धरूप स्वधर्मापासून उपरम व्हा
वा अशी मोठा अनर्थ करणारी इच्छा झाली आणि तशीच त्याची प्रवृत्ति झाली असे दाखवितात ॥ तो कुंतीचा पुत्र अर्जुन
उभे राहिलेल्या त्या सर्व बंधूंतें पाहून ॥ २७ ॥

मो ह्या कृपेनें म्हणजे- स्वजनें हि कथ हत्या- येणे करून दारवविला जो स्नेह तेणे करून व्याप्त होऊन आणि खेद पावून हें बोलता झाला॥ अर्जुन बोलतो -हे कृष्णा॥ युद्धाचे इच्छेनें उभा राहिलेल्या या स्वजनातें पाहून॥२८॥ माझी- हस्त पादादिक गात्रें सीदंति म्हणजे निश्चेष्ट होतात किंवा व्यथा पावतात॥ मुख शुष्क होतें॥ माझे शरीरास कांप सुटतो- आणि रोमांच उभे राहतात॥२९॥ हातांतून गांडीव धनुष्य गळतें॥ त्वचेचा दाह होतो- यामुळे बसण्यास किंवा उभा राहण्यास मी समर्थ नाहीं॥ आणि माझें मन भ्रमण पावल्या प्रमाणे होत आहे॥ गांडीव गळण्यानें अधैर्य रूप दुर्बलत्व आणि त्वचेचे दाहाने अंतःसंताप हीं सूचविलीं॥३०॥ आणि हे केशवा॥ पुढें लोकक्षय रूप अशुभ होणार आहे असें सूचविणारी- निमित्ते- म्हणजे भू-

कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत॥ अर्जुन उवाच॥ दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितं॥२८॥ सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति॥ वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते॥२९॥ गांडीवं स्रंसते हस्तात् त्वक्चैव परिदह्यते॥ न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः॥३०॥ निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव॥ न च श्रेयोनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे॥३१॥ न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च॥ किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा॥३२॥

मि कंपादिक अपशकुन यांते मी पाहतों- आणि युद्धांत स्वजनास मारून कल्याण होईल असे मला वाटत नाहीं॥ क म्हणजे ब्रम्हा- ईश म्हणजे रुद्र- यांप्रत-दया करण्यास हे पात्र आहेत-असे पाहणारा- असा केशव पदाचा अर्थ आहे। यामुळे मा झ्या शोकाचा परिहार करण्यास तुला सामर्थ्य आहे असें केशवपदानें सूचविलें॥३१॥ हे कृष्णा। मी जयाची इच्छा करीत नाहीं- तशीच राज्याची आणि सुखाची ही इच्छा करीत नाहीं॥ हे गोविंदा। राज्य करून अथवा भोग करून- अथवा जगून-आम्हांस काय करायाचें आहे॥ स्वजन दर्शन तुला आणि मला तुल्य असले तरी मी आत्मवेत्ता नाहीं-यामुळे शोकापासून होणाऱ्या दुःखातें मी अनुभवितों॥ तू सदानंद रूप आहेस-यामुळें तुला शोक संबंध नाहीं- असे कृष्ण

पदे करून सूचविले ॥ सकळ इंद्रियांचा अधिष्ठाता असा गोविंद शब्दाचा अर्थ आहे । यामुळे मला ऐहिक राज्यादिका वि-
षयी विरक्ति आहे किंवा नाही हे तू जाणतोच आहेस - असे गोविंद पदाने सूचविले ॥ ३२॥ ज्यासाठी आम्हास राज्य-सुख
आणि भोग पाहिजेत - ते हे - प्राण आणि धन यांचा त्याग करून युद्धास उभे आहेत ॥ ३३॥ ते कोण म्हणाल तर - आचार्य म्ह
णजे गुरु - पितर म्हणजे चुलते - पुत्र म्हणजे दुर्योधनादिकांचे पुत्र - तसेच पितामह म्हणजे भीष्मादिक - मातुल म्हणजे शा-

येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ॥ त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ ३३॥
आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ॥ मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ॥ ३४॥
एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ॥ अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५॥

ल्यादिक - श्वशुर म्हणजे पाडयादिक सासरे - नातु म्हणजे दुर्योधन पुत्राचे पुत्र - मेहुणे - आणि तसेच इतर संबंधी ॥ ३४
॥ हे मधुदैत्यास मारणाऱ्या कृष्णा आम्हास मारणारे जरी हे आहेत तरी त्यांस त्रैलोक्याचे राज्याचे हेतूने मारण्यास मी इच्छित
नाही - मग पृथिवीचे राज्याकरिता मारण्यास कोठून इच्छीन । मारण्यास इच्छीत ही नाही म्हणोकरून मारणे दूरच रा-
हिले असे सूचविलें ॥ ३५॥

आचार्यादिकांस न मारतां तुम्हास ज्यानी फार दुःख दिले आहे अशा दुर्योधनादिकांस मार। त्याचे मरणानें तुला सुख हो ईल- असें जर कृष्ण म्हणेल तर त्याविषयी बोलतो॥ हे जनार्दना- धृतराष्ट्राचे पुत्रास मारून- आम्हास काय सुख होईल॥ क्षणिक सुख लोभानें चिरकाल नरक प्रद जो बंधुवध तो आम्हांस अयोग्य आहे असा भाव॥ अग्नीनें आपणास जाळणारा-१ आपणास विष देणारा-२ आपणास मारण्याकरता हाती शस्त्र घेऊन आलेला-३ आपले द्रव्याचे हरण करणारा-४ आणि आपले क्षेत्र म्हणजे शेत घर इत्यादिक याचे हरण करणारा-५, आणि बायकोचें हरण करणारा-६ या साहांस आततायी म्हणावे॥ आततायी जरी वेदांत पारग असला तरी विचार न करता त्यास मारावे- असे- शास्त्रांत सांगितले आहे॥

निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन। पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः॥ ३६॥
तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान्॥ स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव॥ ३७॥
यद्यप्येते न पश्यंति लोभोपहतचेतसः॥ कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकं॥ ३८॥ ॥

तेव्हां याचा वध करणे हे- योग्यच आहे॥ कारण- सांगितलेली आततायींची सर्व ही लक्षणें- यांचे आहेत॥ असे जर कृष्णा- म्हणशील तर। आततायीस मारावें हे अर्थशास्त्र आहे आणि गुर्वादिकांस मारू नये हे धर्मशास्त्र आहे। आणि अर्थशास्त्रापेक्षां धर्मशास्त्र प्रबल आहे- असें शास्त्रांत याज्ञवल्क्यादिकांनी सांगितले आहे॥ यास्तव जरी हे आततायी आहेत- तथापि यांस मारून आम्हांस पाप लागेल॥ ३६॥ या कारणास्तव आपले बांधव जे धृतराष्ट्राचे पुत्र यास मारण्याविषयी- आम्ही योग्य नाही॥ हे माधवा। स्वजनास मारून आम्ही कसे बरे सुखी होऊ॥ ३७॥ राज्य लोभामुळे ज्यांचे चित्त विवेकरहित झाले आहे- असे हे जरी- कुलक्षय झाल्यामुळे होणार जो दोष याते आणि मित्रद्रोहामुळे होणार जें पातक याते पाहत नाहीत॥ ३८॥ ॥

युद्धार्थ किंवा द्यूतार्थ कोणी बोलाविले असता त्यापासून क्षत्रियानीं निवृत्त होऊं नये ॥ क्षत्रियाचा - विजित म्हणजे शत्रूस मारून जय मिळवणे - हा धर्म आहे - अशा अर्थाच्या स्मृतिवरून क्षत्रियानीं युद्धापासून निवृत्त न होतां विजया साठी शत्रूची हिंसा करण्यास प्रवृत्त व्हावें। असें विहित असता युद्धापासून निवृत्त होणें विपर्यस्त कशी करतोस - असें म्हणशील तर त्याविषयीं बोलतो॥ तथापि हे जनार्दना। कुलक्षया मुळें होणाऱ्या दोषात - पाडणारे - असें जे - आम्ही यानीं - या पापापासून निवृत्त होण्याचें कसें न जाणावें ॥ तात्पर्य॥ जा प्रमाण यज्ञ प्रकरणीं उदुंबरशाखा वस्त्रानें सर्व आच्छादून सामगान करावें अशी स्मृति आहे ती - ते वस्त्र शेवटीं कर्तव्य विजास निळावयाचें य कोणा मुळें आहे आणि यास्तव ती - उदुंबर शाखेस स्पर्श करून सामगान करावें - अशा दुसर विरुद्ध स्मृतीने बाधित होते ॥ ... लोभानें केल्या स्मृति लोभमूलक आहेत। यामुळे त्या -

कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ॥ कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९॥
कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः । धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४०॥

कुलक्षय केल्यानंतर पाप होतें इत्यादिक श्रुतिविरुद्ध स्मृति आहेत त्या ही करून बाधित होतात ॥ केवळ श्रुति स्मृतीत विधि आहेत इतक्या वरूनच अनुष्ठान करावें असें नाहीं ॥ ज्या विधीचें अनुष्ठान केलें असता नरकप्रद पाप होत नाहीं त्याविधीचेंच अनुष्ठान केलें पाहिजे॥ नाहींतर जारण मारणादिक ज्यास म्हणतात अशा श्येन यागादिक व्यभिचार कर्माचे ही विधि वेदांत आहेत म्हणून त्याचें ही सर्वांनी अनुष्ठान करावें असें होईल ॥ उदुंबर शाखेचें वस्त्रानें वेष्टन करावें तर तीचा स्पर्श संभवत नाहीं। स्पर्श करावा तर तीचें सर्व वेष्टन संभवत नाहीं - अशा त्यांचा विरोध आहे। याप्रमाणे येथें ही विरोध आहे॥ ३९॥
कुलक्षय झाला असता धर्म सांगणारे वृद्ध नसल्यामुळे अनादि परंपरेनें चालत आलेले कुल धर्म नाश पावतात - धर्म नाश पावले असता - अवशिष्ट राहिलेले बालादि रूप सर्व कुलास अधर्म व्यापतो ॥ ४०॥ ॥ ॥

हे कृष्णा-अधर्माच्या व्याप्तीने-कुलस्त्रिया व्यभिचारादि दोषांनी युक्त होतात ॥ हे यादव कुलोत्पन्ना कृष्णा। स्त्रिया दोषयुक्त झा ल्या असतां म्हणजे अपत्यार्थ दुसरे वर्णाशी मैथुनार्थ गेल्या असता वर्ण संकर होतो ॥ ४१॥ आणि तो वर्ण संकर-कुलक्षय करणाऱ्यां च्या कुलास-नरक कारक खचित होतो ॥ असे आहे तर परशुरामाने सर्व क्षत्रिय मारल्यानंतर त्याच्या स्त्रियांनी ब्राम्हणा पासून पुनःपुनः पुत्र उत्पन्न करून घेऊन आपली वंश वृद्धि केली आणि धृतराष्ट्रादिक ही पुत्र असेच उत्पन्न करून वंश वृद्धि केली आहे-असे पुराणात लिहिले आहे ते कसे-असे म्हणाल तर त्याविषयीं बोलतो ॥ कारण कुलक्षय करणाराचे पितरांस-श्रा द्ध तर्पणादिक न मिळाल्यामुळे-ते पतन पावतात ॥ तात्पर्य ॥ अन्या याने उत्पन्न झालेलें अपत्य आपले नव्हे ॥ अन्योदर्य आपलापु

अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यंति कुलस्त्रियः॥ स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः॥ ४१॥

संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ॥ पतंति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ ४२॥

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः॥ उत्साद्यंते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः॥ ४३॥

उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन॥ नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम॥ ४४॥

त्र असे मनात ही आणू नये-असे यास्कानी सांगितले आहे आणि अशी वेदात पुष्कळ उदाहरणे आहेत। वास्तव जो बीजप्रद पिता त्यास च पिंड तर्पणादिक मिळते॥ क्षेत्रज पुत्राविषयीची स्मृति इहलोकींच्या वंश वृद्धिच्याची याप्रयोजनाविषयींची आहे। पर-लोकी श्राद्ध तर्पणादिक मिळणे याविषयीची नाही ॥ ४२॥ त्या संकर करणारे-असे जे सांगितलेले-कुल क्षय करणाराचे दोष-त्यांपासून अनादि परंपरेने चालत आलेले जे वर्ण धर्म-तसेच कुलधर्म-आणि आश्रम धर्म ते उच्छेदाते पावतात ॥ ४३॥ हे ज-नार्दना ॥ ज्यांचे वर्ण-आश्रम आणि कुल यांचे धर्म उच्छिन्न झाले आहेत त्या मनुष्यास प्रेतत्वनिवृत्तीस कारण जे श्राद्ध तर्पणादिक तें नसल्यामुळें निरंतर नरकवास होतो। असे आम्ही ऐकतो ॥ ४४॥ ॥ ॥

राज्य करवाचे लोभाने आपल्यास बध्यौला मारण्यास-आम्ही तयार झालो हे आम्ही-शिव शिव-केवढे हो मोठे पाप करण्यास-
सिद्ध झालो ॥ बधुबधकरावा याउई शाने युद्धाचा उद्योग करणे हे ही पापजनक आहे-मग युद्ध पापजनक आहे हे काय सांगावे ॥ मी
मोठ्या आवेशाने युद्ध करण्यास आलों हे मी अविचाराने आश्चर्य केले असे तात्पर्य ॥ ४५॥ शस्त्रे ज्याचे हातात आहेत-अ
से हे धृतराष्ट्राचे पुत्र-शस्त्र ज्या पाशीनाही आणि-दुसऱ्याचे शस्त्राचे निवारण नकरणारा-असाजो मी याते-जर-युद्धांत मा
रतील-तरते मला कल्याण कारक होईल ॥ प्राण्यार्चा हिंसान करणे हा धर्म स्वप्राण संरक्षणा पेक्षा श्रेष्ठ आहे ॥ यास्तव बंधु
वधाविषयीं मीनिश्चय केल्यामुळे जे पाप मला झालें असेल त्यास दुसरें प्रायश्चित नाही। यास्तव मरणा तच मला प्रायश्चित्त

अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयं ॥ यद्राज्य सुख लोभेन हन्तुं स्वजन मुद्यता. ॥ ४५॥ यदिमामप्र
तीकारमशस्त्रं शस्त्र पाणयः ॥ धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६॥ संजयउवाच ॥ एवमुक्त्वा
र्जुन संख्ये रथोपस्थ उपाविशत् ॥ विसृज्य सशरं चापं शोक संविग्न मानसः ॥ ४७॥ ॐ तत्सदिति श्रीमद्भग
वद्गीता सूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन संवादे अर्जुन विषाद योगो नाम प्रथमोध्यायः॥
संजयउवाच ॥ तंतथा कृपया विष्ट मश्रुपूर्णा कुलेक्षणं ॥ विषीदन्त मिदं वाक्य मुवाच मधुसूदनः ॥ १॥ ॥

श्रेयस्कर आहे असे तात्पर्य ॥ ४६॥ संजय बोलतो ॥ शोकामुळे ज्याचे-अन्तःकरण उद्विग्न झालें आहे-असाअर्जुन-असे
बोलून युद्धामध्ये-बाणासह धनुष्य टाकून रथाचे मध्य भागी बसता झाला ॥ ४७॥ इतिश्रीमद्भगवद्गीताया पर्वते इत्यु
पनामक रघुनाथ शास्त्रि कृत भाषाविवृतो प्रथमोध्याय ॥ १॥ अर्जुन युद्धापासून निवृत्त झाला तेव्हा मासेपुत्र आता नि
ष्कंटक राज्यानुभव करतील अशी धृतराष्ट्रास आशा नव्हावी या हेतूने-संजय बोलतो ॥ कृपेकरून-म्हणजे स्नेहेंकरून व्याप्त
झालेला आणि अश्रूनी ज्यांचे डोळे भरून आले आहेत-आणि खेद करित आहे-अशा अर्जुनाते-मधुसूदन म्हणजे-
कृष्ण-हे पुढील वाक्य बोलता झाला ॥ मधुसूदन पदाने-दुष्ट दैत्य मारणारा भगवान् अर्जुनास निमित्त मात्र करून तुझ्या दुष्ट पुत्रांस
मारील। तूं त्यास राज्य प्राप्तीची आशा व्यर्थ करूनको असे सुचविलें॥ १॥

श्रीकृष्ण भगवान बोलतात ॥ हे अर्जुना-नीचजनांनीं आचरिलेले-तसेंच स्वर्ग न देणारें-आणि अकीर्ति करणारे-असे बुद्धिमालिन्य-अथवा मोह तुला संग्रामा विषयीं कोठून प्राप्त झाला ॥ २॥ हे पार्था अर्जुना-तूं नपुंसकत्वातें किंवा भीरुपण्यास समर्थ नाहीं अशा निर्वीर्यत्वातें पाऊं नको ॥ हे नपुंसकत्व महादेवाबरोबर युद्ध करणारा जो तूं त्या तुला योग्य नाहीं ॥ हे शत्रूंस-ताप देणाऱ्या अर्जुना-हलके-असे हे मनाचे दुर्बलत्व म्हणजे भीति हें सं टाकून-युद्धास उभा रहा ॥ ३॥ अर्जुन बोलतो ॥ हे शत्रूंस मारणाऱ्या मधुसूदना कृष्णा-पूजा करण्यास योग्य-अशा भीष्माशीं आणि द्रोणाशी बाणानीं मी कसें युद्ध करूं ॥ युद्धकरीन-असे नुसतें वाणीनें बोलणें ही अयोग्य आहे मग बाणांनीं युद्ध कसें करूं असा भाव ॥ ४॥ मोठा ज्याचा प्रभाव आहे-असे

श्रीभगवानुवाच ॥ कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ॥ अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २॥ क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ॥ क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३॥ अर्जुन उवाच ॥ कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ॥ इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४॥ गुरूनहत्वा हि महानुभावाञ्श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ॥ हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुंजीय भोगान् रुधिरप्रदिग्धान् ॥ ५॥ ॥

अथवा हि हे पद निराळे न करून-हि महा म्हणजे-जो त्यांचें किंवा जाड्याचे निवारण करणारा अग्नि किंवा सूर्य-त्याचे प्रमाणें अनुभाव म्हणजे प्रभाव ज्याचा आहे असे-किंवा श्रुत अध्ययन तप आचार आणि ज्ञान यामुळे पापाचा संबंध आपणास होऊं नये असा प्रभाव ज्याचा आहे असे-एणे करून अन्याय मार्गानें ज्यांणीं राज्य घेतलें त्याचा अनुसार यानीं केला या दोषानें त्यांचा त्याग करावा अशा शंकेचे निवारण केलें-ते द्रोणादिक गुरू यांस न मारतां या लोकीं-भिक्षेने जें मिळेल-त्याचा भोग करण्यांत ही-कल्याण आहे-आणि अर्थाची इच्छा ज्यास आहे-अशा द्रोणादिक गुरूंस मारलें तर रक्तानें भिजलें त्याप्रमाणे निंदित जे भोग म्हणजे विषय त्यांस इहलोकींच मी भोगीन ॥ ५॥ ॥

आतां पूजार्ह गुरूस नमारतां दुर्योधनादिकांस च जर मारावे तर गुरु अर्थकाम आहेत। ते अर्थासाठीं दुर्योधना विषयीं युद्ध करतील। तेव्हा दुर्योधनास मारणें तर त्यास पूर्वी मारले पाहिजे-यास्तव गुरूंस मारावे किंवा नमारावे या दोहो गोष्टीमध्यें कोणतें चांगले आहे हे आम्हांस समजत नाहीं - आणि इहलोकी राज्यादिकाचा उपभोग करण्यांतच रुचबआहे असें मानून - गुरूंस मारणें पाअधर्माचा अंगीकार करून अथवा भिक्षाशन क्षत्रियास निषिद्ध आहे। युद्धकरणें हाच क्षत्रियांचा धर्म आहे - असें मानून यां बरोबर - युद्ध जरी केलें तरी - आम्ही यांस जिंकूं - अथवा हे आम्हांस जिंकितील हे ही आम्हास समजत नाहीं - आणि ज्यास मारून आम्ही जगण्याची इच्छा करीत नाहीं - तेच धृतराष्ट्राचे पुत्र समोर उभे आहेत॥ तेव्हा यांस मारून जरी आम्हांस जय मिळाला तरी आमचा मनोरथ सिद्ध होत नाही ॥ ५॥ यांस मारून - आम्ही कशी जगण्याची इच्छा करूं - अशी कृपण-

नचैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः॥ यानेव हत्वा न जिजी

विषामस्ते वस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६॥ कार्पण्य दोषो पहत स्वभावः पृच्छामि त्वां ध

र्म संमूढचेताः॥ यत्श्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेहं शाधिमां त्वां प्रपन्नं॥ ७॥

ता - आणि कुलक्षयामुळें होणार जो दोष तो न्या दोहो मुळे ज्याचा शौर्यादि लक्षण क्षत्रियस्वभाव नाशपावला आहे असा - आणि युद्धाचा त्याग करून - भिक्षाटन करणे - हा क्षत्रियांचा धर्म आहे - किंवा अधर्म आहे - याविषयीं - संशययुक्त आहे चित्त ज्याचे - असा मी तुलापुसतो॥ जें माझे कल्याण करणार असेल तें - संशय न होण्या जोगें बोल म्हणजे सांग॥ मी तुझा शिष्य आहे॥ तुला शरण आलेला जो मी - यातें शिक्षा कर म्हणजे धर्म तत्त्वाचा उपदेश कर॥ एणे करून द्रोण भीष्मादिकांस मारण्यापेक्षा भिक्षाटनच श्रेयस्कर आहे - असे अर्जुनाच्या बोलण्यानें पूर्वोक्त साधन संपत्ति झाल्यावर विविदिषा सन्यास करावा असें सुचवून नंतर आत्मज्ञानार्थ ब्रह्मवेत्ता जो गुरु त्यास शरण जावें अशीजी श्रुतीत गुरूपसत्ति सांगितली आहे ती सुचविली ॥ ७॥ ॥ ॥

- सख्यांशीं संभाषणकरणें- अगा दरील वस्त्रा दिकावर किंवा अवयवांवर ज्ञातठेवणें-इत्यादिक व्यापार आपल्या स्वभावा प्रमाणें करोनि
या याचेठ देखानें करी तथापि - ही दद मुखी कमलपत्राक्षी वाला मजकडे पाहते आणि माझी इच्छा करते आणि। ही पृथु कुच श्रो-
णी बाला माझें आलिंगन करण्यास इच्छिते असें मानितो ॥ परन्तु तो नरपशु पुरुष असा विचार करीत नाहीं की-ही मांसास्थी-
नीं निर्मिलेली जड पुतळी कोणा मही पहात नाही। या शरीरांत पाहणारा जो परमात्मा पुरुष तो सर्व जाणणारा-पाहणारा आहे। ज
ड शरीरास जाणणें पाहणें हा धर्म नाहीं। तो चेतन पुरुष तर अमूर्त म्हणजे दर्शनादिक क्रियारहित आहे। तो कसा पाहील-अ
सा वस्तूचा विचार करून स्त्री आदिक विषय दृष्टीस गोचर झाल्या नंतर त्यांविषयी काम होण्या पूर्वीच विषयांकडे मनाचा जो
चक्षु रादिक इंद्रिय रूप मार्ग तो नेत्र निर्मीलने करून बंद करून जरस्त्री आदिकाचें स्मरण मनात झालें तर स्त्रीआदिक विष

एवं बुद्धेः परं बुध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ॥ जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदं ॥ ४३ ॥ ॐ तत्स

दिति श्रीमद्भगवद्गीता सूपनिषत्सु ब्रह्म विद्यायां योगशास्त्रे श्रीकृ॰ दे कर्मयो॰ तृतीयोध्यायः ॥ ३ ॥

यास भोगकाली जरीं रमणीयत्व आहे तथापि परिणामीं ते विरस आहेत आणि बीभत्स आहेत-असें वारवार मनात आणून
कामाचा जय करावा ॥ याच प्रमाणे सांगितलेले प्रकारच्या कामाचा परिणाम रूप जो क्रोध तो क्षमेने जिंकावा॥ क्षमा पावल्याची
असतां क्रोधावेशामुळें फार निष्ठुर बोलण्याविषयीं जो वाणीस श्रम होतो तो होत नाहीं आणि संतोषामुळे क्रोधावेशानें शाम-
त्ल कास शूळ होतो तो होत नाहीं आणि मनास संताप होत नाहीं आणि नाड नादिक जो शरीराचा संमर्द तो होत नाहीं आणि
निरर्थक आणि अनर्थ करणारी अशी जी प्राण्याची हिंसा तीही होत नाहीं। यामुळे क्षमेनें क्रोधाचा जय करण्यास योग्य आहे
॥ जे क्षमाशील पुरुष आहेत ते क्रोध करून कोणी आपले अंगावर शस्त्रादिकाने ताडन करण्यास आला तर- अहो या दुर्वासधिक्का
र असो। ज्यामुळे- ज्यांची इंद्रियें स्वाधीन नाहीत- असा हा क्रोध करून मला मारण्यास येणारा पुरुष यास अशी हा पिशाच प्राप्त
झाली--असे त्यावर दयेने युक्त होतात ॥ आणि क्रोधयुक्त पुरुषास पाहून त्याकडे हास्य वदन करतात आणि त्याचे ज्ञान-ज

री यास मी मारावयास आलों तरी याचे मनात राग नाहीं। मनाथच आहे - असे दाखविताम आणि असे केले तरी त्याचा कोधावेश नष्ट होऊन जर वाव ला तर महाराज आमचे पासून चूक झाली असेल तर क्षमा करावी अशी त्याची प्रार्थना [illegible] नर अ पण केले त्या पापाचा क्षय झाला असा संतोष मानितात॥ असे केले तर त्याचा क्रोध कोठून राहणार आहे॥ यास्तव क्षमेकरून च क्रो धाचा जय करावा॥ ४३॥ इतिश्री मद्भगवद्गीतायां. रघुनाथशास्त्रिकृत भाषाविवृतौ तृतीयोध्याय. समाप्तः॥ ३॥ श्रीकृष्णार्पणमस्तु

या प्रमाणें दोन अध्यायांनी चित्तशुद्धि द्वारा ज्ञानयोगास साधन जो कर्मयोग तो सांगितला॥ यावर अप्रामाण्य शंका होऊं नये याविषयी तो ज्ञान कर्मयोग परंपरेने चालत आला आहे अशी त्याची स्तुति करून आपणावर भ्रांति किंवा प्रतारणा संभवत नाहीं असे स्पष्ट करण्याकरिता आपणा स सर्वांचा आप्त जो सर्वज्ञ परमेश्वर तद्रूपत्व दाखवून श्रीभगवान्‌ बोलतात॥ नाशरहित फलदातृत्वे करून अव्यय असा जो हा संध्यावंद

श्रीभगवानुवाच॥ इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम्॥ विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत्॥ १॥
एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः॥ स कालेनेह महता योगो नष्टः परंतप॥ २॥ स एवायं मया तेऽद्य
योगः प्रोक्तः पुरातनः॥ भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम्॥ ३॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥

नादिक निर्विकल्पक समाध्यंत संन्यासानधिकारि क्षत्रियास करण्यास योग्य असा कर्मयोग त्या पूर्वी मी सर्व क्षत्रियांस मूलकारण भूत जो सूर्य त्या कारणें सांगता झालों॥ सूर्य आपला पुत्र जो श्राद्धदेव नामक मनु याकारणें सांगता झाला। तो मनु आपला पुत्र जो इक्ष्वाकु त्याकार णें सांगता झाला॥ १॥ अशा उपदेश परंपरेनें प्राप्त झालेला जो हा कर्मयोग त्याप्रत निमिप्रभृति जे जनक अजातशत्रु कैकेय प्रभृति राजे तसे च जनक वसिष्ठादिक ऋषी अथवा राजे असून ऋषि असे राजर्षि ते आपले पितर जे इक्ष्वाकु प्रभृति त्यांपासून जाणते झाले॥ आता हा ही चे लोकांस त्या योगाचे अज्ञानाविषयी कारण सांगतात॥ हे शत्रूंस ताप देणाऱ्या अर्जुना। मध्ये बहुत काळ गेल्या मुळें किंवा त्या योगाचा उपदे श करण्याचा संप्रदाय नष्ट झाल्या मुळें या लोकीं तो योग नष्ट म्हणजे उच्छिन्न झाला॥ २॥ तो च प्राचीन योग मी तुला आज सांगितला। तूं मा झा भक्त म्हणजे मला शरणागत आहेस आणि सखा आहेस यास्तव हें मोठें रहस्य जरी आहे तथापि मी तुला सांगितलें। तात्पर्य। तो भक्त

नाहीं त्यास विद्या सांगितली तर ती निर्वीर्य होते असे मंत्रांत सांगितले आहे ॥ ३॥ कृष्ण देह यकदेवापासून उत्पन्न झाला आहे याकारणा
नें कृष्णानें सूर्यास योगाचा उपदेश केला या गोष्टीचा असंभव मनांत आणून अर्जुन बोलतो ॥ हे कृष्णा। तुझें जन्म आत्ताकडील आहे आणि सू
र्याचें जन्म फार पूर्वीचें आहे यास्तव आलीकडील जो तूं त्याणे प्राचीन कालचा जो सूर्य त्यास हा योग सांगितला हे समजण्यास मी क
सा समर्थ होईन ॥ ४॥ हा लीलावतार रूप कृष्ण देह जरी आलीकडील आहे तथापि अनादि परमेश्वर जो मी त्याचे अवतार अनंत आहेत
त्यांतील एका अवतारांत मी सूर्यास योग सांगितला अशा तात्पर्यानें श्रीकृष्ण भगवान् उत्तर सांगतात ॥ हे शत्रूंस तापदेणाऱ्या अर्जुना।
तुझीं आणि माझीं बहुत जन्में होऊन गेलीं आहेत। माझे ज्ञान शक्तीचा लोप नाही यामुळे ती जन्में मी जाणतो। तूं अज्ञाने करून आवृ
त आहेस म्हणून ती तूं जाणत नाहीस ॥ ५॥ ज्यास पुण्य किंवा पाप नाहीं आणि उत्पत्ति नाश रहित असा जो तू परमेश्वर यास जीवा

अर्जुन उवाच ॥ अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ॥ कथमेतद्विजानीयां त्वमादौ
प्रोक्तवानिति ॥ ४ ॥ श्रीभगवानुवाच ॥ बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ॥ तान्य
हं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५॥ अजोपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोपि सन्॥
प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

प्रमाणें पुण्य पापाचे फळाचा उपभोग होण्यासाठीं होणारे जन्म कसे घडतील अशी शंका होईल तर त्याविषयी सांगतात ॥ मी उत्पत्ति रहित आ
णि नाश रहित आणि ईश्वर म्हणजे जीवास पुण्य पापाचे फळ देणारा त्यात पुण्य पापाही करून रहित असा असता ही ज्ञान शक्ति-क्रि
या शक्ति-आणि बल शक्ति एतत्स्वरूप जी माझी वैष्णवी माया तीप्रत अधिष्ठाय म्हणजे वश करून आत्ममायेकरून संभवामि
म्हणजे मी देहधारी झाल्याप्रमाणें लोकांस दिसतो। परंतु परमार्थेत जन्मादेह नाही। असता ॥ पूर्वश्लोकात - तान्यहं वेद सर्वाणि-
एणीकरून सांगितलेलें जें सर्वज्ञत्व ते जातिस्मर जे योगी त्यांप्रमाणें तुझ्यात आहे किंवा काय असें म्हणोल तर तसें नव्हे असे सांगतात ॥ दे
हाहून भिन्न जे आत्मस्वरूप तेणे करून योगी जरी अज आणि अव्यय असे ईश्वर जो मी याप्रमाणे आहेत तथापि उत्पन्न होणाऱ्या

आणि नाशापावणाऱ्या देहसंबधानें योगीं उत्पन्न होणारे आणि नाशपावणारे आहेत। यामुळे त्यांसारखा जातिस्मर मी नाही। मा ह्या देह उत्पत्ति आणि नाश यांहीकरून रहित आणि नित्य आहे। यामुळे देही जे योगी त्यांहून मी ईश्वर-सर्वज्ञ-श्रेष्ठ आहे॥ नत्वेवाहंजातु नासं-या श्लोकांत देहादिभिन्न जे आपले स्वरूप त्यास नित्यत्व सांगितलें आणि येथें देहविशिष्ट म्हणजे देहात्मक हा आपले स्वरूपास नित्यत्व म्हणजे उत्पत्ति आणि नाश याहीकरून रहित्य सांगितलें हा त्याला आणि याला विशेष आहे॥ आदित्यांतर्वर्ति म्हणजे सूर्यमंडळांत राहणारे हिरण्यासारखे ज्याचे श्मश्रू आहेत-ज्याचे केश हीं हिरण्यासारखे आहेत आणि जें नखापासून मस्तकापर्यंत सुवर्णमयच आहेत असें जे परमेश्वर नारायणाचे दिव्यशरीर वेदांत वर्णिलें आहे त्याचीउत्पत्ति किंवा नाश होतो असें म्हणता येत नाही। यास्तव परमेश्वराचा देह नित्यच आहे॥ ज्यास सहस्रावधि मस्तके-नेत्रे आणिपाद आहेत तो या सर्व चतुर्दश भुवनात्मक विश्वास व्यापून दशांगुलें वर राहिला आहे-असा जो पुरुषसूक्तात वर्णिलेला नारायण तो मी सर्वजगरूप होऊन त्यास अतिक्रम करून राहीन असें इच्छिता झालों आणि तो नारायण पंचरात्र म्हणजे पांच अहोरात्रानी साध्य होणारा जो पुरुषमेध रूप क्रतु त्याप्रत अनुष्ठिता झाला असें शतपथ ब्राम्हणांत सांगितलें आहे-यावरून परमेश्वराचे ही शरीर पंचरात्राख्य कर्मापासून उत्पन्न झालें आहे असें म्हणू नये॥ कारण त्या ब्राम्हणांत नारायण शब्दानें हिरण्यगर्भ विवक्षित आहे॥ कारण पूर्णकाम आणि सर्वांचा अतिक्रम करून पूर्वीच राहिलेला जो परमेश्वर त्यास सर्व भूतांचा अतिक्रम करून राहीन अशा इच्छेचा संभव नाहीं॥ ईश्वर प्रकरणी वेदांत जेथें जगाची उत्पत्ति लिहिली आहे तेथें तो परमात्मा मीबहु स्वरूप होईन अशीजी कामना सांगितली ती केवळ लीला न्यायानें स्वकीय प्रयोजन नसतांही सांगितली किंवा जीवांचे कर्म फलो पभोगार्थ जग उत्पन्न करावें यासाठी सांगितली। स्वार्थासाठी सांगितली नाहीं आणि-आप्तकाम तेनें निस्पृह असतां ही लीलेंकरून च कोट्यावधि ब्रम्हांडें उत्पन्न करणारा जो परमेश्वर त्यास शरीर प्राप्तीसाठीं कर्मानुष्ठान सर्वथा असंभावित आहे। यास्तव ईश्वराचें शरीर कर्मापासून उत्पन्न झालें नाहीं आणि तें भौतिक म्हणजे पंचमहाभूतांपासून उत्पन्न झालेलें नाहीं॥ कारण स्थूल शरीर समष्टि रूप जें विराट् शरीर-तसेंच सूक्ष्म शरीर समष्टि रूपजो सूत्रात्मा किं

या हिरण्यगर्भाचे शरीराहून जें निराळें आहे तें मात्र भौतिक आहे न॥ तर परमेश्वराचे शरीरास उपादन कारण कोण। अवि द्या तर ईश्वरास नाहींच ॥ जीवाची अविद्या उपादान कारण म्हणावी तर शुक्तिकेवर अविद्येनें भासलेलें जें मिथ्या रजत त्याचा जसा ज्ञा कि ज्ञानानें उच्छेद होतो त्याप्रमाणें त्याचा उच्छेद होईल यामुळें त्यास सत्यता येणार नाहीं तेव्हां देवकीगर्भांत प्रविष्ट होऊन बा ल्य-पौगंड-यौवन-इत्याद्यवस्थांनीं जो प्रतीतीस आला त्या भगवंताचे देहाचें अधिष्ठान कोण असें म्हणेल तर त्याविषयीं सांगतात ॥ प्रकृतिं स्वामधिष्ठाय-इत्यादि ॥ तात्पर्य ॥ जीवाचे देह अनात्मभूत म्हणजे जडप्रकृति आहेत। म्हणजे तेज-आप- अन्न म्हणजे पृथि वी हीं तीन भूतें- किंवा वायु आणि आकाश यांसुद्धां पंचभूतें याचें अधिष्ठान करून आहेत म्हणजे त्यापासून जन्मादिकांप्रत पावत त ॥ मी परमेश्वर तर स्वीय म्हणजे प्रत्यगात्म्याहून अनन्य म्हणजे अभिन्न जी प्रत्यक्चैतन्यरूप प्रकृति तीप्रत च अधिष्ठून आत्म मायेनें संभवतों म्हणजे शरीर धारण करतों। तात्पर्य । जसा एक लोकांतील ऐंद्रजालिक मायावी आपले स्थानापासून च्युत न हो

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत॥ अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहं ॥ ७ ॥ ॥

तां ही अदृश्य होऊन स्थूल सूक्ष्म जीं पृथिव्यादिक महाभूतें तीं न घेतां केवल आपले मायेनें च दुसरा आपले सारखा मायावी सूत्र मार्गानें गगनांत गमन करणारा उत्पन्न करतो। याप्रमाणें सच्चिदानंद आणि निर्विकार स्वरूप मी परमेश्वर मायेनें आपलें चिन्मय शरीर उत्पन्न करतो आणि मायावी जसा सूत्रावर चढणें-उतरणें- अशा क्रिया दाखवितो त्याप्रमाणें मी आपल्या शरीरास बाल्यादिक अवस्था दाखवितों। परंतु लौकिक मायावी जेव्हां मायेचा उपसंहार करतो तेव्हां सूत्रानें गगनांत चढणाऱ्या दुसऱ्या मायावीचाही उप संहार करतो आणि मी मायेचा उपसंहार करीत नाहिं आणि आपले शरीराचाही उपसंहार करीत नाहीं हा विशेष आहे ———

यावरून परमेश्वराचें मायामय शरीर नित्य एकच आहे। त्याच शरीरानें मी सूर्याला उपदेश केला आणि तुलाही त्याच शरीरानें उपदेश कर तों - असी या श्लोकाची व्याख्या करावी ॥ ६॥ आतां अवतार घेण्याचें प्रयोजन सांगतात। हे भारत अर्जुना॥ जेव्हां जेव्हां धर्माची ग्ला नता म्हणजे हीणता होते आणि अधर्माची वृद्धि होते तेव्हां तेव्हां मी अवतार घेतों म्हणजे लीलेनें रामकृष्णादिक शरीराही करू न आविर्भूत होतो ॥ ७ ॥ ॥

स्वधर्मानें वर्तणारे जे साधु यांचें रक्षण करण्यासाठी आणि दुष्ट कर्म करणारे जे पापी त्यांचा नाश करण्या साठी आणि धर्माची स्थिरता कर
ण्यासाठी युगा युगाचे ठायीं किंवा त्यात्या समयाचे ठायी मी अवतार घेतों॥ याकारणावरून पुत्राचे हितार्थ मातेनें त्याला ताडन जरी के
लें तरी मातेस जसें निर्दयत्व येत नाही तसें ईश्वरास निर्दयत्व येत नाही॥ ८॥ हे अर्जुना। याप्रमाणें माझें जन्म म्हणजे अवतार आणि ध
र्म पालनादि स्वरूप अलौकिक कर्म यांप्रत जो तत्वतः म्हणजे माझीं जन्मकर्में लोकांचे हितासाठी च आहेत। स्वार्थासाठीं नाहींत असें
जाणतो तो या देहाप्रत किंवा देहाभिमानाप्रत टाकून पुनः जन्माप्रत येत नाहीं। मजप्रत येतो यासाठी ज्यास भगवत्प्राप्तीची इच्छा अ
हे त्याणें भगवंताचीं अवतार चरित्रें गावीं। असें तात्पर्य॥ ९॥ भगवंताचे जन्मकर्मांचे ज्ञानेंकरून भगवंताची प्राप्ति कशी होते तें सांग
तात॥ विषयांची प्राप्ति व्हावी अशी जी इच्छा तो राग आणि मिळाले ले विषय नाश पावतील असें भय आणि विषयप्राप्ति दोण्या मा

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृतां॥ धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगेयुगे॥ ८॥
जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्वतः॥ त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन॥ ९॥
वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः॥ बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः॥ १०॥

र्गी प्रयत्न करीत असतां कोणी त्यास प्रतिबंध केल्यामुळें इच्छेचा विघात होऊन उत्पन्न होतो जो मनाचा दुर्निर्विशेष तो क्रोध हे रा
ग भय क्रोध ज्यांचे गेले आहेत असे आणि मी शुद्ध सत्वावतार स्वरूपानें धर्मपरिपालन करतों असें माझेवरील परम कारुणिकत्व
जाणून माझे ठायीं चित्त ठेवून आपलें - जन्ममरण प्रवाहांत पडल्यामुळें - जें दुःख त्याच्या नाशाविषयीं मी त्राता च ज्यांणीं आश्रय केला आहे
असे यदुन - माझे प्रसादेंकरून प्राप्त झाले लें जें आत्मस्वरूपाचें ज्ञान आणि त्याचा परिपाक होण्यास साधन जें तप म्हणजे स्वधर्मानु
ष्ठान किंवा पुनः पुनः विचार तेणेंकरून पूत म्हणजे - अज्ञान आणि त्याचें कार्य जें देहें द्रियादिकावर आत्म बुध्यादिक तद्रूप जो मल
तो ज्यांचा गेला आहे असे होऊन माझे स्वरूपाप्रत पावले आहेत॥ यावरून माझे भक्तीचा मार्ग आतांच प्रवृत्त झाला असें नाहीं।
तो चिरंतनच आहे असें सूचविलें॥ याप्रमाणें तुझीं आणि माझीं जन्में बहुत होऊन गेलीं आहेत त्यांप्रत तूं जाणत नाहींस आ

णि मी जाणतों असें सांगितलें येणें करून अज्ञानोपाधिक चैतन्यरूप जो जीव तो महावाक्यांतील त्वंपदाचा अर्थ आणि विद्योपाधिक चैतन्यरूप जो ईश्वर तो तत्पदाचा अर्थ—असें दाखवून अज्ञानरहित आणि नित्य शुद्ध सत्वादि गुणयुक्त जो परमेश्वर त्याचें निष्काम कर्मादिक स्वधर्माचरणानें प्राप्त झालें त्याप्रसादेंकरून जीवाच्या अज्ञानाची निवृत्ति होऊन चित्स्वरूपत्वानें त्यावर आत्मत्व साक्षात्कार होऊन परमेश्वराचें सारूप्य जीवास प्राप्त होतें असें सांगितलें ॥ १० ॥ तुला जे शरण येतील त्यांस तूं आपलें सारूप्य जसें देतोस—तसेंच कामबुद्धीनें इतरदेवतांस जे शरण जातात त्यांस तें देत नाहींस यावरून तुझे ठिकाणीं ही आम्हां जीवांप्रमाणें विषमभाव आहे असें म्हणेल तर त्याविषयीं सांगतात ॥ जे जसे म्हणजे सकाम बुद्धीनें किंवा निष्काम बुद्धीनें मला भजतात त्यांस त्यांचे इच्छेप्रमाणें फल देऊन त्यांवर मी अनुग्रह करतों ॥ सकामपुरुष मला सोडून इंद्रादिदेवतांचें भजन करतात म्हणून मी त्यांची उपेक्षा करीत नाहीं ॥ कारण हे अर्जुना। इंद्रादिकांचें यजन करणारे ही मींच उपदेश केलेले मार्गास अनुसरतात ॥ तात्पर्य ॥ सर्वश्रुति आणि स्मृति

ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहं ॥ मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ११ ॥

हे च मुखांतून निघाल्या आहेत यास्तव त्यांतील सर्व विधि किंवा निषेध माझ्याच आज्ञा आहेत। त्यांत स्वर्गादि फलेच्छा ज्यास आहे त्याणीं माझ्या विभूति ज्या इंद्रादिदेवता त्यांचेंच यज्ञादिकें करून यजन करावें — ज्यांस मोक्ष च आहे त्यांणीं निष्काम कर्माचरणें करून शुद्धांतःकरण होऊन सच्चिदानंदरूप जो मी त्याचें स्वात्मत्वेंकरून उपासन करावें — अशा माझ्याच आज्ञा आहेत। त्याप्रमाणें आप आपले अधिकाराप्रमाणे कोणतेही देवतेचें यजनादिकें करून आराधन केलें तरी ती देवता माझेंच स्वरूप आहे यास्तव तें आराधन माझेंच होतें आणि त्या देवतेचे द्वारें आराधन करणाऱ्यास त्याचे इच्छेप्रमाणें [illegible] आहे यावरून माझे ठिकाणीं विषम भाव नाहीं। मी जर स्वेच्छेनें कांही करीन तर मला वैषम्य येईल तसें मी कांहींच करीत नाहीं। अथवा जे आर्त म्हणजे पीडित किंवा ज्ञानेच्छु किंवा स्त्री पुत्र द्रव्यादिक अर्थांची इच्छा करणारे त्यांच्या कामानीं मला भजतात त्यांप्रत त्यांचे पीडानिवारण किंवा ज्ञान देणें किंवा अर्थ देणें एणें करून मी त्यांवर अनुग्रह करतों कारण ते माझेच मार्गास अनुसरतात। अन्य देवते

ते ही भक्त माझेच भक्त आहेत ॥ ११ ॥ असें जर आहेतर तुझें सारूप्य प्राप्त होणें असाजो मोक्ष त्यामाठीं सर्वनिष्काम बुद्धीने तुझेंच मु
ख्य स्वरूपाचें आराधन कां करीत नाहींत असें जर म्हणेल तर त्याविषयीं सांगतात ॥ बहुतकरून या मनुष्य लोकांत काम्य कर्माच
फलाची इच्छा करणारे जे आहेत ते इंद्रादिक देवतांचें यजन करतात ॥ सच्चिदानंद रूप जो मी याचें स्वात्मत्वें करून ध्यानादि रूप
भजन करण्यास साधनरूप चित्तशुद्धीचें संपादक निष्काम कर्म करीत नाहींत ॥ कारण मनुष्य लोकीं काम्य कर्माचें पुत्र पश्वाद
न्नादिक फल लौकर प्राप्त होतें। ज्ञानप्राप्तीचें साधन ध्यानादिक आणि चित्तशुद्धि होणें फार दुर्घट आहे यास्तव त्याचें फल माझें सारूप्य प्रा
प्त होणें तें लौकर प्राप्त होत नाहीं ॥ १२ ॥ सर्व सृष्टीचा कर्ता तूं आहेस तेव्हां कोणी सकाम होऊन इंद्रादि देवतांचें यजन करतात ॥ कोणी निष्का
म होऊन तुझ्या मुख्य स्वरूपाचें भजन करतात हें कर्म वैषम्य आणि कर्म करणारे जे ब्राह्मणादिक वर्ण त्यांमध्यें कोणी उत्तम-कोणी मध्यम-
कोणी अधम-असें वैलक्षण्य ही तुझेपासून च उत्पन्न झालीं आहेत यावरून तुझेठाईं वैषम्य कसें नाहीं असें म्हणेल तर त्याविषयीं सा

काङ्क्षन्तः कर्मणां सिद्धिं यजन्त इह देवताः ॥ क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥
चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्म विभागशः ॥ तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥

गतात ॥ ब्राह्मण सत्त्व प्राधान्यें करून सत्त्वगुणी आणि त्याचीं-शम म्हणजे बाह्येंद्रियांचा निग्रह-दम म्हणजे मनाचा निग्रह-इत्यादिक
स्वाभाविक कर्में-सत्त्वगुण आहे अंगभूत ज्यास अशा रजोगुणानें प्राधान्यें करून युक्त क्षत्रिय आणि त्यांची शूरत्व युद्धादिक स्वाभावि
क कर्में-तमोगुण आहे अंगभूत ज्यास अशा रजोगुणानें प्राधान्यें करून युक्त वैश्य आणि कृषि वाणिज्य म्हणजे व्यापारादिक-
त्यांचीं कर्में-रजोगुण आहे अंगभूत ज्यास अशा तमोगुणानें प्राधान्यें करून युक्त शूद्र आणि ब्राह्मण क्षत्रिय वैश्य या तीन वर्णां-
ची सेवा करणें इत्यादिक त्यांचीं स्वाभाविक कर्में-अशा गुणांच्या आणि कर्मांच्या विभागें करून युक्त ब्राह्मणादिक चार वर्ण मी
उत्पन्न केले आहेत ॥ मायासंबंधानें त्यांचा कर्ता मी असतांही परमार्थ दृष्टीनें किंवा त्या सृष्टि करण्याविषयींची जी आसक्ति
तीणें करून मी रहित आहें यामुळें अव्यय म्हणजे निर्विकार असा जो मी यास्तव परमार्थतः अकर्ता आहें असें तूं जाण ॥ तात्पर्य ॥ मी

जी सृष्टि करतों ती मी आपले कर्त्यादिकाचे प्रयोजनासाठीं करीत नाहीं किंवा दुसऱ्याचे अनर्थासाठीं करीत नाहीं आणि निष्कारण आपले इच्छेनें करीत नाहीं॥ अनादि जीं जीवांचीं कर्में आहेत त्यांचें त्यांस तदनुसार विचित्र फल देण्यासाठीं विचित्र सृष्टि मी करतों। यामुळें मला कोणावर वैषम्य किंवा ममते चा संभव हें नाहीं॥ १३॥ आता पूर्वोक्त अर्थाचें च प्रतिपादन करतात॥ मी निरहंकार आहें यामुळें विश्वाची सृष्टि करणें इत्यादिक जीं कर्में तीं मला आसक्त करीत नाहींत आणि मी आप्तकाम म्हणजे सर्वकाम ज्यास प्राप्त झाले आहे त असा आहें म्हणून मला कर्मफलांची इच्छा नाहीं यामुळें ही तीं कर्में मला लेप म्हणजे आसक्ति करीत नाहींत॥ असा मी आहें असें जो स्वात्मत्वें करून जाणतो तोही कर्मफल त्यामुळें कर्मानें बद्ध होत नाहीं॥ १४॥ याप्रमाणें-येषु थार्मां प्रपद्यंते-इत्यादि चार श्लोकांनीं प्रसंगानें प्राप्त झालेलें जें ईश्वरास वैषम्य त्याचें निराकरण करून पूर्वीं सांगितला जो निष्काम-

न मां कर्माणि लिंपंति न मे कर्मफले स्पृहा॥ इति मां योभिजानाति कर्मभिर्न स बध्यते॥ १४॥

एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः॥ कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतं॥ १५॥ ॥

किं कर्म किमकर्मेति कवयोप्यत्र मोहिताः॥ तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्॥ १६॥

कर्मयोग त्याचा विस्तार सांगण्यासाठीं शिष्टाचारानें प्रमाण दाखवून पूर्वीं सांगितलेले कर्मयोगाचें स्मरण देतात॥ अहंकार-कर्तृत्वाभिमान-फलेच्छा इत्यादिक सोडून केवल ईश्वरो द्देशें करून केलेले कर्म बंधक होत नाहीं असें जाणून पूर्वींचे मुमुक्षु जे जनकादिक त्यांहीं पूर्वतर म्हणजे वेदोक्त त्या त्या आली कडे कल्पिलेलें नव्हे असें अनादिसिद्ध जें कर्म तें चित्तशुद्धी साठीं आवश्यक आहे म्हणून केलें यास्तव किंवा पूर्वतर म्हणजे प्रथम कर्म च केलें या कारणास्तव तूंही तें च कर्म कर॥ १५॥ जें जें कर्म करावयाचें तें तें जाणून करावें अशी स्मृति आहे यास्तव कर्माचें वास्तविक स्वरूप समजणारे जे आहेत त्यांचे बरोबर विचार करून कर्मस्वरूप यथार्थ समजून तें केलें पाहिजे। केवल लोक करीत आले म्हणून आपणही करावें असा गतानुगतिक न्यायानें करूं नये असें सांगण्यासाठीं कर्मस्वरूपाचें ज्ञान दुर्घट आहे असें सांगतात॥ करावयाचें कर्माचें स्वरूप काय आणि अकर्म म्हणजे कर्म न करण्याचें स्वरू

प काय यादोहोंविषयीं दुर्निरूपत्वास्तव कविम्हणजे क्रांतदर्शी विद्वान हीं मोहाप्रत पावले आहेत यास्तव तें कर्माचें आणि अकर्माचें स्वरू
प तुलामी सांगतो ॥ ज्या स्वरूपाप्रत जाणून अशुभम्हणजे दुःखप्रद जो संसार त्यापासून तूं मुक्त होशील ॥ १६॥ जाणे – येणे – पाहणे – ऐक
णे – बोलणें – इत्यादिक जो देहेंद्रियांचा व्यापार तें कर्म हे लोकांत प्रसिद्ध च आहे असें म्हणेल तर त्याविषयी सांगतात ॥ शास्त्रविधीनें जें कर्म
अवश्य करावें असे सांगितले आहे त्याचें तत्व म्हणजे वास्तविक स्वरूप समजलें पाहिजे कारण तेंच कर्म स्वरूपानें ज्ञान अनुष्ठान द्वारा चि
त्तशुद्धीस उपयोगी आहे। केवल सांगितलेलें लौकिक कर्म स्वरूपानें ज्ञान उपयोगी नाहीं ॥ तसेंच विकर्म म्हणजे जें कर्म करूं नये असा
शास्त्रांत निषेध सांगितला आहे त्या निषिद्ध कर्माचेंही तत्व म्हणजे यथार्थ स्वरूप समजलें पाहिजे ॥ कारण कर्म हें उपलक्षण आहे। प
रंतु कर्म अकर्म आणि विकर्म यांचें यथार्थ तत्व समजणें फार गहन म्हणजे खोल किंवा दुर्घट आहे ॥ १७॥ तत्ते कर्म प्रवक्ष्यामि – असें जे

कर्मणोह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः॥ अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः॥१७॥
कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः॥ स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत्॥१८॥

पूर्वी सांगितलें तेंच सांगतात ॥ कर्मणि म्हणजे केवल ईश्वराराधनो द्देशानें केलेलें जे निष्काम कर्म त्याचे ठाईं – हें चित्त शुद्धीचे द्वारा मो
क्षसाधनभूत ज्ञानास साधनच होतें। बंधक होत नाहीं – या कारणानें हें अकर्मच आहे अशी जो बुद्धि करतो। तो कर्म करणाऱ्या म
नुष्याचे ठाईं बुद्धिमान म्हणजे व्यवसायात्मक जी पूर्वोक्त बुद्धि तिणें करून युक्त आहे यास्तव श्रेष्ठ आहे आणि त्या बुद्धीनें त्या सकर्मा
नुष्ठान द्वारा चित्तशुद्धि होऊन ज्ञान प्राप्ति होते यास्तव तो युक्त म्हणजे श्रवण मनन निदिध्यासन रूप योगयुक्त आहे आणि त्या
स प्रत्यगात्म साक्षात्कार होऊन ब्रह्मस्वरूपानंदाचा आत्मस्वरूपानें अनुभव होतो यामुळें सर्व कर्म करणारा आहे ॥ कारण सर्व कर्म
फलभूत सर्व सुखाचा ब्रह्मानंदांत समावेश आहे। याप्रमाणें जेव्हां चित्त शुद्धि न झाल्यामुळें कर्मच करण्यास अधिकार आहे ते
व्हां कर्मच केलें पाहिजे असा जो तृतीयाध्यायीं – न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते – येणेकरून कर्मयोग सांगितला तोच येथें स्प
ष्ट करून दाखविला ॥ पूर्वी सांगितलेले कर्मयोगाचा – कर्मण्यकर्म यः पश्येत् – हा विशेष सांगून प्रपंच म्हणजे विस्तार केला यास्तव तु

[illegible] नाहीं॥ येणेंकरूनच – यस्त्वात्मरतिरेवस्यात् – इत्यादिकेंकरून जो ज्ञान्यास कर्माचा उपयोग नाहीं म्हणून सांगितलें
[illegible] अर्थात प्रपंच केला असें जाणावें॥ याव्याख्येवर नित्य नैमित्तिक कर्माचेठाईं – हें अकर्म – अशी बुद्धि मोक्षहेतु व्हावयास तत्व –
ज्ञानरूप नाहीं यामुळें – तत्तेकर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्षसे ऽशुभात् – यांशीं विरोध येईल आणि कर्मतत्वाचें यथार्थ ज्ञान
[illegible] म्हणून कर्मस्वरूपाचें वास्तविक स्वरूप सांगण्यास प्रवृत्त होऊन कर्माचे ठाईं – हें अकर्म असें मिथ्याज्ञान सांगितलें हें ही विरु
द्ध होईल। कारण अशा मिथ्या ज्ञानानें वास्तविक कर्मस्वरूप समजणार नाहीं आणि अशा मिथ्याज्ञानेंकरून युक्त जो आहे त्या
[illegible] – स बुद्धिमान् मनुष्येषु – अशी स्तुति ही संभवत नाहीं इत्यादिक दोषदृष्टीनें याच्यापेक्षां काय कोणी दुसरी व्याख्या करताती
ती अशी – कर्मणि परमार्थतः आत्मा निष्क्रिय – निष्कल म्हणजे क्रियादिकांनीं रहित असतांही अनाद्यविद्येच्या आवरणानें आ
[illegible] स्वरूपाचे ठाईं आरोपानें भासमान जे देहेंद्रियादिक त्यांचें जे कर्म – विकर्म आणि अकर्म एतद्रूप व्यापार ते ही देहादिकांवरील
तादात्म्याभिमानानें – मीच करतों – असें मानून आत्मा त्याविषयीं प्रवृत्त असतां ही जसे तीरस्थ वृक्षांवर चलन क्रिया नसतां
ही गमन करणाऱ्या नौका तीच्या उपाधीनें नौकास्थ पुरुषांस ते गमन करतात असें भासलें तरी परमार्थतः त्याचे ठाईं चलन नाहीं त्याप्रमाणें
अविद्या संबंधानें ते व्यापार आत्म्याचे ठाईं भासले तरी परमार्थतः आत्म्याचे ठाईं ते व्यापार नाहींत। आत्मस्वरूप निष्क्रिय आहे असे आ
त्मा देहादिकांहून भिन्न आहे – अशा आत्मानात्म विवेक ज्ञानानें जो पाहतो तसाच अकर्मणि म्हणजे – चलगुणवृत्तं – यान्यायें करून म्हण
जे देहेंद्रिय प्राणादिक जे सत्वादिगुण कार्यभूत पदार्थ ते स्वभावें करून कायिक वाचिक मानसिकादिक व्यापाररूप जीं कर्में तीं ही क
रून निरंतर युक्त असतां ही निरंतर गतियुक्त चंद्रतारकादिकांचे ठाईं जसा लोक गमनाभावाचा आरोप करितात त्याप्रमाणे तूष्णीं
स्थितीमध्यें मी उगाच निश्चेष्ट बसलों आहे कांहीं करीत नाहीं असा उक्त व्यापाररूप कर्माभावाचा त्यांवर आरोप लोक करतात
असा आरोप केलेला कर्माभाव – शरीरादिकांवर भासला तरी त्याचे ठाईं उक्त न्यायानें निरंतर कर्म आहे असें [illegible] पाहतो तो मनु
ष्याचे ठाईं बुद्धिमान म्हणजे तत्वदर्शी आणि पूर्वोक्त प्रकारांनी आत्म्याचे ठाईं भ्रांतीनें कर्मस्वरूप व्यापार भासले। निरंतर कर्म

स्वभाव रूप देहेंद्रिया दिक अनात्म्यावर निष्क्रियत्व भ्रांतीने भासते परमार्थतः आत्मा निष्क्रिय आहे। देहेंद्रियादिक निरंतर-
क्रियायुक्तच आहेत असें जो पाहातो त्यास कर्म आणि योग याचे फल जें आत्मतत्वाचें यथार्थ ज्ञान ते झाल्यामुळें तो योगी आणि स
र्व कर्मांचा करणारा अशी त्याचीही स्तुति केली आणि एणेंकरून आत्म्यास निष्क्रियत्वामुळें अकर्तृत्व आहे आणि देहादि संघा
तास क्रियासंबंधानें कर्तृत्व आहे असें अनुसंधान करून कर्में करावीं असें सूचविलें आणि अकर्त्रात्मतत्व ज्ञानानंतर प्रारब्ध
कर्म भोगकरून ज्ञान्यास निषिद्ध कर्मा चरणाने प्रत्यवाय लागत नाही। अज्ञान्यास प्रत्यवाय लागतो। असे ही सूचविल्याने विकर्मा
चें ही स्वरूप सांगितलें। यास प्रमाण। जसा कमलाचे पत्रावर उदकाचा संश्लेष होत नाही तसा आत्मतत्व वेत्त्यास पापकर्माचा
संश्लेष म्हणजे लेप होत नाही अशा अर्थाची श्रुति आणि ज्ञान्याचे ज्ञानापूर्वीच्या संचित पापपुण्यात्मक कर्माचा ज्ञानानें नाश
होतो आणि ज्ञानानंतर झालेल्या त्या कर्मांचा लेप न होतना ही अशा अर्थाचें ब्रह्मसूत्र आहे। असें जर आहे तर भोग केल्या शिवाय को
ट्यावधि कल्पांचे ज्ञातानेही कर्म क्षीण होत नाही अशा अर्थाच्या श्रुतीची काय गति- अशी शंका करूनये ज्ञानाग्नि-सर्व संचित-
क्रियमाण कर्मांचा दाह करतो- अशा श्रुतीवरून ती श्रुति प्रारब्ध कर्माविषयींची आहे अथवा भोग समाधि करण म्हणजे कर्म
करणारासच जो कर्मफलाचा भोग होतो तो आणि व्यधिकरण म्हणजे कर्म न करणारासही त्या कर्माच्या फलाचा भोग होतो असे
भेदानें दोन प्रकारचा आहे। ज्ञानपूर्वी समानाधिकरण भोगानें संचित क्रियमाण कर्मांचा क्षय होतो। ज्ञान्यास विदेह कैवल्य झाले
म्हणजे त्याचा दाय म्हणजे त्याचे पित्याने किंवा त्याणें मिळविलेले द्रव्य त्याचे पुत्राकडे जातें आणि त्याचें संचित क्रियमाण पुण्य
त्याचे सुहृत म्हणजे उपकर्ते जे असतील त्याकडे जातें म्हणजे त्याच्या फलाचा भोग त्यांस होतो आणि त्यानें जे संचित क्रियमाण
पाप असतें तें त्यांचे जे द्वेषी शत्रु त्यांकडे जातें म्हणजे त्याचे फलांचा भोग त्यास होतो असें श्रुतींत सांगितले आहे त्यावरून
ज्ञानानंतर ज्ञान्याच्या संचित क्रियमाण पुण्यपापाच्या व्यधिकरण भोगानें क्षय होतो असें तात्पर्य॥ १८॥ ॥
॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥ श्रीनारायणार्पणमस्तु ॥ ॥ ॥

पूर्वश्लोकांत सांगितल्याप्रमाणें अज्ञान्यास कर्माचे ठाईं अकर्मभावना आणि अकर्माचे ठाईं कर्मभावनाही दृढहोण्यासाठी विद्वानांचे म्हणजे शास्त्राचें जें ज्ञान त्याची स्तुति करतात॥ याफलासाठीं हें कर्म मी करीन-अशी फलेच्छा आणि कर्म करण्याचा संकल्प-यां-हीं करून रहित ज्याचीं सर्व कर्में आहेत आणि त्याकर्मेंकरून चित्तशुद्धि द्वाराप्राप्त झालेलें जें पूर्वश्लोकोक्त ज्ञान तद्रूप अग्नीनें ज्याचीं संचित क्रियमाण सर्व कर्में दग्ध म्हणजे दग्धबीजाप्रमाणें फलदेण्याविषयींचे शक्तीनें रहित झालीं आहेत त्यास ज्ञानी पंडित असें म्हणतात॥१९॥ प्रायश्चित्ताने जसा पूर्वकर्माचा दाह होतो तसा ज्ञानानें ही संचित पूर्वकर्माचाच दाह होईल क्रियमाणाचा दाह होणार नाहीं यास्तव त्याचें फल अवश्य होईल अशी शंका होईल तर त्याविषयीं सांगतात॥ आत्मस्वरूपानंदाचे प्राप्तीमुळें नित्यतृप्त झाल्यानें कर्मफलाचे इच्छेचा त्याग करून अहंकाराचे आश्रयामुळें कर्म होतें यास्तव कर्माचा आश्रय जो अहंकार

यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः॥ ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः॥१९॥

त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः॥ कर्मण्यभिप्रवृत्तोपि नैव किंचित्करोति सः॥२०॥

निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः॥ शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषं॥२१॥

ज्याचा गेला आहे आणि याकारणानें -मी कर्म करतों- असा जो कर्मासंग म्हणजे कर्मकर्तृत्वाभिमान त्याप्रत टाकून स्वाभाविक जें लौकिक कर्म किंवा शास्त्रविहित कर्म त्याविषयीं सर्वांगसाधनानें प्रवृत्त झाला असला तरी तो कांहीं करीत नाहीं म्हणजे त्याणें केलेलें कर्म अकर्मतेप्रत च पावतें अथवा फल देण्यास दग्धबीजाप्रमाणें शक्तिहीन होतें॥२०॥ अशा गौणकर्माचरणा-पेक्षां कर्म नकरणेंच श्रेष्ठ आहे अशी शंका होईल तर कर्माचरण न करणें गृहस्थाश्रमास प्रत्यवायजनक आहे असें व्यतिरेकम्-रवानें दाखवितात॥ विवाहादिकानें होणारा जो स्त्रिया दिकांचा परिग्रह तो ज्याणें सोडला आहे असा जो संन्यासी तो निराशी म्हणजे योगापासून होणारें जें ऐश्वर्य-याचीही इच्छा करीत नसतां यत म्हणजे योगाभ्यासानें निगृहीत किंवा स्वाधीन केलें आहे चित्त म्हणजे मन किंवा बुद्धि आणि आत्मा म्हणजे देहेंद्रियादिकांचा समुदाय ज्याणें असा म्हणजे समाधिकाली बाह्य जें देहेंद्रियादिकांचा

णि आंतर जे मन बुद्धि अहंकार इत्यादि ते ज्याणी निगृहीत केले आहेत असा योगी समाधीपासून जेव्हा उठतो त्या व्युत्थानकाली शरीरस्थ
णजे शरीराचे स्थितीपुरतेंच केवळ भिक्षाटनादिक कर्म करित असतांही किल्बिष म्हणजे — यावज्जीवन आहे तो पावेतो अग्नि...
करावे-दिवसास संध्योपासनादिक कर्म करावे-अशा विधीने निरंतर करावयाचें जे नित्य नैमित्तिक कर्म त्याचा त्याणे विधीने त्याग के
ला आहे या स्तव त्याचें अनुष्टान न करण्याने उत्पन्न होणार पाप त्यास लागत नाही। त्यास तर स्त्रि आदिकांचा परिग्रह आहे तो
फलेच्छा रहित असला तरी आणि पूर्वोक्त -यतचित्तात्मा- असला तरी पूर्वोक्त केवळ शारीर कर्म करणारा नित्य कर्मादिकाचें अ
नुष्टान न केल्यामुळे प्रत्यवाय पावेलच ॥ २१॥ सपरिग्रह म्हणजे यदृच्छा प्राप्त जो आहे यास कुटुंब पोषणादिकाचे व्ययते मुळे
आणि बहुत द्रव्याचा व्यय करून आणि मोठ्या आयासाने सिद्ध होणारे जे अग्निहोत्रादिक कर्मे त्याचें याव जीव म्हणजे जीवन
आहे तों पर्यंत अनुष्टान कसें संभवेल अशी शंका होईल तर त्या विषयी सांगतात। ऋत आणि अनृत या दोहींकरून ब्राह्मणाने उपजीव

यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः॥ समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते॥२२॥

न करावे असे सांगून ऋत म्हणजे उंछ शील अनृत म्हणजे अयाचित असे त्याचें व्याख्यान केलें आहे त्याप्रमाणे यदृच्छालाभ म्हण
जे याचना केल्या वांचून प्रारब्धवशें करून जो झालेला द्रव्यादिकाचा लाभ तेणे करून च संतुष्ट आणि द्वंद्वातीत म्हणजे बहुत लाभ
ने जे सुख किंवा लाभ नसता त्यामुळे जें दुःख तेणे करून रहित आणि विमत्सर म्हणजे दुसऱ्यास लाभ झाल्यामुळें होतो जो संताप तद्र
हित आणि यदृच्छालाभें करून च इष्टिपशु चातुर्मास्यादिक जें नित्य नैमित्तिक कर्म त्याचीजी सिद्धि म्हणजे अनुष्टान किंवा विपरी
त म्हणजे असिद्धि म्हणजे अनुष्टान न होणे या दोहीं करून ही जो सम म्हणजे निर्विकारांतःकरण असा जो गृहस्थाश्रमी तो कृत्वा म्ह
णजे इष्ट्यादिक कर्म करून त्याचे जे फल स्वर्गादिक तेणे करून बंध पावत नाहीं। अपि म्हणजे बंधकरणाऱ्या कर्मांचा नत्वज्ञा
नाने दाह झाल्यामुळे कर्म करून जसा बंध पावत नाहीं तसा इष्ट्यादिक कर्म न करून ही न केल्यामुळे जो प्रत्यवाय म्हणजे पाप
होतें तेणे करून ही बंध पावत नाही। या विषयी न्याय मार्गानेंच त्यास धन प्राप्त होते आणि तत्वज्ञान निष्ठ आणि अतिथिप्रि

म्हणजे अनिर्वचनीय धनाचा त्याग करणारा आणि श्राद्ध करणारा आणि सत्यवादी जो गृहस्थाश्रमी तो ही मुक्त होतो अशा अर्थाची स्मृतिप्रमाण आहे ॥ याचनेवांचून देहनिर्वाहापुरतें मिळालेलें अन्न पुरे अशा अलंबुद्धीनें युक्त आणि शीतोष्णादिक द्वंद्वांनी पीडित झाला तरी खेद न करणारा आणि कोणावर ज्याची वैरबुद्धि नाहीं आणि शरीराचे निर्वाहार्थ होणार जो यदृच्छालाभ तेणेकरून ज्यास हर्ष नाहीं आणि नशा लाभाच्या अभावामुळें ज्यास विषाद नाहीं असा — कर्मण्यकर्म यः पश्येत — या श्लोकांत सांगितलेप्रमाणे कर्मादिकांवर अकर्मादिकांची बुद्धि ज्यास झाली आहे असा संन्यासी — गुणा गुणेषु वर्तन्ते — नैव किंचित्करोमीति — यांत सांगितल्याप्रमाणे परमार्थतः आत्म्यास कर्मादिकांचें कर्तृत्व नाहीं — कर्तृत्वादिक शरीरांत करणांचे धर्म आहेत शरीरादिकांहून भिन्न आत्मा असंग आहे असे जाणून शरीरनिर्वाहोपयोगि भिक्षाटनरूप व्यापार शरीर करीत असतां ही — हे शरीर मी आहें — मी भिक्षाटन करतो — असे अनुसंधान ज्यास नाहीं या कारणामुळे तो संन्यासी अज्ञानकृत आवरणामुळे देहात्मभ्रमयुक्त अज्ञान्याने त्यावर केलेला भिक्षाटनादि कर्म करते

गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ॥ यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥

— अशा आरोपिलेल्या कर्माने किंवा कर्मकर्तृत्वानें बंध होत नाहीं कर्मांचा ज्ञानाग्नीने अज्ञानासह समूल नाश झाल्यामुळे बंधन पावत नाहीं ॥ अशी या श्लोकाची संन्यासीविषयींची व्याख्या श्रीमच्छंकराचार्यांनी भाष्यांत केली आहे ॥ २२ ॥ त्यक्त्वा कर्मफलासंगं — इत्यादि तीन श्लोकांनी — ज्ञानी कर्म करीत असतां ही त्याचें कर्तृत्व त्यास नाहीं यामुळे त्या कर्माचा लेप त्यास होत नाहीं आणि लेप न झाल्यामुळें तो कर्मफलानें बंध पावत नाहीं म्हणजे त्या त्यास कर्मफल प्राप्त होत नाहीं असे जे सांगितले ते ज्ञानाचे प्रतिबंधामुळें प्राप्त होत नाहीं किंवा कर्मांचा फलास हा नाश होतो यामुळे होत नाहीं ॥ त्यांत अंतःकरणवृत्तिरूप ज्ञान क्षणिक आहे यामुळे त्याचा नाश झाल्यामुळे किंवा देहेंद्रिय मनाच्या नाशाने त्याचा नाश झाल्यामुळे विदेहकैवल्यरूप मोक्षप्राप्ती नंतर ही ज्ञानरूप प्रतिबंध गेल्यामुळें मुक्तांस ही अभुक्त कर्मांचा नाश होत नाहीं म्हणून केलेल्या कर्मांच्या फलांचे भोगासाठी पुनः जन्ममरणरूप संसार प्राप्त होईल या शंकेस ज्ञानाने फलासह कर्मांचा नाश होतो असा जो पक्ष त्याचा अंगीकार करून त्याची उपपत्ति सांगतात ॥ त्याकारणास्तव

गत म्हणजे गेला आहे मग म्हणजे कर्तृत्वाभिमान त्याचा असा-ऐसें करून तो कर्म करीत नाहीं याविषयीं उपपत्ति सांगितली-आणि य
ज्ञ जो परमेश्वर-याचे प्रीतीचे उद्देशानें कर्म करितो यामुळे मुक्त म्हणजे ईश्वरप्रीतीवांचून दुसरे कर्मफळाच्या त्या कामना त्यांनीं टाकून दिल्या
त असा-ऐसें करून कर्मफळाचा लेप त्यास होत नाहीं याविषयीं उपपत्ति सांगितली-आणि ज्ञान म्हणजे ब्रह्मात्मभावासंबंधी ज्ञान त्या
चे ठाईं स्थित म्हणजे प्रतिष्ठित आहे चेत म्हणजे बुद्धि ज्याची असा जो ज्ञानी त्याचें समग्र म्हणजे कर्मानंतर होणार फळ किंवा वासना
रूप जे अग्र त्यासह हा कर्म म्हणजे क्रियमाण कर्म प्रविलीयते म्हणजे नाशाप्रत पावते॥ क्रियमाण कर्माचा हा नाश विद्वानाचे दृष्टी
ने कमलपत्रावर उदकाच्या लेशाभावाप्रमाणें कर्माचा आत्म्यास संगन मल्यामुळे वास्तविक लेप न होणे असा जाणावा अथवा
ज्ञान्याचे शुभाशुभ कर्मांचे फळ त्याच्या मित्रांस किंवा शत्रूंस होतें असे पूर्वीं सांगितले आहे त्यावरून त्या कर्माचें फळ देण्याचें सा-
मर्थ्य नाशपावते एतद्रूप जाणावा॥ २३॥ ज्ञान्याचे दृष्टीने आत्म्यास वास्तविक कर्माचा लेप म्हणजे संबंध नाहीं असे जें

ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणाहुतं॥ ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना॥ २४॥

-कर्मसमग्रं प्रविलीयते-असें करून सांगितलें त्याची उपपत्ति सांगतात॥ या सर्व दृश्यमान जगास कारण काळच आहे असें
कोणी म्हणतात॥ कोणी स्वभावच कारण आहे असे म्हणतात॥ कोणी अदृष्ट म्हणजे जीवांनीं केलेले धर्माधर्म तेच कारण म्हणतात
-अशी अनेक वादींची मतें सांगून वास्तविक कारण कोण आहे आणि हें जग कोणापासून उत्पन्न होतें असें तत्त्व समजावयासा
ठीं मननशील मुनि किंवा सर्वदेव ध्यानयोगस्थ होत्साते देव म्हणजे प्रकाशमान जो परमात्मा त्याचे स्वरूपाहून भिन्न नाहीं-
अशी जी त्रिगुणात्मक माया शक्ति ती प्रत पाहते झाले असें श्रुतींत सांगितले आहे आणि हें सर्व द्वैत माया मात्र मिथ्या आहे-
अद्वैत ब्रह्मच सत्य आहे-इत्यादिक अर्थ प्रतिपादन करणाऱ्या श्रुतींचे प्रमाणावरून हें सर्व जग अनिर्वचनीय म्हणजे सत् कि
वा असत् असें निरूपण जीचे होत नाहीं अशा मिथ्या मायेनेंच ब्रह्माचे ठाईं कल्पिलेलें मिथ्या आहे। या जगाची सत्ता ज्या-
ब्रह्माचे ठाईं मायेचे योगानें झाली आहे त्या ब्रह्मसत्तेहून ती निराळी नाहीं असें जाणून ज्या कारणास्तव ते ज्ञानी अर्पण म्हण

जें दर्वीनें अवदान म्हणजे समर्पणकरण्यास साधनभूत मंत्री-दर्वी-स्रुकूम्हणजे पात्रविशेष-ते ब्रह्मचआहे। तसेंच अर्पण करावयाचें जे हवि म्हणजे घृतादिक होमद्रव्य ते ब्रह्मच आहे। जें हुत म्हणजे होमरूप किया ते ब्रह्मच आहे अथवा हुतम्हणजे हवन केलेले देवब्राह्मणादिक ते ब्रह्मच आहेत। जें अग्नीचेठाईं हुत तें ब्रह्मच म्हणजे होमकेला तो ब्रह्माचेच ठाईं होमकेला असा अर्थ। हा अर्थ ब्रह्मणि या पदाचा अध्याहार करून करावा अथवा ब्रह्माग्नौ असे समस्त एकच पद करून ब्रह्मरूप जो अग्नि त्याचेठाईं जें हुत ते ब्रह्मच। म्हणेकरून जांत होमकरतात तो अग्नि ही ब्रह्मच आहे असे सिद्ध होते॥ जें यजमानानें हुत तें ब्रह्मानेच हुत म्हणजे होमकर्ता यजमान ब्रह्मच। याकर्में करून जे फल व्हावयाचे तें ब्रह्मच आणि त्याचेजे शयन करणें-उठणें-बसणें-भोजनकरणें-इत्यादिक सर्व दुसरें कर्म तें ब्रह्मच असी सर्वद्वैतरूप तगाम ब्रह्मसत्ते शिवाय दुसरी सत्ता नाहीं आणि आत्मा ब्रह्माहून भिन्न नाही असे समाधिना म्हणजे समाधीपासून प्राप्त जो स्वात्मतत्वें करून अद्वैत ब्रह्म साक्षात्कार तेणें करून पाहतो। यास्तव प्राप्त होणारें फल आत्मस्वरूपाहून भिन्न आहे असे त्याचे दृष्टीनें नाहीं यास्तव त्याचे सर्व कर्माचा पूर्वोक्त लेप त्यास होत नाहीं॥ हा-आदित्य ब्रह्मच आहे-नाम ब्रह्मच आहे-इत्यादिक तशी आदित्य नामादिकावर ब्रह्मबुद्धि करणे असी उपासना वेदांतसांगितली आहे किंवा शालिग्राम विग्रहादिक प्रतिमावर विष्णुबुद्धि करणें असी उपासना सांगितली आहे त्याप्रमाणें-ब्रह्मार्पणं ब्रह्म हविः-असी कर्मे आणि त्यांची अंगें यांचे ठाईं कर्माचा विलय होण्यासाठी ब्रह्मबुद्धिरूप उपासनाकरावी असे याश्लोकांत सांगितलें असें कोणी व्याख्या करितात। परंतु-कर्मण्य कर्म यः पश्येत्-तसें कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्-म्हणेकरून मोक्षसाधन जें सम्यक् ज्ञान म्हणजे यथार्थ वस्तु ज्ञान ते सांगण्याचा आरंभ करून पूर्वीही ज्ञानकरूनच मोक्ष होतो असे सांगून पुढेंही-श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप-असा ज्ञानाविषयी ना नाना प्रसंशा म्हणजे मोक्षसाधन जें ज्ञान ते सांगण्याची समाप्ति केली आणि-ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति-असी ज्ञानाचीस्तुति ही केली आणि अध्याय समाप्त केला॥ यावरून उपासना सांगण्याविषयीं चें तात्पर्य येथें संभवत नाहीं आणि जर उपास

ना येथे सांगितली असें म्हणावें तर – ब्रह्मैव तेन गन्तव्यं – स्मरण करून ब्रह्मप्राप्तिरूप मोक्ष येथे मागतात। तेव्हां तत्वज्ञानावांचून फल नलत्या-
नाशिवाय मोक्षास दुसरा मार्ग म्हणजे साधन नाहीं असें सर्व संमत आहे। येथे उपासनाजर मागितली तर तें तत्वज्ञान नव्हे मग त्या उपासनेनें ब्रह्म-
प्राप्ति सांगितली तर ते विरुद्ध आहे इत्यादिक दोष त्यांच्या ख्यिवर दाखवून तो भाष्यकारानें दूषित केला आहे॥ २४॥ याप्रमाणे सम्यक्ज्ञान म्हण-
णजे तत्वज्ञान यज्ञरूपच आहे असें सांगून त्याचेंच स्तुतीसाठीं दुसरे यज्ञ सांगतात॥ कोणी कर्मयोगी दैव म्हणजे इंद्र अग्न्यादि देवता यांस-
प्रधान मानून त्यांचेच उद्देशानें दर्शपूर्णमासादिक यज्ञांचें अनुष्ठान करतात॥ दुसरे ज्ञानयोगी सत्य ज्ञानानंदात्मक अद्वितीय जें ब्रह्म तें तत्व-
नरूपानें सर्व कर्मांचा दाह करतें या कारणानें अग्निस्वरूप जें ब्रह्म त्याचे ठाई – यज्ञ म्हणजे देह इंद्रियादिक जे उपाधि त्यांचे योगानें जीवभा-
वा प्रत पावलेलें जें आत्मस्वरूप त्याचा यज्ञ करूनच म्हणजे निरुपाधिक आत्मस्वरूप करून तें जुव्हति म्हणजे महाकाशामध्ये घटाका-
शाचा जसा घटरूप उपाधीच्या त्यागानें लय होतो त्याप्रमाणें देहेंद्रियादिक उपाधीचा त्याग करून – लय करतात म्हणजे निदिध्यासना-

दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते॥ ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुव्हति॥ २५॥
श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुव्हति॥ शब्दादीन्विषयानन्य इंद्रियाग्निषु जुव्हति॥ २६॥

नें त्या ब्रह्मास स्वात्मत्वें करून अनुभवितात॥ यास च ज्ञान म्हणतात। हा सर्व यज्ञामध्यें श्रेष्ठ आहे॥ २५॥ कांहीं बाह्य किंवा आंतर विशे-
ष म्हणजे स्थूल किंवा सूक्ष्म भूतें तशींच ज्ञानेंद्रियें कर्मेंद्रियें एतद्रूप पदार्थ घेऊन त्यांचे ठाईं जें वृत्तीचें नियमन म्हणजे त्या पदार्थांचे
विषईं धारणा – ध्यान आणि समाधि हीं तीन्ही हीं करणें त्यास संयम असें योगशास्त्रांत म्हटलें आहे॥ यम – नियम – आसन – प्रा-
णायाम – प्रत्याहार – धारणा – ध्यान – आणि समाधि अशीं जीं योगाचीं आठ अंगें आहेत त्यांतील यम – नियम – आसन प्राणायाम आ-
णि प्रत्याहार यांपांचा अंगाचे सिद्धीनें धारणा ध्यान समाधिरूप तीन अंगें सिद्ध होतात असें योगशास्त्रांत सांगितलें आहे त्यावरू-
न ज्या हृत्कमलादिक देशाचे ठाईं ध्येय वस्तूचें चिंतन करावयाचें आहे त्या देशाचे ठाईं यम – नियम – आसन – प्राणायाम – आणि
प्रत्याहार या योगाचे पांचा अंगाचे सिद्धीनें जो चित्ताचा बंध म्हणजे एकाग्रता त्यास धारणा म्हणावें॥ त्या हृत्पद्मादि देशाचे ठाईं –

चतुर्भुज-चतुर्मुख-पंचवक्त्रादिक ज्या ध्येय ब्रह्मविष्णु महेश्वरादिकांच्या मूर्ति तदाकार जो अंतःकरणवृत्तीचा निरंतर म्हणजे
ध्येयाशिवाय दुसरी वृत्ति नव्हेतां अविच्छिन्न प्रवाह म्हणजे एकावृत्ती पुढें दुसरी ध्येयाकार वृत्ति होणें तीचे पुढें तिसरी ध्येया
कारवृत्ति होणें अशी परंपरा तीस ध्यान म्हणावें॥ तेंच ध्यान-ध्याता-ध्यान आणि ध्येय असा जो विभाग म्हणजे मी या ध्येयव-
स्तूचें चिंतन किंवा ध्यान करतों असा जो अंतःकरणवृत्तीचा ध्याता ध्यान ध्येयाकार तेणेकरून रहित होऊन-ध्येयमात्राका-
र अंतःकरणवृत्तिप्रवाहरूप झालें म्हणजे-त्यास समाधि म्हणतात॥ अहिंसा-सत्य-अस्तेय-ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह यांस
यम असें म्हणावें॥ प्राणिमात्राचा द्रोह न करणें म्हणजे त्यास दुःख होईल असा व्यापार न करणें यास अहिंसा म्हणावें॥ वाणी-
नें किंवा मनानें खरें बोलणें इत्यादिजें यथार्थ व्यापार करणें त्यास सत्य म्हणावें॥ दुसऱ्याचें स्वामित्व ज्यावर आहे अशा द्रव्यादिक
चा दिल्यावांचून अपहार न करणें त्यास अस्तेय म्हणावें॥ दुसऱ्याचे स्त्रीकडे किंवा वेश्यादिकांकडे पाहणें-तीस स्पर्श करणें-
तीशीं क्रीडा करणें-तीचें-ही चांगली आहे-गुणी आहे इत्यादिक वर्णन करणें-तिशीं गुह्य म्हणजे एकांतीं भाषण करणें किंवा
संकेतरूप भाषण करणें-तीमला विषयस्वार्थ मिळावी किंवा मिळेल काय-कशी मिळेल-असा मनांत संकल्प करणें-तीमला-
मिळेलच किंवा मीती खचीत मिळवीन-असा मनांत निश्चय करणें-तिशीं क्रिया म्हणजे मैथुन करणें-यास अष्टांगमैथुन म्हण
तात। हें अष्टांग मैथुन न करणें यास ब्रह्मचर्य म्हणावें॥ हिंसादिक दोष होतील अशा दोषदृष्टीनें-मिळत असतांही पदार्थां
चा स्वीकार न करणें किंवा स्त्रीचा विवाहरूप परिग्रह केला तर अग्निसाध्य श्रौतस्मार्तादिक कर्मे करावी लागतील यास्तव
विवाह न करणें यास अपरिग्रह म्हणावें॥ शौच-संतोष-तप-स्वाध्याय आणि ईश्वरप्रणिधान यांस नियम असें म्हणावें॥
शारीर आणि मानसिक असे दोन प्रकारचे शौच आहे। शारीर ही बाह्य आणि आंतर या भेदानें दोन प्रकारचें आहे॥ मृत्ति
का जल इत्यादिकें करून जी शारीर शुद्धि तीस शारीर बाह्य शौच म्हणावें॥ पंचगव्यादिक प्राशनेंकरून जी शरीराची शुद्धि
तीस आंतर शारीर शौच म्हणावें॥ मनांतील रागद्वेष काम क्रोधादिक मलाचा त्याग करणें यास मानस शौच म्हणावें॥ जीं-

आपले पाशीं भोगोपकरणें म्हणजे भोग साधन पदार्थ असतील तितक्यावरच अलंबुद्धीने म्हणजे इतकीच पुरे या बुद्धीनें त्याहून अधि
क मिळावी अशी इच्छाच करणे किंवा न होणें त्यास संतोष असे म्हणावे॥ कृच्छ्र - चांद्रायण - इत्यादिकाचें जें अनुष्ठान त्यास तप म्ह
णावे॥ मोक्षप्रद मह्यमंत्राचा जो जप किंवा मोक्षशास्त्राचें जें अध्ययन त्यास स्वाध्याय म्हणावें॥ - साधुवासाधु वा कर्मयद्यत्कृतं
रितं मया॥ तत्सर्वं त्वयिसन्यस्तं त्वत्प्रयुक्तः करोम्यहं - या स्मृतींत सांगितलें प्रमाणे मीजें साधु म्हणजे पुण्य किंवा असाधु म्हण
जे पाप रूप ज्या कर्माचें आचरण केलें तें अंतर्यामी जो तूं त्याचे प्रेरणेने केलें। तें सर्व मी तुला समर्पण करतो असा संकल्प कर
णें अथवा परमेश्वरास केलेले सर्व कर्माचें अर्पण करणे यास ईश्वर प्रणिधान म्हणावें॥ निश्चल आणि सुखरूप करणारी जी अंग
स्थिति तीस आसन म्हणावें॥ तें स्वस्तिकासन - पद्मासन - सिद्धासन - भद्रासन - अर्धासन - गोमुखासन - पश्चिमतानासन - म
त्स्येंद्रपीठासन - मयूरासन - धनुरासन - कुक्कुटासन - नावासन - कूर्मासन - उत्तानकूर्मासन - चक्रासन इत्यादिकभेदानें अ
नेक प्रकारचें आहे॥ त्याचीं लक्षणें आणि फळें योगशास्त्रांत सांगितलीं आहेत॥ तीं विस्तर भयानें येथें लिहीत नाहीं॥ पूर्वोक्त आ
सन सिद्ध म्हणजे स्थिर झालें म्हणजे स्वस्तिकादिक चार आसनानीं। योगमंत्रतंत्रादिक सिद्ध होतें। शेष राहिलेले आसनानीं रो
गादिकाची निवृत्ति होऊन प्राणायाम साध्य होतो॥ दोन्ही नाकपुडींतून वायूचें जें आतगमन तो निश्वास आणि वायूचें जें बाहे
र गमन तो प्रश्वास। या निश्वास आणि प्रश्वास यांचीजी स्वाभाविक नाकपुडींतून आंत जाणे आणि बाहेर येणे असी गमनागम
नोभयरूप गति तिचाजो विच्छेद तो प्राणायाम॥ हें पुढें जे चार प्रकारचे प्राणायाम सांगावयाचे आहेत त्याचें सामान्य लक्षण
आहे॥ तो प्राणायाम रेचक - पूरक - आणि कुंभक या भेदानें तीन प्रकारचा आहे॥ बाह्य वृत्ती म्हणजे नाकपुडींतून वायूचें बाहे
र जाणें तो रेचक। आंतर वृत्ति म्हणजे नाकपुडींतून वायु आंत जाणें तो पूरक। स्तंभवृत्ति म्हणजे आंत वायु स्थिर करणें तो कुंभ
क॥ या तीन प्रकारचे प्राणायामांहून केवल कुंभक या नांवाचा मुख्य प्राणायाम चतुर्थ आहे॥ सांगितलेला तीन प्रकारचाही प्राणा
याम देशदृष्ट काल दृष्ट - संख्यादृष्ट - होऊन नंतर अभ्यासाचे क्रमानें दीर्घ - सूक्ष्म - होतो॥ शास्त्रीप्रमाणें नासाग्रापासून -

प्रादेशमात्र किंवा बाराअंगुळें किंवा एक हात पुढील देशीं जाऊन ठेवलेली जी काडी किंवा कापूस यावर चलन क्रियेनें म्हणजे तें हालले म्हणजे जो एथपर्यंत झाला असा निश्चय होतो— त्यास देश दृष्ट रेचक असें म्हणावें॥ पायाचे तळापासून मस्तकापर्यंत शरीराचे आंत संचार करून तसा संचार झाला असतां असा मुंग्याचा स्पर्श होतो त्याप्रमाणें पायांपासून मस्तकापर्यंत त्याचा स्पर्श अनुभवास आला म्हणजे एथपर्यंत झाला असा ज्याचा निश्चय होतो त्यास देश दृष्ट पूरक असें म्हणावें॥ आपादतल मस्तक पर्यंत देशांत स्थित होऊन रेचकाचा जो देश पूर्वी सांगितला त्या देशीं ठेवलेले तृण कापुसादिकावर हालणें इत्यादिक क्रियेची किंवा पूरकाचा जो आपादमस्तक देश सांगितला त्या देशीं मुंग्यांच्या स्पर्शाप्रमाणें स्पर्शाची अनुपलब्धि— म्हणजे अप्रत्यक्ष किंवा अनुभव न झाला म्हणजे त्यास देश दृष्ट कुंभक असें म्हणावें॥ रेचकादिक इतके क्षणपर्यंत झाला असा निश्चय म्हणजे इयत्ता झाली म्हणजे त्यास काल दृष्ट रेचक-काल दृष्ट पूरक-काल दृष्ट कुंभक -असें म्हणावें॥ निमिष आणि उन्मेष म्हणजे डोळ्याचे पापणीचें उघडणे आणि मिटणे जितके कालानं होतें किंवा लघु अक्षराचें उच्चारण जितके कालानं होते त्या कालाचे प्रमाणास मात्रा असें नांव आहे॥ त्या द्वादश मात्रापर्यंत रेचकादिकानीं एक प्राणायाम होतो॥ त्या रेचकादिक प्राणायामास संख्या दृष्ट असें म्हणावें॥ असा हा प्राणायाम सांगितले देशकालाचे नियमानें प्रतिदिवशीं केलेले अभ्यासानें क्रमें करून कालादिकाचे वृद्धीनें वाढला म्हणजे दीर्घकालपर्यंत त्याची स्थिति होऊन त्यास दीर्घ असें म्हणतात। आणि वायुसंचार फार सूक्ष्म आहे म्हणून त्यास सूक्ष्म असें ही म्हणतात॥ सांगितले प्रमाणें बाह्यवृत्ति आणि आंतरवृत्ति रेचक आणि पूरक त्याचा त्याग करून जो स्वतांच प्राणवायूच्या स्तंभनरूप कुंभक होतो तो केवल कुंभकरूप चतुर्थ प्राणायाम म्हणावा॥ हा प्राणायाम मनें करून जी प्राणायामाची संख्या तीणें करून केला तर त्यास अगर्भ प्राणायाम म्हणावें— आणि प्रणव गायत्र्यादिक याची संख्या मनानें करून केला तर त्यास सगर्भ प्राणायाम म्हणावें॥ अगर्भापेक्षां सगर्भ शंभरपट अधिक आहे॥ असा या यमादिक प्राणायामापर्यंत अंगांनी धारणा ध्यान समाधिरूप जी तीन पुढील अंगें तीं करण्यास मनाची योग्यता होते॥ कारण मनाचा व्यापार प्राणाधीन आहे। प्राणायाम सिद्धीनें या

णा स्थिर झाला म्हणजे मनाचे स्थैर्य होऊन सांगितलेले लक्षणाचे मनाचे धारणा ध्यान समाधि होतात ॥ चक्षुरादिक इंद्रियांचा आप
आपले रूपशब्दादिक विषयांशी संबंध नसतां ध्यानादिकाचे ठाईं चित्ताचा जो आकार म्हणजे वृत्ति तदनुसार जो आकार होतो त्यास
प्रत्याहार म्हणावे ॥ त्या प्रत्याहाराची स्थिरता सिद्ध झाली म्हणजे - भोगास साधन भूत जी इंद्रिये त्यास त्यांचे रंजन करणारे मोह कर
णारे कोप करणारे इत्यादिक विषय लोहचुंबकाप्रमाणे बाहेर आपल्याकडे ओढून नेत असतात ही प्राणायामानें अंतर्मुख केलेल्या
प्रेरक मनाचा बाहेर जाण्याचा प्रतिबंध झाल्यामुळे स्वतः विषयाकडे जाण्याचा विराम होऊन त्याची वशता म्हणजे जय होतो ॥ तं
तर सांगितलेले लक्षणाचा संयम होतो ॥ तो संयम विषय भेदाने आणि फलभेदाने अनेक प्रकारचा आहे असें योगशास्त्रांत-
सांगितले आहे ॥ त्यांतील दोनतीन उदाहरणें दिग्दर्शनार्थ लिहितो ॥ परमेश्वरोपासक मरण पावल्यानंतर त्यास ब्रह्मलो-
कास अर्चिरादिक मार्गाने त्या मार्गातील देवता नेतात ॥ त्या मार्गास देवयान मार्ग म्हणतात । त्या मार्गातील सूर्यमंडलांतला छि-
द्ररूप जो मार्ग त्याचे ठाईं म्हणजे तद्विषयक पूर्वोक्त संयमाने त्या मार्गाचा साक्षात्कार झाला म्हणजे चतुर्दश भुवनांतील सर्व पद
र्थाचे विशेष करून म्हणजे निरनिराळे स्वरूपाने ज्ञान होते ॥ चंद्राविषयीं संयम केला म्हणजे त्या संयमानें नक्षत्ररूप ज्यो
ता म्हणजे तेजें त्यांचा जो व्यूह म्हणजे कोणते नक्षत्र कोठे स्थित आहे - कोणते कोठें स्थित आहे - असा जो त्याचा संनिवेश
त्याचे ज्ञान होतें ॥ ताराचें ज्ञान झालें म्हणजे त्यांतील प्रधान भूत जी निश्चल ध्रुवरूप तारा तीविषयींचे संयमानें ही तारा किं
वा ग्रह इतके कालानें अमुक राशीप्रत जातो असें ज्ञान होतें ॥ याप्रमाणें बाह्य पदार्थाविषयींचे अनेक संयमानें अनेक प्रका
रच्या सिद्धी होतात असें सांगून - केळीच्या कंदाप्रमाणे प्रथम नाभिकंद रूप चक्र उत्पन्न झालें आहे। तें शरीराचे मध्यभागीं-
राहिलें आहे। जसें कदली कंदापासून खाली आणि वर शाखा पल्लव उत्पन्न होतात त्याप्रमाणें नाभिचक्रापासून खालचे प्रदेशीं
आणि ऊर्ध्व म्हणजे वरील प्रदेशीं मस्तक हस्त पादादिक अवयव शरीरास उत्पन्न झाले आहेत ॥ त्या नाभिचक्राविषयीचे सं-
यमानें त्याचा साक्षात्कार झाला म्हणजे - शरीरस्थ म्हणजे शरीरांत राहणारे जे वातपित्त कफ रक्त मांसास्थि मज्जादिक

हार्थ त्याच्या समुदायाचें स्थान होतें। कंठाचें अधोभागीं हृदयपर्यंत कूपाचे आकारासारखें छिद्र आहे त्यास कंठकूप म्हणतात। त्यावि-
षयींचे संयमें करून क्षुधा आणि तृषा यांची निवृत्ति होते॥ असे आंतर पदार्थाविषयींचे जे अनेक संयम त्यांचे अनेक प्रकारचें फळ सां-
गितलें आहे॥ असा जो हा सांगितलेला संयम तोच इंद्रियरूप जीं इंधनें त्यांचा विषयापासून जो प्रत्याहाररूप दाह त्याला कारण आ-
हे म्हणून अग्नीप्रमाणें जो आहे त्या संयमाग्नीचे ठाईं कोणी श्रोत्रादिक इंद्रियांचा होम करतात म्हणजे निरंतर होणारा जो अनाह-
त ध्वनि ज्यापासून कंठतालूचे अभिघातरूप संबंधानें वर्ण उत्पन्न होतात त्यास नादब्रह्म किंवा शास्त्रांतरांत स्फोट असें म्हण-
तात त्याचे ठाईं श्रोत्रेंद्रियाच्या पूर्वोक्त संयम केला म्हणजे दाह्य घंटांचे नाद एवढे नादांचा अनुभव होतो। यामुळें दुसरें बाह्य शब्दा-
चें स्मरण होत नाहीं असें हंसोपनिषदांत सांगितलें आहे त्याप्रमाणें श्रोत्रादिक इंद्रियें आपआपले विषयांचें ग्रहण न करतील अ-
सें पूर्वोक्त संयमानें करतात॥ कोणी म्हणजे यावज्जीव ब्रह्मचर्याचा संकल्प ज्याणी केला आहे असे जे नैष्ठिक ब्रह्मचारी ते त्यास
विषयापासून इंद्रियांचा निग्रह करणें असा जो संयम तोच जो अग्नि त्याचे ठाईं श्रोत्रादिक इंद्रियांचा होम करतात म्हणजे इंद्रियां-
चा निग्रह करणें हेंच मुख्य साधन आहे असें मानितात॥ अशीही याची व्याख्या कोणी करतात॥ शरीरस्थ मूलाधार चक्र ना-
भिचक्रादिक जी चक्रें त्यांतून कोणतेही चक्राचे ठाईं विषयापासून मनाकडून इंद्रियांचा उपसंहार म्हणजे निग्रह करून पू-
र्वोक्त धारणा ध्यान समाधिरूप मनाचा संयम करण्याविषयीं जे समर्थ नाहींत असे आणि इंद्रियांचे चिंतन करून दाहामध्यं-
तरीं स्वर्गादिकाचे ठायी स्थिति होते असें वायुपुराणांत त्यांविषयी फल सांगितलें आहे असे इंद्रियचिंतक कोणी श्रोत्रादिक
इंद्रियरूप अग्नीचे ठाईं शब्दादिक विषयांचा होम करतात म्हणजे मनाकडून सर्व इंद्रियांनीं आपआपले विषयांचें ग्रहण न-
केलें म्हणजे तोच समाधि आणि पूर्वी सांगितले प्रमाणें विषयांकडून सर्वेंद्रियांच्या मन आदिकाचे ठाईं धारणा ध्यान स-
माधीनीं उपसंहार करण्याचें प्रयोजन नाहीं असें मानितात॥ दुसरे गृहस्थाश्रमी श्रोत्रादिक जीं इंद्रियें तद्रूप जो अग्नि त्याचे ठा-
ईं शब्दादिक विषयांचा होम करतात म्हणजे विषयभोग करीत असतांही त्याविषयीं आसक्त होत नाहींत। अशीही याची

ख्यारव्या कोणी करतात ॥ २६ ॥ दुसरे कोणी योगी श्रोत्र त्वक चक्षु रसन घ्राण रूपनी पांच ज्ञानेंद्रियें आणि त्यांचीं जी शब्दश्रवणें-शीतोष्णस्पर्श समजणें-रूपपाहणें-मधुराम्लादिकरसाचा स्वादघेणें-गंध घेणें इत्यादिक कर्में तशींच वाक्पाणिपादपायू उपस्थ अशीं जी पांच कर्मेंद्रियें आणि त्यांचीं जी बोलणें-देणें घेणें-चालणें-मल निःसरणकरणें-मूत्ररेताचें निःसरणकरणें इत्यादिक कर्में तशींच बाहेर जाणें-अन्नादिकास खालीं नेणें-शरीरादिकाचे किंवा अवयवांचें आकुंचनकरणें-वरनेणें-शीतोष्ण समानकरणें-ढेकर देणें-नेत्रादिकाचें उन्मीलन निमीलन इत्यादिक म्हणजे उघडणें मिटणें-क्षुधा उत्पन्न करणें-जांभई येणें-शरीर मृत झालें तरी त्यास न सोडणें-अशीं जी प्राण अपान व्यान उदान समान रूप मुख्य प्राण आणि नाग-कूर्म-कृकर-देवदत्त-धनंजय रूप उपप्राण अशा दशविध प्राणाचीं जीं कर्में या सर्व इंद्रियप्राण कर्मांचा आत्मा देहेंद्रिय मनोबुद्धीहून निराळा त्याचा साक्षिभूत आहे अशा ज्ञानानें दीपित म्हणजे प्रकाशपावलेला जो आत्मसंयम योगाग्नि म्हणजे पूर्वोक्त

सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणिचापरे ॥ आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥

जो बुद्धि संयम तद्रूप जो योग म्हणजे समाधि तद्रूप अग्नि त्याचे ठाईं हवन करतात म्हणजे पूर्वोक्त सर्व कर्मांचा लय करून समाधिस्थ राहतात ॥ पूर्वीं जे इंद्रियचिंतक योगी सांगितले त्याच्या मनांचा लय न झाल्यामुळें मुमुक्षु प्राणें त्यांच्या प्राणांचा लय न होतां श्वासोच्छ्वासादिक कर्म करीत असतां प्राण राहतो ॥ आतां जे सांगितले ते बुद्धि योगी त्यांच्या मनांचा समाधीचे योगानें लय झाल्यामुळें त्याकाली त्यांच्या प्राणांचाही उपसंहार होतो म्हणजे प्राणाचे जे व्यापार ते त्या वेळेस त्याचे होत नाहींत। याबुद्धि योग्याची बुद्धि बोद्धव्य विषय नसल्यामुळें म्हणजे विषयाकार वृत्ति न झाल्यामुळें ती बुद्धि लीन होऊन समाधि बुद्धिमात्र असते परंतु तेव्हां आत्मा बुद्ध्यादिकांहून निराळा आहे असें ज्ञान नसतें आणि अद्वैतात्म्याचे ठाईं बुद्धीचा उपसंहार होत नसतो ॥ हे बुद्धि चिंतक दाहा हजार मन्वंतरें स्वर्गास राहतात असें वायुपुराणांत सांगितलें आहे। यास्तव के पूर्वोक्त इंद्रिय चिंतक योग्यांपेक्षां विशेष श्रेष्ठ आहेत ॥ २७ ॥

याप्रमाणें तीन श्लोकांनीं पंचयज्ञ सांगितले। आतां एका श्लोकानें पंचयज्ञ सांगतात॥ द्रव्यानें साध्य होणारे जे परोपकारार्थ वापी-कूप-तडाग- आराम-म्हणजे बाग-तीर्थांचे ठायीं यज्ञवेदी दान म्हणजे घाट बांधणें इत्यादिक करणें ते च आहे यज्ञ ज्यांचे असे जे ते द्रव्य यज्ञ आणि पूर्वीच सांगितले आहेत यास्तव येथें सांगितले नाहींत ते यज्ञ घ्यावे आणि तप म्हणजे कृच्छ्र चांद्रायण मासोपवासादिरूप तेंच आहे यज्ञ स्वधर्मी ज्यांच्या असे जे ते तपोयज्ञ आणि योग म्हणजे तृतीयाध्यायांत सांगितलें जें कर्मकर्तृत्वाभिमानाचा आणि फलेच्छांचा त्याग करून नित्य नैमित्तिक संध्यावंदनादिक निर्विकल्प समाध्यंत कर्माचें अनुष्ठान करणें असा जो कर्मयोग तोच आहे यज्ञ ज्यांचा असे जे योगयज्ञ अथवा पूर्वोक्त चित्तवृत्तिनिरोध करणें असा जो यमनियमादिक अष्टांगयोग तोच आहे यज्ञ ज्यांचा असे जे योगयज्ञ आणि स्वाध्याय म्हणजे वेदांचें नित्य अध्ययन करणें हाच आहे यज्ञ ज्यांचा ते स्वाध्या-

द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे। स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः॥२८॥

अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे॥ प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः॥२९॥

य म्हणजे वेदाध्ययनाविषयीं निरंतररत आणि ज्ञान म्हणजे वेदार्थाचा पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा यांनीं जो विचार तोच आहे यज्ञ ज्यांचा ते ज्ञानयज्ञ स्वाध्याययज्ञ आणि ज्ञानयज्ञ असे जे ते स्वाध्यायज्ञानयज्ञ असा समास करून या दोन यज्ञांचा या वाक्यापासून बोध होतो॥ असे जे उत्तम प्रकारचें तीक्ष्ण आहे व्रत म्हणजे अहिंसादिक व्रत ज्यांचे असे जे पूर्वोक्त द्रव्ययज्ञादिक यांचे प्रकारचे यति म्हणजे यज्ञशील असे ही कोणी आहेत॥२८॥ आतां अकरावा यज्ञ सांगतात॥ कोणी अधोवृत्ति जो अपान वायु त्याचे ठायीं ऊर्ध्ववृत्ति जो प्राण त्याचा पूरके करून होम करतात म्हणजे पूरक समयीं प्राण आणि अपान यांस एकत्र करून पूरकाख्य प्राणायाम करतात॥ कोणी प्राणाचे ठायीं अपानाचा होम करतात म्हणजे रेचक समयीं अपान आणि प्राण एकत्र करून रेचकाख्य प्राणायाम करतात॥ कोणी मुख आणि नासिका यावरून बाहेर जाणे-ही प्राणाची गति-तसें गमन न करतां जें अधोगमन-ही अपानाची गति-या ज्या प्राणापानांच्या गती त्यांचा कुंभकानें रोध करून रोध केलेले प्राणायामाविषयीं तत्पर होतात म्हणजे कुंभकाख्य प्राणायाम करतात॥२९॥

आ यांच्यावा यज्ञसांगतात ॥ कोणी नियुहीत म्हणजे जिंकला आहे विषय भोग रूप आहार ज्यांनी असे म्हणजे वैराग्यवंत ते अंतः करणाक यांस
वे इंद्रियांस प्राण म्हणतात त्यांतील प्राण म्हणजे मन चित्त अहंकार रूप अंतःकरणाचे वृत्तिभेद त्याचे ठाईं प्राण म्हणजे श्रोत्रादिक पांच ज्ञानें
द्रियें आणि वाणी आदिक पांच कर्मेंद्रिये यांचा होम करतात। म्हणजे संकल्प विकल्पात्मक वृत्तिरूप मनाचे ठाईं श्रोत्रादिक इंद्रियां
चा लय करून नंतर स्मरणात्मक वृत्तिरूप चित्ताचे ठाईं मनाचा लय करून - नंतर अभिमानात्मक वृत्तिरूप अहंकाराचे ठाईं चित्ता-
चा लय करतात ॥ याप्रमाणें इंद्रियांच्या वृत्ती रुद्धा सर्व वृत्तींचा लय झाला म्हणजे अभिमान ठेवण्यास विषय नाहींसा होतो म्हण
जे इंधन नसलीं म्हणजे वन्हि जसा जाग्यावरच लीन होतो त्याप्रमाणें अहंकाराचाही लय होतो ॥ या लयास सव समाधि असें ते मा-
नितात यामुळे त्यास अभिमानिक असें म्हटलें आहे ॥ हे अभिमानिक पूर्वोक्त बुद्धियोग्यांपेक्षा निकृष्ट आहेत या कारणावरून अभिमानि
क सहस्र मन्वंतरे पर्यंत स्वर्गास राहतात असे वायुपुराणात सांगितलें आहे — दुसरे कोणी आहारकर्मा करण्याचा अभ्यास करीत

अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुव्हति ॥ सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥

त्याते प्राणाचे ठायीं इंद्रियांचा होम करतात म्हणजे इंद्रिये क्षीण झालेल्या कारणानें इंद्रियवृत्तींचा लय होऊन प्राणमात्र राहतो त्यास
वरच होमाची भावना करतात। अथवा दुसरा प्राणायाम परायण जसमतां उदरांतील दोन भाग अन्नानें पूर्ण करावे एक भाग अन्नें पूर्ण-
करावा व चवथा भाग प्राणवायूचे संचारासाठीं ठेवावा असे योगशास्त्रांत सांगितले आहे त्याप्रमाणें आहाराचा म्हणजे भोजनादिका
चा नियम करून कुंभकानें पूर्वोक्तप्रमाणे प्राणापानाच्या गतीचा रोध करून इंद्रियांचा प्राणाचे ठाईं होम करतात म्हणजे कुंभका
चे ठाईं सर्व प्राण एकत्र झाले म्हणजे त्यांतच इंद्रियेंही स्वतां वलीन म्हणजे वृत्तिरहित होतात यास्तव प्राणाचे ठाईं इंद्रियांचा हो
म असा भावना करतात ॥ अशी भावना करण्यास - सर्वदा योगाच्या अभ्यासें करून जशी जशी स्थिरता होते तशी तशी वाणी-
शरीर - दृष्टि इत्यादिकांचीही स्थिरता होते असें योगशास्त्रांत सांगितले आहे ते प्रमाण आहे ॥ अशीही याची कोणी या-
ज्या —— करतात ॥ हे सर्वही यज्ञवेत्ते म्हणजे सांगितले ले त्या त्या यज्ञाचें अनुष्ठान करणारे आणि यज्ञें करून नाश पावलें

आहे कल्मष म्हणजे पाप ज्यांचें असे सांगितलेले सर्वही यज्ञ पापक्षय करणारे आहेत। साक्षात् मोक्षास साधन नाहींत असें तात्पर्य
॥ ३०॥ या सांगितलेले यज्ञांवरून कोणताही यज्ञ जे करीत नाहींत त्यांविषयीं सांगतात। पंचमहायज्ञादि केल्यानंतर अवशिष्ट राहिलेले
काल्यांत किंवा अवशिष्ट राहिलेलें जें अमृतरूप अन्न त्याचें भक्षण करणारे जे तेही चित्तशुद्धीद्वारा सनातन जें ब्रह्म त्याप्रत
पावतात म्हणजे मुक्त होतात ॥ पूर्वोक्त द्वादश यज्ञांतून कोणतेही यज्ञाचें अनुष्ठान जो करीत नाहीं त्यास अयज्ञ म्हणावें त्या अयज्ञास ज्यांत अल्प सुख आहे असा हाही मनुष्यलोक नाहीं। मग हे कुरुश्रेष्ठा अर्जुना अन्य म्हणजे स्वर्गलोक किंवा मोक्षस्वरूप ब्रह्मलोक कोठून होईल ॥ ३१॥ ज्ञानयज्ञाची स्तुति करण्याकरतां सांगितलेले यज्ञ संगणाची समाप्ति करतात। याप्रमाणे-
बहुत प्रकारचे यज्ञ ब्रह्म म्हणजे वेद त्याचे मुखाचे ठाईं वितत आहेत म्हणजे वेदाचे द्वाराने गुरूंनी उपदेशाद्वारा विस्तार केलेले आहेत। ते सर्व कायिक वाचिक मानसिक जीं कर्में म्हणजे व्यापार त्यांपासून उत्पन्न होणारे आहेत। नैष्कर्म्य रूप नाहींत। असें समज

यज्ञशिष्टामृतभुजो यांति ब्रह्म सनातनं॥ नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम॥ ३१॥
एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे॥ कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे॥ ३२॥
श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप॥ सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते॥ ३३॥ ॥

म्हणजे तत्त्वज्ञानद्वारा या अशुभ संसारापासून मुक्त होशील ॥ ३२॥ ज्या मार्गीं हे सर्व यज्ञ सांगितले त्या ज्ञानयज्ञाची स्तुति करतात॥ द्रव्य म्हणजे बाह्याभ्यंतर जें देहेंद्रिय मन आदिक त्यापासून साध्य म्हणजे त्यांचे व्यापारापासून होणारा असा। द्रव्यमय यज्ञापेक्षां-जें ज्ञान झालें म्हणजे काय-वाणी-मन-यांचे प्रवृत्तीचा उपरम होतो तद्रूप ज्ञानयज्ञ-श्रेयान् म्हणजे फार श्रेष्ठ किंवा प्रशस्त आहे॥ श्रेयः असें न म्हणतां श्रेयान् असें म्हटलें यावरून द्रव्यमय यज्ञ प्रशस्त आहेत परंतु हा ज्ञानयज्ञ फार प्रशस्त आहे असें सुचविलें॥ अखंड ब्रह्माकार मनोवृत्तिरूप ज्ञान हीं मनाचे व्यापारापासूनच उत्पन्न झालें आहे अशी येथे शंका होते परंतु केवळ इतर यज्ञाप्रमाणें जडस्वरूप मनोवृत्तिमात्र ज्ञान नव्हे॥ त्या वृत्तीचे ठाईं अभिव्यक्त म्हणजे प्रतिबिंबित झालेलें ब्रह्मचैतन्यच मुख्य

ज्ञान आहे। त्याचे संबंधानें वृत्तीवर ज्ञान असा व्यवहार होतो तो गौण आहे। तें ब्रह्मरूप ज्ञान वृत्तींत अभिव्यक्त मात्र होतें। तें को-
णापासून उत्पन्न होत नाहीं। तें नित्य आहे। वृत्ति उत्पन्न झाली म्हणजे ज्ञान उत्पन्न झालें। वृत्ति नष्ट झाली म्हणजे ज्ञान नष्ट झा-
लें— असा जो व्यवहार होतो तो गौणच आहे या स्तव ज्ञानमय यज्ञास द्रव्यमय यज्ञापेक्षां विशेष आहे॥ याविषयीं हेतु सां-
गतात॥ हे शत्रूंस ताप देणाऱ्या अर्जुना फलासकट सर्व कर्म ज्ञानांत येऊन समाप्यते म्हणजे लीन होतें किंवा अद्वितीयानं-
दानुभवरूप ज्ञानफलांत सर्व कर्मांचे फलांचा समावेश होतो॥ ३३॥ तें ज्ञान प्राप्त होण्यास साधनें सांगतात॥ जे ब्रह्मात्म-
परोक्षज्ञानी आहेत त्यांस दंडवत् नमस्कार करावा आणि त्यांची भक्तीनें सेवा करावी। नंतर हा संसार मला कोठून प्राप्त झाला आणि याची निवृत्ति
कशी होईल आणि मी कोण आहें असा आत्मस्वरूपाविषयीं प्रश्न करावा म्हणजे ते तत्त्वज्ञानी तुला महावाक्यादिकें करून ब्रह्मात्मज्ञानाचा उप-
देश करतील॥ येणेंकरून भगवान् कृष्ण ज्ञान सांगत असतांही आणि ज्ञानोपदेश करण्यास समर्थ असतांही आत्मस्वरूपाचे विज्ञाना-

तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया॥ उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः॥ ३४॥
यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव॥ येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि॥ ३५॥

साठीं म्हणजे ब्रह्मतें करून आत्मापरोक्षज्ञानासाठीं मुमुक्षूंनीं समित्पाणि होऊन श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ जो ब्राह्मण त्यापाशीं ज्ञानोपदेशा-
र्थ जावें असा जो श्रुतींत विधि आहे त्यास गुरूपसत्ति म्हणतात ती अवश्य केली पाहिजे असें सूचविलें॥ ३४॥ ज्ञानाचें फल सांगतात॥
त्या तत्त्ववेत्या ब्राह्मणांनीं उपदेशिलें त्या अद्वितीय–अखंड–आणि सच्चिदानंदरूप अशा ब्रह्माप्रत स्वात्मत्वेंकरून अनुभवात्मक ज्ञा-
नानें जाणलें म्हणजे हे पंडुपुत्रा अर्जुना तूं आतांप्रमाणें पुनः मोहाप्रत पावणार नाहींस आणि त्याप्रकारचे ज्ञानानें ब्रह्मादिस्तं-
बपर्यंत सर्व भूतांप्रत आत्मनि म्हणजे देहेंद्रियादिक रूप उपाधिरहित जें महावाक्यांतील त्वंपदाचें लक्ष्य चिन्मात्र जीव-
स्वरूप त्याहून अनन्य म्हणजे भेदशून्य जो महावाक्यांतील तत्पदाचा लक्ष्य माया आणि तन्मूलक जें तिचें कार्यभूत जगत्कारणत्वा-
दिक उपाधिस्वरूप तेणेंकरून रहित जो चिन्मात्रस्वरूप मी परमेश्वर त्याचें ठायीं पाहशील॥ यास अंतर्यामी परमेश्वराचें स्वरू-

सांगण्याचा आरंभ करून या अंतर्यामी परमेश्वराहून भिन्न द्रष्टा-श्रोता-विज्ञाता-मंता-जीव नाहीं अशा अर्थाची जीवेश्वरभेदा
चा निषेध करणारी श्रुति प्रमाण आहे॥ सर्वभूतांमत आत्मनि म्हणजे हीं मजसे ठायींच आहेत अशा प्रत पाहशील। अथो म्हणजे आणि म
यि म्हणजे मी जो वासुदेव त्याचे ठायींच आहेत अशा प्रत पाहशील म्हणजे सर्वोपनिषदांत सांगितलें जे क्षेत्रज्ञ जो जीव आणि ईश्व
र त्यांचें ऐक्य त्या प्रत पाहशील असा याचा अर्थ भाष्यांत केला आहे ॥ ३५॥ जरी तूं सर्व पाप करणारांपेक्षां मोठा पाप करणारा अस
लास तरी मोक्षास प्रतिबंधक जो पुण्य पापरूप समुद्र त्या प्रत ज्ञानरूप नौकेनें तूं तरशील ॥ ३६॥ जसा प्रदीप्त झालेला अग्नि का
ष्ठांस जाळून भस्म करतो त्याप्रमाणे ब्रह्मात्मसाक्षात्काररूप जें ज्ञान तद्रूप अग्नि संचित आणि क्रियमाण या कर्मांप्रत जाळून भ

अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः॥ सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि॥ ३६॥
यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन॥ ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा॥ ३७॥
नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते॥ तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति॥ ३८॥
श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः॥ ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति॥ ३९॥

स्म करतो। प्रारब्ध कर्माचा क्षय भोगें करून च शास्त्रांत सांगितला आहे॥ ३७॥ ज्ञानासारखें पवित्र म्हणजे पावन किंवा शुद्धि क
रणारें दुसरें तप योग तीर्थादिक कांहीं नाहीं। तें ज्ञान समाधिरूप योगाभ्यासें करून किंवा निष्काम कर्मानुष्ठानें करून संसिद्ध म्हणजे
ज्ञान प्राप्त होण्यास चित्तशुद्ध्यादिकरूप योग्यता पावलेला जो पुरुष तो कालें करून म्हणजे चिरकालें करून पावतो॥ ३८॥ ज्ञा
साधनीं तें ज्ञान अव्यभिचारानें प्राप्त होतें तीं साधनें सांगतात॥ जो श्रद्धालु असून तत्पर म्हणजे आत्मपरायण आणि आ
त्मपरायण असतांही जितेंद्रिय असा जो तो ज्ञानाप्रत पावतो म्हणजे ज्ञानवान् होतो॥ आणि ज्ञान प्राप्त झाल्यानंतर मोक्षरूप
शांति म्हणजे विदेहकैवल्याप्रत पावतो॥ ३९॥

अज्ञ म्हणजे आत्मज्ञान रहित आणि अश्रद्धान म्हणजे अश्रद्धा नेत्र [illegible] आणि संशयात्मा म्हणजे संशयी असा जो आहे तो नाशपावतो पर-

तु जो अज्ञ आहे त्यास बोध करण्यास फार आयास लागत नाहीं। जो अश्रद्धारहित आहे त्यास बोधकर[illegible] जो संशयात्मा

आहे त्यास बोध होणें असाध्यच आहे। कारण जे आपले मित्र रुद्धत आहेत त्यावरही-हेखरे मा[illegible] नाहींकिंवा आपली प्रतारणाकरतात असा

ज्यास संशय आहे त्यास हालोक नाहीं आणि सर्वांस प्रमाण असे जे वेद त्यावरही त्याच्या प्रमाण्याविषयी त्यास संशय असल्यामु-

ळे त्यास परलोक ही नाहीं॥ आणि सर्वदा संशयानें व्यापल्यामुळे त्यास सुख होणार नाहीं या साठी संशय धरूं नये॥ ४०॥ आणि योगम्ह-

णजे-कर्मण्य कर्मयः पश्येत्-येणे करून जो ज्ञानरूप योग [illegible] कर्म स्वरूपत. सन्यस्त म्हणजे टाकि-

लीं आहेत कर्मे ज्याणें म्हणजे कर्मांचा किंवा फलाचा त्याग करणारा [illegible] आणि [illegible] ज्ञानानें छिन्न म्हणजे नाशपावले आ-

अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति॥ नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः॥ ४०॥

योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयं॥ आत्मवंतं न कर्माणि निबध्नंति धनंजय॥ ४१॥

तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनाऽऽत्मनः॥ छित्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत॥ ४२॥

इतिश्री मद्भगवद्गीतासूपनिषत्सु योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानयोगोनाम चतुर्थोऽध्यायः॥

हेत-आत्मा देहच किंवा देहाहून भिन्न-देहाहून भिन्न असला तरी विभु म्हणजे महत्परिमाणाचा व्यापक किंवा अल्पपरिमाणाचा-

विभु असला तरी कर्ता भोक्ता किंवा अकर्ता-अभोक्ता-अकर्ता अभोक्ता असला तरी एक किंवा भिन्नशरीरी भिन्न-भिन्न किंवा एक अस-

ला तरी सगुण किंवा निर्गुण-इत्यादिक संशय ज्याचे असा जो आत्मवान् म्हणजे शमदमादि साधनयुक्त त्यास त-हे धनंजया अर्जुना

कर्मे बद्ध करीत नाहींत॥ ४१॥ तस्मात् या कारणास्तव अज्ञानापासून उत्पन्न झालेला हृत्स्थ म्हणजे बुद्धींतील जो हा संशय याप्र-

त ब्रह्मात्मज्ञानरूप जो खड्ग तेणेकरून छेदून मोक्ष साधन जें सर्वाहून उत्तम ब्रह्मात्मापरोक्षज्ञान त्यास साधन जें निष्कामकर्म ते

कर आणि युद्धार्थ ऊठ॥ ४२॥ इतिश्री मद्भगवद्गीतावां रघुनाथशास्त्रिकृत भाषा विवृतौ चतुर्थोऽध्यायः समाप्तः॥ ४॥

तृतीयाध्यायीं — लोकेस्मिन् द्विविधा निष्ठा — एणें करून एकच ब्रह्मनिष्ठा अधिकारिभेदानें ज्ञाननिष्ठा आणि कर्मनिष्ठा याप्रका
रानीं दोन प्रकारची असें सांगण्यास आरंभ करून — न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते — एणें करून कर्मनिष्ठा ज्ञाननिष्ठेस अंग
म्हणजे साधन आहे असें — कर्मण्येवाधिकारस्ते — इत्यादिकें करून सांगितलें ॥ चतुर्थाध्यायीं ज्यास अपरोक्ष ब्रह्मात्मतत्त्वाचें ज्ञान
झालें त्यांणी केलेलें कर्म ज्ञानानें आत्म्यास अकर्तृत्व आल्यानें अकृतच होतें यास्तव त्यांणीं व्यर्थ लौकिक व्यापारात्मक चेष्टाप्रमा
णें कर्म करावें किंवा सन्यास करावा असें त्यांविषयीं अनास्थेने सांगितलें ॥ आतां पुढें पंचम आणि षष्ठ या अध्यायांनीं अज्ञानी
असून जो ज्ञानार्थी आहे त्याणें वैराग्य उत्पन्न होण्यापूर्वी चित्तशुद्धीसाठीं कर्मच करावें। वैराग्य उत्पन्न झालें म्हणजे वेदांतवि
चारें करून ज्ञान उत्पन्न होण्यास प्रतिबंधक कर्माचा विक्षेप नव्हावा यासाठीं कर्मसन्यास करून ज्ञानयोगाचें अनुष्ठान करावें असें सांग
तात ॥ त्यांत चतुर्थाध्यायीं — त्यक्तसर्वपरिग्रहः — एणें करून सन्यास सांगितला आणि — छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत

अर्जुन उवाच ॥ संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ॥
यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितं ॥ १ ॥ श्रीभगवानुवाच ॥

— एणें करून कर्म कर असें सांगितलें हें परस्पर विरुद्ध आहे। यांचें अनुष्ठान एककाली मी एकट्यानें करण्यास — बसणें आणि
उठणें — या दोन क्रियेचें एककालीं अनुष्ठान एके पुरुषानें करण्यास जसें दुर्घट आहे त्याप्रमाणें दुर्घट आहे असें मनांत आणून अ
र्जुन प्रश्न करतो। हे पापाचें कर्षण म्हणजे नाश करणाऱ्या कृष्णा ॥ ज्ञानार्थी जो मी या प्रत कर्माचा सन्यास आणि योग म्हणजे कर्म
या दोहोंप्रत करण्यास पुनः सांगतोस हें विरुद्ध कर्म सांगतोस ॥ दोहोंचें विरुद्ध अनुष्ठान आतांच मला सांगतोस असें नाहीं। व
र कर्ता जो तूं त्याणें वेदांतही पूर्वी — हा ब्रह्मस्वरूप जो संन्याशांस प्राप्त होण्याचा लोक त्याची इच्छा करणारे जे ते प्रव्रज्या म्हणजे स
न्यास करतात। ज्यांत सार नाहीं असा जो हा संसार या प्रत पाहून सार कोणतें तें पाहावें अशा इच्छेनें मोठें वैराग्याचा आश्रय ज्यां
णीं केला आहे असे जे विरक्त ते विवाह न करतांच प्रव्रज्या म्हणजे सन्यास करतात — ब्राह्मण वेदांचें अनुवचन म्हणजे अध्ययन

तसाच यज्ञ तप दान इत्यादिक कर्मांनी याचर ब्रह्मरूपानें ज्ञान व्हावे असी इच्छा करतात म्हणजे ज्ञानेच्छा होण्यासाठी कर्माचें अनु
ष्ठान करतात–अशा अर्थाच्या श्रुती ही परस्पर विरुद्ध संन्यास आणि कर्म हें दोन्ह सांगितले आहेत असे पुनः या पदानें सूचविलें ॥ वेदोक्त
दोन्ही आहेत तेव्हां दोन्ही प्रशस्त जरी आहेत तथापि यादोहोंत जे मला कल्याण कारक फार प्रशस्त असेल तें एक मला–हें चांगलें कि
वा हें चांगले–असा संशय नसण्या जोगें निश्चय युक्त सांग ॥१॥ अर्जुनानें केलेल्या प्रश्नाचे सर्वज्ञ भगवान कृष्ण उत्तर सांगतात ॥ सन्यास
आणि कर्मयोग हे ज्ञानोत्पत्तीस साधन आहेत यामुळे दोन्हीही निश्रेयस्कर म्हणजे उत्तम कल्याण करणारेच आहेत तथापि त्यांम
ध्यें कर्म सन्यासा पेक्षां कर्मयोग विशिष्ट म्हणजे श्रेष्ठ आहे ॥ तात्पर्य ॥ चतुर्थाध्यायाचे शेवटीं जो मी–आतिष्ठोत्तिष्ठ भारत–ए
णेकरून तुला कर्मयोग सांगितला तो देहादिकाहून आत्मा भिन्न आहे–देह आत्मा नव्हे–असे आत्मानात्म विवेक ज्ञान उत्पन्न
होऊन ज्यास संसाराविषयीं किंवा देहादिका विषयीं वैराग्य उत्पन्न झाले आहे असा जो ज्ञानयोगाचा अधिकारी त्याविषयीं सांगि

संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ॥ तयोस्तु कर्मसंन्यासात् कर्मयोगो विशिष्यते ॥२॥

तला नाहीं ॥ देहादिकच आत्मा आहे–हा उत्पन्न होतो नाश पावतो–असा जो तूं किंवा तुझे सारखा दुसरा कोणी अविवेकी त्यास
देहात्म बुद्धीने झालेला किंवा होणारा जो बंधु आदिकाचे नाशामुळें शोकमोह त्यामुळें झालेला जो पूर्वोक्त संशय त्याचा ज्ञान
रूप खड्गानें नाश व्हावया साठी कर्मानुष्ठान करून चित्त शुद्धीचे द्वारा आत्मानात्म विवेक उत्पन्न होऊन वैराग्य व्हावें यासा
ठीं कर्म कर असें सांगितलें ॥ कर्मानुष्ठानें करून चित्तशुद्धि वैराग्यादिक साधनानें आत्मतत्व ज्ञान झाल्यानंतर त्या ज्ञानाचा
परिपाक होऊन जीवन्मुक्ति स्वरवानुभव व्हावा या साठीं त्यास विक्षेप करणाऱ्या कर्मांचा सन्यास करावा असें पूर्वी सांगितलें ॥ या
दोहोंमध्यें सन्यास हा प्रधान आहे। कर्मयोग अंग आहे। यामुळें कल्याणार्थ्यानें तो करावा किंवा हा करावा असा विकल्प होत नाहीं ॥ दोन्ही
ही साधनें स्वतंत्रपणानें परस्परांची अपेक्षा न करतां सारखीं असलीं तरच पूर्वोक्त विकल्प होतो। या स्तव ज्यास वैराग्यादिक नाहींत त्यास
चित्तशुद्धीचे द्वारा ज्ञान प्राप्त होण्यास सन्यासा पेक्षां कर्मच प्रशस्त आहे। ज्यास चित्तशुद्धि द्वारा वैराग्यादिक प्राप्त होऊन आत्मतत्व

न झालें आहे त्यास ज्ञानपरिपाक जीवन्मुक्तिसुखादिकार्थ कर्मापेक्षां सन्यासच श्रेष्ठ आहे ॥ २ ॥ हाच तात्पर्यार्थ कारण दाखऊन स्पष्ट क-
रून दाखवितात ॥ प्रारब्ध कर्मवशें करून प्राप्त झालेले दुःखाचा जो द्वेष करीत नाहीं तसाच नष्ट झालेले किंवा भावि म्हणजे पुढें होणा-
रें सुखाची किंवा कर्मफलाची जो इच्छा करीत नाहीं असा जो वैराग्यशील तो केवल ईश्वरप्रीत्यर्थ निष्काम कर्मानुष्ठानकालीं-
ही सन्यासीच आहे असें जाणण्यास योग्य आहे ॥ एणें करून ज्ञानास साधन जे सांख्य आणि योग यास रागद्वेषादिकें करून-
राहित्यरूप साम्य सांगितलें। फलें करून साम्य पुढें सांगतील ॥ चित्ताचा स्वभाव विषयाकडे जाण्याचाच आहे या कारणामुळें द्वे-
द वैराग्य न होतां सन्यास केल्यानंतर विषयाभिलाषरूप रागादिक झाले तर सन्यासी पतन पावेल अशी संभावना आहे। रागद्वे-
षरहित असून कर्म करणाऱ्यास ती संभावना नाही या तात्पर्यानें सन्यासापेक्षां कर्मयोग विशिष्ट आहे असे पूर्वी सांगितलें। त-
थापि द्वंद्व म्हणजे सत्य जो अद्वितीय आत्मा आणि अनृत म्हणजे मिथ्याभूत देहेंद्रियादिक त्याचें परस्पर तादात्म्याभिमानरू-

ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति ॥ निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ॥ ३ ॥
सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदंति न पंडिताः ॥ एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलं ॥ ४ ॥

प जें मिथुन तद्रहित तो निर्द्वंद्व म्हणजे वेदांतश्रवणादिकें करून सत्य आत्मा अनृत देहादिकाहून भिन्न आहे असा विवेक करणारा
तो रागद्वेषास उत्पन्न करणारें जें अज्ञान किंवा त्यापासून झालेले देहात्मादि ज्ञान त्याचा विवेकरूप ज्ञानानें नाश झाल्यामुळें सुखें
करून म्हणजे कर्म करण्याच्या आयासावांचून केवल ज्ञानें करूनच बंधापासून मुक्त होतो ॥ त्यास कर्म करण्याची अपेक्षा नाहीं
॥ अथवा। मिथुनापासून उत्पन्न होतो अशा अर्थाच्या श्रुतीचे प्रमाणावरून द्वंद्व म्हणजे स्त्री ... मिथुन ... न द्वंद्व म्हणजे
स्त्रीचा त्याग करणारा संन्यासी तो कुटुंबभरणादिकाचा आयास नसल्यामुळें सुखें करून बंधापासून मुक्त होतो असाही कोणी अर्थ करता-
त ॥ यांचे व्याख्यापक्षीं पुढील श्लोकांतील सांख्य शब्दाचा जरी मुख्यार्थ - ज्ञाननिष्ठा - आहे तथापि लक्षणें करून ज्ञाननिष्ठेस अंग म्ह-
णजे वेदांतश्रवणादि द्वारा साधनभूत सन्यास असा अर्थ करावा लागेल ॥ सन्यासपक्षीं पूर्वोक्त रीतीनें पतन संभावना आहे कर्मयोगप-

क्षी अनुष्ठानायास आहे ते श्रद्धादोहोनून प्रशस्ततर श्रेयस्कर कोण अशी पुनः जिज्ञासा होईल व अशी शंका होईल तर त्याविषयी फल करून दोघां-
वें साम्यच आहे असे सांगतात॥ साधनभूत आणि फलभूत असे दोन प्रकारचे सांख्य आणि योग आहेत॥ वेदांतश्रवण द्वारा [illegible]
त्मक अंतःकरणवृत्तिरूप आत्मतत्त्वज्ञानास साधनभूत जो कर्मसंन्यास त्यास साधनभूत योग म्हणावा॥ चित्तशुद्धीचे द्वारा आत्मतत्त्वज्ञानास केव-
ल ईश्वरार्पण करून निष्काम संध्यावंदन अग्निहोत्रादिक कर्मानुष्ठान करणे यास साधनभूत योग म्हणावा॥ प्रकृतिर्कोभावे - असें सांख्य
शब्दाचा अर्थ करते वेळेस यास्कानी सांगितले आहे यावरून सम्यक् म्हणजे आत्मस्वरूपाहून अभिन्नत्व करून ख्यायते म्हणजे प्रकाशित
होते परमार्थतः सच्चिदानंदात्मक ब्रह्मवस्तु जीणे करून ती सख्या म्हणजे स्थूल सूक्ष्म कारण प्रपंचाचा अद्वैत ब्रह्मात्म्याचे ठाई प्रविल-
यकरून म्हणजे आत्म्याचे अज्ञानाने आत्म्याचे ठाई कल्पिलेल्या पूर्वोक्त सर्व प्रपंचाचा भ्रमाधिष्ठानभूत आत्मस्वरूपापेक्षा निराळी
तात्त्विक सत्ता नाही - सर्व प्रपंच मिथ्याच आहे - अशा निश्चयाने वेदांतश्रवणादिकें करून झालेली जी अखंड ब्रह्मात्मापरोक्षरूप अं-
तःकरणवृत्ति तीस वेदांतश्रवण द्वारा साधन जो संन्यास तो सांख्य - अशा सांख्य शब्दाचे विवरणाने संन्यास हा सांख्यशब्दाचा अर्थ होतो
॥ हे साधनभूत जे सांख्य आणि योग त्याचे रागद्वेषराहित्याने साम्य म्हणजे एकत्वच आहे असे पूर्वी सांगितले॥ या जन्मी किंवा जन्मांतरी अ-
नुष्ठान केलेले निष्काम कर्मांनी चित्तशुद्धि झाल्यामुळें विक्षेपकरणाऱ्या कर्मांचा त्यागरूप संन्यास करून वेदांतश्रवणादिकाने झालेल्या -
पूर्वोक्त ब्रह्माकार अंतःकरणवृत्तीस फलभूत सांख्य असें म्हणावे॥ प्रमाणवृत्ति - विपर्ययवृत्ति - विकल्पवृत्ति - निद्रावृत्ति आणि स्मृति अशा
पांच चित्त म्हणजे अंतःकरण याच्या वृत्ति आहेत। त्या वारंवार पूर्वोक्त यमनियमादिक अष्टांग साधनांही करून जो निरोध म्हणजे आत्मस्वरूपा-
चे ठाई लय योगशास्त्रांत सांगितला आहे हा मुख्य म्हणजे फलभूत योग आहे॥ जसे तटाकादिकांतील उदक पन्हळीचे द्वाराने तटा-
कादिकाचे पुढे केलेले जें चतुष्कोण वर्तुल त्रिकोणादिक क्षेत्र त्यांत जाऊन त्या क्षेत्राचे आकारा प्रमाणे होते तसे तैजस अंतःकरण प्र-
त्यक्ष म्हणजे इंद्रिये आणि अनुमान शब्दादिक जी प्रमाणें म्हणजे ज्ञानाला उत्पन्न करणारी साधनें आहेत त्यांचे द्वारा विषयाप्रत जा-
ऊन तदाकारच होते। त्या आकारास प्रमाणवृत्ति म्हणावें किंवा यथार्थ ज्ञान म्हणावे॥ शुक्तिकादिकांवर - हें रजत म्हणजे रुपे - अ-

सि जें भ्रांतिज्ञान होते त्यास विपर्ययवृत्ति म्हणावे ॥ उंदें एकाच पदार्थ पाहून त्याचा जो विशेष म्हणजे हस्तपादादिक अवयव किंवा शाखा मुळें यांचा निश्चय झाल्यामुळें - ह्यस्थाणु म्हणजे वृक्ष आहे किंवा पुरुष आहे - असें जें संशयात्मक ज्ञान त्यासही विपर्ययच म्हणावें ॥ शशशृंग - वंध्यापुत्र - असा शब्द ऐकिल्याने जो पदार्थ नाही असा निश्चय असला तरी त्याचें जें ज्ञान होते त्यास विकल्प असें म्हणावें ॥ हें ज्ञान नाहीतर शब्दप्रयोग बोलणारा करणार नाहीं। कारण शब्दप्रयोगाला अर्थज्ञान पाहिजे आणि वंध्यापुत्र आहे स असें ऐकून श्रो त्यांस जो बोध येतो तो एणार नाहीं यास्तव त्या शब्दापासून असें ज्ञान होते असें म्हटलें पाहिजे परंतु त्यांतील अर्थ बाधित म्हणजे - हा नाही - असा निश्चित असतो ॥ पूर्वोक्त ज्या प्रमाणादिवृत्ति त्यांच्या अभावास हेतुभूत असें जें तम तदाकार जी वृत्ति तीस निद्रा म्हणावें ॥ ती निद्रारूप वृत्ति निद्रेपासून उठलेल्यास्वामी स्वदा वेळ मूढ होऊन निजलों होतो - कांही जाणत नव्हतों - अशा स्मृतीवरून आहे असें म्हट

यत् सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ॥ एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ५ ॥

ले पाहिजे ॥ स्मृति लोकांत प्रसिद्ध च आहे ॥ याफल म्हणत सांख्य आणि योगाचें एकच फल आहे असें फलतः साम्य म्हणजे एकत्व अ सतां हे सांख्य आणि योग मोक्ष दोघांस परस्परांची अपेक्षा न करतां स्वतंत्रपणानें साधन आहेत असें बाल म्हणजे अज्ञानी बोलतात पं डित म्हणजे यांचा पूर्वोक्त विवेक जाणणारे बोलत नाहींत। याविषयींहेतु सांगतात ॥ या दोघांतून एका वाही आश्रय करणारा किंवा उत्त म अनुष्ठान करणारा आहे तो दोघांचेही निर्विकल्पक सच्चिदानंदाद्वितीय ब्रह्मात्मरूपाने स्थिति रूप मोक्ष फलाप्रत पावतो ॥ ३ ॥ ॥ तेंच स्पष्ट करून दाखविनात ॥ सांख्य ज्या मोक्षपदाप्रत पावतात त्याच पदाप्रत योगीही पावतात ॥ योग ज्यास आहे तो योग असा अ र्शादित्वास्तव अच्प्रत्यय करावा म्हणजे सांख्य आणि योग या शब्दांचा ज्ञानी आणि योगी असा अर्थ होतो ॥ याप्रमाणे स्वरूपतः आ णि फलतः पूर्वोक्त सादृश्यानें सांख्य आणि योग एकच म्हणजे मोक्षरूप एके न फलास साधन आहेत असें जो जाणतो तोच ज्ञाता अ सें म्हणावें ॥ ५ ॥

सां ख्यांस आणि योग्यांस मोक्षसाधनत्व जें सांगितलें तें परस्परांची अपेक्षा करून आहे किंवा अपेक्षा न करून आहे॥ पहिले पक्षीं सर्व मोक्षार्थ्यांस सन्यास केला पाहिजे असें होतें। असें असलें तर मग प्रथमच सर्वांनीं सन्यास करावा॥ दुसरे पक्षीं एकेच मोक्षमार्गास सांख्य आणि योग हे परस्पर निरपेक्ष दोन्ही समान मार्ग आहेत असें होतें मग समानमार्ग आहेत असें अज्ञानी बोलतात असें कसें म्हटलें आणि जर समान मार्ग आहेत तर — आत्मज्ञानानेंच मोक्षाप्रत पावतो ज्ञानावांचून दुसरा मार्ग मोक्षास नाहीं अशा अर्थाच्या श्रुतींशीं विरोध येईल अशी शंका होईल तर त्याविषयीं सांगतात॥ हे महाबाहो अर्जुना। सन्यास म्हणजे कर्मसन्यास किंवा सर्व द्वैतप्रपंचाचा उत्तम प्रकारें करून न्यास म्हणजे वेदांतश्रवणादिकानें मिथ्यात्वबुद्धि करून अद्वैत ब्रह्मात्म साक्षात्काररूपांत:करणवृत्तिरूपात्मतत्त्व ज्ञानज्यासनें कर्म्य होय म्हणतात तो—अयोगत: म्हणजे पूर्वोक्त साधनभूत आणि फलभूत योगाचे अनुष्ठानावांचून प्राप्त होण्यास दु:ख म्हणजे अशक्य आहे॥ तात्पर्य॥ ज्ञाननिष्ठाप्राप्त होऊन जीवन्मुक्तिसुखार्थ किंवा श्रवणादिद्वारा ज्ञाननिष्ठाप्राप्त होण्यासाठीं जो सन्यास

संन्यासस्तु महाबाहो दु:खमाप्तुमयोगत:॥ योगयुक्तो मुनिर्ब्रह्म नचिरेणाधिगच्छति॥ ६॥

रावयाचा तो क्रमानेंच विद्वत्संन्यास किंवा विविदिषा संन्यास—कर्मयोगानें चित्तशुद्धि व्हावयाची ती कर्मयोग न केल्यानें न झाली तर ज्ञाननिष्ठा व प्राप्त होत नाहीं यामुळें व्यर्थच आहे यास्तव चित्तशुद्धीसाठीं प्रथम साधनभूत कर्मयोगच केला पाहिजे। कर्मयोग करणारा चित्तशुद्धीचेद्वारा ज्ञाननिष्ठे प्रत पावून लौकरच सन्यासानें जीवन्मुक्तिरूप ब्रह्मात्मानंदात्मकस्वरूपाप्रत अनुभवितो। यास्तव जो अशुद्ध चित्त आहे त्याणें चित्तशुद्धि होण्यापूर्वीं सन्यास न करतां कर्मयोगच केला पाहिजे। पूर्वोक्त निर्विकल्पक समाधिरूप जो चित्तवृत्तिनिरोधस्वरूप फलभूत योग तोही वेदांताचें श्रवण करून महावाक्यापासून जो मोक्षसाधन ब्रह्मात्मसाक्षात्कार व्हावयाचा त्यास साधनच आहे। यास्तव तोही तत्त्वज्ञानाचे द्वारानेंच मोक्षसाधन आहे स्वतंत्र साधन नाहीं यामुळें पूर्वोक्त श्रुतीशीं विरोध होत नाहीं॥ शांत म्हणजे बाह्येंद्रियांचा निग्रह करणारा—दांत म्हणजे मनाचा निग्रह करणारा—उपरत म्हणजे वैराग्यशील किंवा संन्यासी—तितिक्षु म्हणजे शीतोष्णादिक द्वंद्वांचें सहन करणारा—असा जो अधिकारी तो समाहित

म्हणजे पूर्वोक्त निर्विकल्पक समाधिस्थ होऊन नंतर मनाचे गई न आत्म्याप्रत पावतो म्हणजे अद्वितीय ब्रह्मात्म साक्षात्कार रूप मनोवृ-
त्ति स्वरूप तत्त्वज्ञान यानू होतो असा अर्थ. या श्रुतीत पूर्वोक्त फलभूत समाधि रूप योगास तत्त्व साक्षात्काराचें साधनत्व सांगितलें आ-
हे ॥ त्याचें तात्पर्य असें आहे कीं - ब्रह्म सच्चिदानंद रूप आहे - असें श्रुतीत सांगितलें आहे तें ब्रह्म जीवाचें स्वरूपच आहे असें वे-
दांतातील महावाक्या पासून गुरू पासून श्रवण करून जन्मांतरीय पुण्य परिपाकानें चित्तशुद्ध होऊन ज्याचे अंतःकरणांतील स-
र्व असंभावना आणि विपरीत भावना गेल्या आहेत त्यास महावाक्याचे एकवार उपदेशापासूनच ब्रह्मात्म साक्षात्कार होतो॥
प्रतिबंधक पापादिकामुळें ज्या ज्या असंभावना आणि विपरीत भावना गेल्या नाहीत त्यास महावाक्यापासून प्रथम परोक्ष ब्रह्मा-
त्म तत्त्वज्ञान होतें। तें प्रस्तावनेंत सांगितलें स्वरूपाचे एकवार श्रवणानें किंवा श्रवणाचे आवृत्तीनें होतें। नंतर प्रस्तावनेंत जीं मन-
न निदिध्यासनाचीं स्वरूपें संक्षेपानें सांगितलीं आहेत त्यांचें एकवार किंवा वारंवार अनुष्ठानानें असंभावना आणि विपरीत
भावना जाऊन त्या श्रवण मनन निदिध्यासनाचे साधनानें महावाक्या पासून ब्रह्मात्मापरोक्ष ज्ञान होतें। या श्रवण मनन निदि-
ध्यासनादिकाचे अनुष्ठानानें बुद्धीचे मंदत्वास्तव किंवा उपदेश करणाऱ्या गुरूचें निरंतर सान्निध्य नसल्यामुळें ब्रह्मात्मत-
त्त्व साक्षात्कार होण्यास जे असमर्थ आहेत त्यांस त्यांची कर्मानुष्ठानेंकरून शुद्धि झाल्यानंतर गुरु शास्त्रांवर श्रद्धा उत्पन्न होऊ-
न गुरू पासून - ब्रह्म सच्चिदानंद अद्वितीय स्वरूप आहे - असें परोक्षत्वें करून जाणून नंतर गुरूनें सांगितल्या मार्गानें
- तें ब्रह्म मीच आहे - अशी जी अंतःकरण वृत्तीचा निरंतर तदाकार प्रवाहरूप उपासना तिचे अभ्यासरूप अनुष्ठानानें तीउ-
पासना परिपक्व झाली म्हणजे पूर्वोक्त यमादिक साधनानी हळू हळू निर्विकल्प आत्म्याविषयी चा समाधि होतो नंतर त्या समाधींत किंवा समाधीनी अखं-
ड सच्चिदानंदाद्वय आत्मस्वरूपाचा वारंवार अनुभव झाला म्हणजे जे सच्चिदानंदाद्वितीय स्वरूप ब्रह्माचें लक्षण श्रुतीनें सांगितलें आहे तेंच
स्वरूप आत्म्याचें समाधींत अनुभवास येतें। यास्तव आत्मा ब्रह्मच असावा - आत्मस्वरूपाहून ब्रह्म निराळें नसावें - अशी ब्रह्मा-
त्मैक्याची संभावना होऊन नंतर गुरूपदिष्ट महावाक्य रूप प्रमाणावरून मोक्षास साधनभूत ब्रह्मात्मापरोक्षज्ञानरूप निर्विका-

साक्षात्कार होतो ॥ याच तात्पर्याने कोणास योग असाध्य म्हणजे योगद्वारा तत्व निश्चय असाध्य आहे। कोणास श्रवण मनन निदिध्या
सन द्वारा तत्वनिश्चय असाध्य आहे। यास्तव हे सांख्य योगरूप दोन मार्ग अधिकारि भेदाने परमेश्वराने सांगितले असें वासिष्ठ रामाय
णात रामास वसिष्ठानीं सांगितलें आहे॥ ब्रह्मतत्वाच्या उपासनेने निर्विकल्पक समाधि होऊन त्याचे महायाने अपरोक्ष ब्रह्मात्मतत्वज्ञा
न होऊन मोक्ष होतो असें आहे तर ती उपासना सर्ववेदांतील एकच आहे यास्तव सर्व वेदांत उपासना प्रकरणी जेथें जेथें जे जे विधेय
म्हणजे भावरूप गुण आणि निषेध्य म्हणजे अभावरूप गुण ब्रह्माचे सांगितले आहेत त्या सर्व गुणांचा उपसंहार म्हणजे ते सर्व गु
ण उपासनेत आणून विज्ञान-आनंद-नित्य-शुद्ध-बुद्ध-मुक्त-सत्य-निरंजन-विभु-एक-प्रत्यक् म्हणजे अंतरात्मस्वरूप असे जे
भावरूप ज्ञानानंदादि गुण तसेच जे-स्थूल नव्हे-अणु नव्हे-ह्रस्व नव्हे-दीर्घ नव्हे-आणि जे-अदृश्य-अग्राह्य-अशब्द-अस्पर्श-
अरूप-आणि अव्यय म्हणजे नाशरहित असे जे अस्थूलत्वादिक अभावरूप गुण त्याणी जे उपलक्षित म्हणजे व्यवहारदृष्टीनें हे पृथक्
गुण भासले तरी ते गुण परमार्थ दृष्टीने त्याहून निराळे सत्तेने नाहीत असें जे ब्रह्म ते मी आहे असी करावी म्हणोन वेदव्यासानी ब्रह्म
सूत्रांत तृतीयाध्यायीं सांगितले आहे आणि महावाक्यापासून होणाऱ्या ब्रह्मात्म तत्वज्ञानाचा हि मी ब्रह्म आहे असाच आकार आहे ते
व्हां तत्वबोध आणि ब्रह्म तत्वोपासना यांचा स्वरूपतः भेद नाही आणि तत्व ज्ञानाने ब्रह्मात्मभावरूप मोक्ष व्हावयाचा ते फळ उपास
नेचे दृढत्वाने आत्म्यास ब्रह्मत्व प्राप्त होईल तेव्हा फलतः ही भेद नाही तेव्हां मग उपासनेनंतर समाधि आणि त्याचे महायानें म
हावाक्यापासून तत्वबोधक शास्त्र पाहिजे जर उपासनेपासूनच मोक्ष मानला तर तत्व ज्ञानाशिवाय मोक्ष साधन दुसरा मार्ग नाही
अशा श्रुतीचा विरोध कसा जाईल अशी शंका करूं नये कारण तत्वबोध वस्तु तंत्र आहे म्हणजे परमार्थतः वस्तु जसें असेल तसे
च प्रमाणापासून यथार्थ ज्ञान जें होतें तद्रूप बोध आहे आणि उपासना कर्तृ तंत्र आहे म्हणजे मध्यें दुसरे पदार्थाकार वृत्तीचा प्रवेश
न होतां उपास्य निर्गुण किंवा चतुर्भुज चतुर्मुख पंचमुख मूर्तिस्वरूपाकार अविच्छिन्न अंतःकरण वृत्ति प्रवाहरूप उपासना पुरुषा
नीं आपले इच्छेप्रमाणें करण्यास किंवा न करण्यास किंवा अन्यथा म्हणजे एक मूर्तीची उपासना करावयाची ते स्वरूप सोडून दुस

रे स्वरूपानें उपासना करण्यास शक्य आहे। बोधन सानाहीं। कारण बोधाची सामग्री मिळाली म्हणजे बोध मला नव्हावा अशी इच्छा असली तरी तो होण्यास राहणार नाहीं आणि प्रमाणापासून बोध जो होईल तो जसें वस्तु असेल तसाच होईल आणि उपासना तर प्रयत्न साध्य आहे तेव्हां उपासना मला नको अशी इच्छा असली तर ती विषयी उपासना मला असावी अशी इच्छा होणार नाहीं यास्तव उपासनेच्या इच्छेनें होणारा जो प्रयत्न तो न झाल्यामुळें होणार नाहीं असा उपासनेचा आणि बोधाच्या स्वरूपाचा भेद आहे। आणि उपासना ही केवळ मनाचे वृत्तिरूप आहे। मन जसें चिंतन करील तशी वृत्ति होते यामुळं ती वृत्ति ज्ञानरूप जरीं असली तरी तें यथार्थ ज्ञान नव्हे यामुळे तें अज्ञाननिवृत्तिरूप कार्य क्षम होत नाहीं। जसें विधुर पुरुष निरंतर मनांत स्त्रीचे चिंतन करीत असता चिंतनाचे अभ्यासानें त्याचे मनांत स्त्रीचा मनोवृत्तिरूप साक्षात्कार जरी झाला तरी तो यथार्थ नव्हे यामुळं कार्यक्षम होत नाहीं। प्रमाणापासून झालेलें जे मनोवृत्तिरूप ज्ञान तेंच यथार्थ ज्ञान कार्यक्षम होतें आणि उपासने मुळे जें ब्रह्मत्व प्राप्त झाले ते जोपर्यंत उपासना आहे तोंपर्यंत रहतें। उपासना नाहींशी झाली म्हणजे नाहींसे होतें। यास्तव उपासनेनें प्राप्त झालेला जो ब्रह्मभाव तो वास्तविक मोक्ष नव्हे। ज्ञानानें ब्रह्मस्वरूपतः जीवास उत्पन्न होत नाहीं परंतु आपण ब्रह्मस्वरूप असतांही अज्ञानानें आपले ब्रह्मस्वरूपाचे जें आवरण होऊन आपणास जीवत्व संसारित्वादिकाचा भ्रम झाला तो ज्ञानानें अज्ञान नाश पाऊन नाहींसा होतो आणि आपलें वास्तविक ब्रह्मस्वरूप प्रकाशित होतें यास्तव ज्ञानानें अभिव्यक्त म्हणजे जाणविलेले आपलें वास्तविक ब्रह्मस्वरूपाचा ज्ञान नाश झाला तरीं नाश होत नाहीं॥ उपासकाला ही वास्तविक ब्रह्मता आहे असें म्हणाल तर जे मूढ किंवा पशुपक्षी यांस वास्तविक ब्रह्मता नाहीं कीं काय। त्यांस वास्तविक ब्रह्मता असली तरी ती विषयीं त्यांस अज्ञान आहे यामुळे ती त्यांच्या मोक्षस्वरूप पुरुषार्थास उपयोगी नाहीं असें म्हणाल तर अज्ञान नाशक ज्ञान न झालें तर उपासकांस ही अज्ञान आहेच तेव्हा त्याची ही ती वास्तविक ब्रह्मता पुरुषार्थास उपयोगी नाहीं। जर मी ब्रह्म आहें असा उपासनात्मक ज्ञान भ्रम आहे तर तें भ्रमात्मक ज्ञान समाधीचे द्वारानें तरी वास्तविक मोक्षास साधन कसें होईल अशी शंका करूं नये। उपासनात्मक ज्ञान जरी भ्रमरूप आहे तथापि तो संवादिभ्रम आहे विसंवादिभ्रम नव्हे। ज्या भ्रमापासून इष्टवस्तु

चा लाभ होतो त्यास संवादिभ्रम असे म्हणावें। त्यापासून इष्टवस्तूचा लाभ होत नाहीं त्यास विसंवादिभ्रम म्हणावें॥ यास उदाहरण। एके घरांत दीपाची प्रभा ज्यांतून बाहेर रत्नाकार वर्तुल पडावी असा पदार्थ दीपाचे आड ठेवून त्याचे आंतले प्रदेशीं दीप ठेविला त्याची प्रभा त्या आड ठेवलेले पदार्थाचे बाहेर वर्तुल रत्नाकार पडली आहे तशीच दुसरे घरांत रत्नाची प्रभा ज्यांतून रत्नाचे आकाराप्रमाणे दीपाची प्रभा पडावी असा पदार्थ रत्नाचे आड ठेवून त्याचे आंतले प्रदेशीं रत्न ठेविलें त्याची प्रभा त्या आड ठेवलेल्या पदार्थाच्या बाहेर दीपप्रभेचे आकाराप्रमाणे पडली। त्या दोन्ही प्रभेपत दुरून पाहून - हे मणीच आहेत - अशी बुद्धि होऊन एक पुरुष मणीचे प्रभेकडे धावला आणि एक पुरुष दीपाचे प्रभेकडे धावला। त्या दोघांचीही त्या प्रभेवर हा मणि - हा मणि - अशी बुद्धि म्हणजे ज्ञान भ्रमच आहे - तथापि मणिप्रभेवर मणीचे भ्रमानें जो तिकडे धावत गेला त्यास मणीचे जवळ गेल्या मुळे मणीवर चक्षूंचा संबंध होऊन त्यापासून दुसरें यथार्थ वस्तुपासून मणीचे ज्ञान होऊन मणीचा लाभ होतो यास्तव तो त्याचा प्रथम भ्रम संवादी आहे। दीपप्रभेकडे जो मणिबुद्धीनें धांवला त्यास मणीचा लाभ होत नाहीं यास्तव तो त्याचा विसंवादिभ्रम आहे॥ तसेंच कोणी एका प्रदेशीं धूमाप्रमाणें धुके दिसते त्यावरून धूम आहे - असे भ्रमात्मक ज्ञान होऊन त्यापासून येथें वन्हि आहे असें अनुमानिक ज्ञान होऊन वन्हि बुद्धीनें तेथें गेल्यावर यदृच्छेंकरून तेथें वन्हि होता तो त्यास प्राप्त झाला। हें ही संवादिभ्रमाचे उदाहरण आहे। तसेंच गोदावरीचे उदकावर - हें भागीरथीचें उदक आहे - असा भ्रम होऊन शरीर शुद्धीसाठीं त्याचें प्रोक्षण केलें तर अभीष्ट शुद्धि प्राप्त होते हें ही संवादिभ्रमाचें उदाहरण आहे॥ याप्रमाणें प्रत्यक्ष म्हणजे इंद्रियापासून होणारें - तसेंच अनुमानापासून होणारें - तसेंच शब्दापासून होणारे जे संवादिभ्रम त्याचीं पुष्कळ उदाहरणें आहेत॥ त्याप्रमाणें मणीचे भ्रमाचे दृष्टांताप्रमाणे उपासनात्मक संवादिभ्रमानें निर्विकल्प समाधि, ते आत्म्याचे वास्तविक सच्चिदानंदात्मक स्वरूपाचा साक्षात्कार होऊन पूर्वोक्त रीतीनें महावाक्यापासून ब्रह्मात्मापरोक्षज्ञानरूप यथार्थबोध होऊन मोक्षप्राप्तिरूप इष्टफलप्राप्त होतें असें म्हटल्यानें काहीं विरोध नाहीं॥ याप्रमाणें योगयुक्त जो मुनि म्हणजे पूर्वोक्त सन्यासी तो न चिरेण म्हणजे गुरुपासून महावाक्यार्थाचे श्रवणानेंच लौकर तत्त्वज्ञान होऊन ब्रह्मस्वरूप मोक्षाप्रत पावतो॥ केवल सन्यासी मोक्षाप्रत पावत नाहीं याच तात्पर्या

नें – न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति – असें म्हटलें आहे ॥ ६॥ कर्मयोगानें चित्तशुद्धि होऊन ज्ञानप्राप्त झालें तरी ज्ञानोत्तर केले-
ल्या कर्मानें मोक्षास प्रतिबंध होईल अशी शंका होईल तर त्याविषयी सांगतात॥ योग म्हणजे पूर्वोक्त चित्तवृत्तिनिरोधरूप निर्विकल्पक समाधि
तेणें करून युक्त अतएव विशुद्ध म्हणजे वृत्तिसारूप्यरूप दोषरहित आहे असंग चैतन्यस्वरूप आत्मा ज्याचा असा अनएव जिंकि-
लीं आहेत आत्मा म्हणजे शरीर आणि इंद्रियें जानें असा। तात्पर्य ॥ त्रिगुणात्मक अंतःकरणाच्या – शांत – घोर – मूढ अशा सत्वरजतमोगुणांपा-
सून उत्पन्न झालेल्या सात्विक – राजस – आणि तामस अशा वृत्ति उत्पन्न होतात। वैराग्य – क्षमा – औदार्य – या शांतवृत्ति। तृष्णा – स्नेह – राग
लोभ – इत्यादिक घोरवृत्ति। मोह – भय इत्यादिक मूढवृत्ति। या वृत्तींचें अंतःकरणसमीपस्थ – असंग – आणि चैतन्यस्वरूप अशा आ-
त्म्याचा प्रतिबिंब झाला म्हणजे स्फटिकमणी सरक्त जपाकुसुमाचे संनिधानानें जसें रक्तसादृश्य येऊन – हा रक्तस्फटिक आहे – अ-
शा व्यवहारास जसा तो योग्य होतो किंवा मलिनदर्पणामध्यें मुखाचा प्रतिबिंब झाला म्हणजे – मुख मलिन आहे – असा भ्रम होऊ-
न शोक करण्यास जसें ते पात्र होतें त्याप्रमाणें असंग चैतन्यरूप आत्म्यास त्या वृत्तींचें सारूप्य म्हणजे सादृश्य प्राप्त होऊन जेव्हां
समाधि नाहीं तेव्हां तो आत्मा त्या वृत्तीवरील धर्मांचा आपणावर आरोप करून घेऊन – मी ज्ञानी आहें – दुःखी आहें – अशा व्यवहारास
आस्पद म्हणजे योग्य होतो॥ निर्विकल्पक समाधीनें सर्व वृत्तींचा निरोध होऊन त्या वृत्ति जेव्हां आहेत त्याकाळीं वृत्तींचे धर्म आपलेवर घे-
णारा जो आत्मा त्याची – हा आत्मा विभु – उत्पत्तिरहित – जरामरणरहित – आणि अभय – आहे इत्यादिक जें श्रुतींत आत्म्याचें स्वरू-
प सांगितलें आहे त्या स्वरूपानें स्थिति असते असें योगशास्त्रांत सांगितलें आहे त्याप्रमाणें पूर्वोक्त विशुद्धात्मा एणेकरून महावा-
क्यांतील त्वंपदाचा अर्थ सांगितला॥ आता त्याशीं महावाक्यांतील तत्पदार्थाचा अभेद सांगतात॥ कडीं – तोडे – कुंडलें – इत्यादि-
कांचा आत्मा म्हणजे स्वरूप जसें त्याचें उपादानकारण सुवर्ण आहे त्याप्रमाणें सर्वभूतें ब्रह्मादिस्तंबपर्यंत चेतन आणि आकाशा-
दिक जे अचेतन पदार्थ त्या सर्वांचा आत्मभूत म्हणजे कारण वास्तव स्वरूपभूत किंवा त्यांहून भिन्न नव्हे असा आहे आत्मा –
म्हणजे देहेंद्रियमनोबुद्धींचें साक्षी आणि प्रत्यक् म्हणजे अंतरात्मस्वरूप ज्याचें असा। त्याचें स्वरूप म्हणजे सत्ता उपादान –

कारणाहून भिन्न नाहीं। जसें घट-शराव म्हणजे परळ-रांजण यांचें स्वरूप मृत्तिकेहून किंवा कडी-तोडे-कुडक्या यांचें स्वरूप सुवर्णा-
हून निराळें नाहीं। असा जो तो सर्वांचा प्रत्यगात्मा म्हणजे अंतरात्मा च आहे यास्तव कर्म करीत असतांही म्हणजे देहेंद्रियादिकांनी केले-
ले कर्म कर्तृत्वादिकाच्या अज्ञान दृष्टीनें त्यावर लोकांनी व्यवहार करण्यास पात्र असतांही आत्मा असंग-देहेंद्रियादिकांहून निराळा
त्याचा साक्षी आहे असा आत्मतत्त्व ज्ञानानें त्याचें कर्तृत्व बाधित झाल्यामुळें रज्जूवर अज्ञानानें भासलेला सर्प रज्जूच्या यथार्थ ज्ञा-
नानें-हा सर्प नव्हे-असा बाधित झाला म्हणजे जसा बाधक होत नाहीं तसा त्या बाधित कर्म कर्तृत्वानें न लिप्यते म्हणजे बंधपावत
नाही। लोकदृष्ट्या त्यावर भासलेले कर्म त्यास बाधा करीत नाही असे तात्पर्य ॥ सर्व जे ब्रह्मादिक चेतनाचेतन त्यांचा आत्मभूत म्हणजे
अंतरात्मभूत आहे आत्मा म्हणजे स्वरूप ज्याचें असा सर्वभूतात्मभूतात्मा या पदाचा अर्थ करून जीवाचा आणि ईश्वराचा अभेद शब्दाव-
रून च सिद्ध होतो असें व्याख्यान या पदाचें कोणी करतात परंतु त्या व्याख्यानांत सर्वभूतात्मा म्हणजे सर्व जीं चेतनाचेतन भूतें त्यांचा आ-

योग युक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः ॥ सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥

त्मा असा अर्थ केला तरी जीवेश्वराचा अभेदरूप जो त्याच्या व्याख्यानाचा अर्थ त्याचा बोध होतो यामुळें आत्मभूत हें पद व्यर्थ होईल। स-
र्वभूत म्हणजे सर्व अचेतन स्वरूप आणि आत्मभूत म्हणजे चेतन स्वरूप असा आहे उपादानकारण आत्मा म्हणजे स्वरूप ज्याचें अ-
सा अर्थ करून जीवास उपादान कारण ईश्वर आहे यास्तव तो त्याहून भिन्न नाही अभिन्न च आहे या अनुमानाचे द्वारा जीवेश्वराचा अ-
भेद या व्याख्यानापासून समजतो असेंही कोणी याचें व्याख्या करतात। याचें व्याख्येत ही सर्वभूत म्हणजे सर्व चेतनाचेतन स्वरूप आहे
आत्मा म्हणजे स्वरूप ज्याचें असा सर्व पदांचा संकोच करून अर्थ केला म्हणजे त्यांचे व्याख्यानाचा विवक्षित अर्थ लब्ध होतो यामुळें त्या-
चे व्याख्यानांत ही आत्मभूत या पदास वैयर्थ्य येतें आणि सर्व पदांचा संकोच करून जर व्याख्यान केलें तर त्याचा जो विवक्षित अर्थ
तो सर्व म्हणजे अचेतन आणि आत्मे म्हणजे चेतन तद्भूत म्हणजे तत्स्वरूप आहे आत्मा म्हणजे स्वरूप ज्याचें असा अर्थ त्या
पदाचा केला म्हणजे सर्वात्मभूतात्मा एणें करून च लब्ध होतो यामुळें प्रथम भूतपद ही व्यर्थ होतें ॥ असेंहे सर्वभूतात्मभूतात्मा-

त्या पदाचे मतभेदाने अनेक अर्थ होतात ते व्याख्ये आहेत। यास्तव त्यांमध्यें जो चांगला वाटेल त्याचा त्यांनी स्वीकार करावा आग्रह करूं नये॥ सर्वज्ञ भगवंताचे वाक्य का मध्येच प्रमाणच आहे॥ ७॥ कर्मे करीत असतांही लिप्त होत नाही असें जें पूर्वश्लोकीं सांगितलें त्याचीच उपपत्ति सांगतात॥ योगयुक्त जो तत्त्ववेत्ता ज्ञानी तो इंद्रियें म्हणजे ज्ञानेंद्रियें कर्मेंद्रियें हे आणि मन प्राणापानादिक प्राण हे आपापल्या विषयांचे ठाईं वर्तताहेत त्यांहून निराळे त्यांचे साक्षी असंग स्वरूप वर्तत नाही असे निश्चय झाल्यामुळें पश्यन् म्हणजे रूपादिक पाहत असतां शृण्वन् म्हणजे शब्द ऐकत असतां स्पृशन् म्हणजे शीतोष्णादिक स्पर्शांचा अनुभव घेत असतां जिघ्रन् म्हणजे सुगंधादिकांचा वास घेत असतां अश्नन् म्हणजे भोजनादिकाने स्वादु मधुरादिक रसांचा आस्वाद घेत असतां हे पांच ज्ञानेंद्रियांचे व्यापार सांगितले गच्छन् म्हणजे गमन करीत असतां स्वपन् म्हणजे निद्रा करीत असतां श्वसन् म्हणजे श्वासोच्छ्वास करीत असतां प्रलपन् म्हणजे भाषण

नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ॥ पश्यञ्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपञ्श्वसन् ॥ ८ ॥

प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि ॥ इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तंत इति धारयन् ॥ ९ ॥ ॥

ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ॥ लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥ १० ॥ ॥

ग करीत असतां विसृजन् म्हणजे मलमूत्रादिकांचा उत्सर्ग करीत असतां हें आनंदाचें ही उपलक्षण करून मैथुनानंद अनुभवित असतां गृह्णन् म्हणजे घेत असतां उन्मिषन् म्हणजे डोळे उघडीत असतां निमिषन् म्हणजे डोळे मिटीत असतां गमन विसर्ग प्रलपनादिक कर्में इंद्रियांचे व्यापार निद्रा बुद्धीचा व्यापार श्वासोच्छ्वास प्राणाचे व्यापार उन्मेष निमेष उपप्राणाचे व्यापार क्रमाची विवक्षा नाही जें ज्याचा संभवेल तो घ्यावा असे हे व्यापार करीत असतां ही कर्तृत्वाभिमान आत्मतत्त्वज्ञानाने गेल्यामुळे मी कांहीं करीत नाहीं असें मानितो॥ ८। ९॥ असंगात्मतत्त्वज्ञानामुळें तत्त्ववेत्ता जसा कर्मे करून त्यांनीं लिप्त होत नाही तसा जो आत्मतत्त्ववेत्ता नाहीं तोही सर्व कर्मांचा करविणारा सर्वांचा अंतर्यामी परमेश्वरच आहे मी कर्ता नव्हे याप्रमाणें सर्व कर्में करून त्यांचे फलेच्छा सोडून निष्कामबुद्धीनें परमेश्वराचे ठाईं जो अर्पण करतो तोही कमलाचें पत्र जसें उदकानें लिप्त पावत नाहीं त्याप्रमाणें पापानें लिप्त हो

त नाही ॥पाप कर्माप्रमाणें पुण्य कर्मेंही जन्ममरणरूप [illegible] पासून मुमुक्षु मनुष्य कर्मेंही [illegible] ज्य
च आहे म्हणून पर्थाकपापशब्द उपलक्षण करून पुण्य [illegible] असा अर्थ करावा ॥१०॥ ईश्वरार्पण बुद्धीनें केलेलें
निष्काम कर्म बंधक होत नाहीं असें सांगून [illegible] साधन [illegible] सांगतात ॥ [illegible] म्हणजे ज्ञानी [illegible] नरू
ण कर्मकर्ता असा जो देहादिकावर अध्यास म्हणजे [illegible] राहून असा जो देह मन बुद्धि आणि इंद्रियें । असा केवल
हा विभक्ति फिरवून अर्थ करावा । त्याहीं करून [illegible] बुद्धि [illegible] आहे असा जो आत्मा नात्मविवे

कायेनमनसाबुध्याकेवलैरिंद्रियैरपि॥ योगिनः कर्मकुर्वंतिसंगंत्यक्त्वात्मशुद्धये॥११॥
युक्तःकर्मफलंत्यक्त्वाशांतिमाप्नोतिनैष्ठिकीं॥ अयुक्तःकामकारेणफलेसक्तोनिबध्यते॥१२॥

क तद्वंत ते संग म्हणजे जेसमप्रमाणे विवेकी जनांकीं कादिकत्याम जो आ [illegible] आहे भोक्ता आहे असा अभिमान आहे त्यास त टाकून
आणि फलेच्छाही टाकून चित्तशुद्धीसाठीं कर्म करतात ॥ तात्पर्य ॥ तुलाही कर्म करण्याचा अधिकार आहे म्हणून तूंही तसा अ-
भिमान टाकून कर्म कर ॥ ११॥ ब्रह्मण्याधाय कर्माणि - संग करून सांगितलेल्या लक्षणांनें जो युक्त तो कर्म फलाचा त्याग करून चित्त
शुद्धि द्वारा प्राप्त व्हावयाची जो ब्रह्मनिष्ठेची फलभूत शांति म्हणजे विदेहकैवल्य मोक्ष त्याप्रत पावतो ॥ अयुक्त म्हणजे त्या लक्षणानें जो
रहित तो कामाच्या प्रेरणेकरून फलाविषयीं आसक्त होऊन कर्म करून बंध पावतो ॥१२॥

ईश्वरासनिर्विकारासंग स्वरूपानें कर्तृत्व आणि कारयितृत्व नसलें तरी मायासंबंधानें त्यास तें आहे असें म्हणाल तर देहादिकाचे संबं-
धानें आत्म्यासही तें येईल आणि ईश्वरास ते मानले तर कोणापासून पाप कोणापासून पुण्य ईश्वर करवितो आणि कोणास सुखी को-
णास दुःखी करतो असा ईश्वरासही विषमभाव आणि निर्दयत्व जीवाप्रमाणे लोभ क्रोधमूलक आहे असें होईल यामुळें त्यासही क
म क्रोधमूलक संसार प्राप्त होईल अशी शंका असेल तर त्याविषयी सांगतात॥ विभु म्हणजे व्यापक आणि क्रियारहित परमेश्वर
कोणा कर्त्याचें पाप घेत नाहीं तसेंच कोणा कर्त्याचें सुकृत म्हणजे पुण्यही घेत नाहीं म्हणजे ईश्वरास कारयितृत्व नाहीं यामुळें को
णाकडून पाप करविण्यानें पापी किंवा पुण्य करविल्यानें पुण्यवान् होत नाहीं॥ जो सक्रिय आहे तो कोणाकडून आपल्या पापादिकव्या
पारानें करवितो। ईश्वरावर विभुत्वामुळें कोणतीही क्रिया नाहीं आणि आणि असंग अद्वितीयत्वामुळें पारमार्थिक मायासंबंधही नाहीं
। तथापि जसा सार्वभौम महाराज सर्वेश्वर सुखी आणि स्वतंत्र असताही आपल्या वास्तविक स्वरूपाचे अज्ञानानें निद्रित-आपणास
दुसऱ्यांनीं बद्ध केलें आहे-आपण शतावधि संकटांचा अनुभव करतो-मी दीन आहें-दुःखी आहे-स्वतंत्र नाहीं-हा दुःखापासून
सोडवील-असे नानाविध स्वप्न भ्रम पावतो आणि मोहपावतो त्याप्रमाणे अनादि अविद्येनें-हा जीव-हा ईश्वर असें भासवि
ले आहे अशा श्रुती आहेत त्यावरून अनादि अविद्येचे आवरणानें आपल्या वास्तविक अद्वितीय असंग सच्चिदानंद स्वरूपाचे ज्ञा
नाचें आच्छादन होऊन देहेंद्रियादिकावर जो तादात्म्याभिमान झाला आहे त्याचे योगानें-मी ईश्वर नव्हे-त्याहून भिन्न कर्ता-
भोक्ता-सुखी-दुःखी-संसारी आहे-असे मानून देहादिकावरील धर्म आपल्यावर मानितो आणि त्या दुःखाचे निराकरणा
र्थ कल्पिलेले ईश्वराचें आराधन आणि कर्म करतो आणि तें न केलें तर ईश्वरापासून भितो आणि ईश्वरच आपलेपासून शुभा
शुभ कर्म रचितो असें मानितो आणि ईश्वर उपास्य आहे आणि मी उपासक आहें असें मानितो असा जो हा अविद्येचे अव
स्थेत सर्व जीवांस भ्रम झाला आहे त्याचा पूर्वोक्त ईश्वरास प्रवर्तकत्व पाप पुण्य कारयितृत्व मागणारी श्रुति अनुवाद करते आणि अ
विद्येचे विचित्र शक्तीमुळें विचित्र नानाप्रकारचे जे जीवास अविद्येनें भासविलेले जीवस्वरूपाविषयीं तसेंच ईश्वर स्वरूपाविष

यीं विकल्परूप भ्रम त्याचाही अनुवाद करते ॥ तोच अनुवाद श्रुतीची उपबृंहण म्हणजे व्याख्यान करणारी पुराणेही करतात ॥ त्यांती
ल जीवस्वरूपाविषयींचे विकल्पमूलक विवाद - अथ वेत्त्वनित्यज्ञातं नित्यवामन्यसंमृत - या श्लोकांत स्पष्ट करून दाखविले व आ
हेत तेणेंकरून महावाक्यातील त्वंपदाचे अर्थाचें शोधन होईल ॥ ईश्वरस्वरूपाविषयींचे विकल्पमूलक जे विवाद आहेत त्यांचें प्रतिपा
दन महावाक्यांतील तत्पदार्थांचें शोधन होऊन ब्रह्मात्मैक्यस्वरूप पदद्वय महावाक्यार्थाचें यथार्थज्ञान होण्यासाठीं येथे संक्षेपानें क
रतो ॥ असंगजें चैतन्य ज्यास चित्ति ज्ञान असेंही म्हणतात त्याचें संनिधिमात्रानें जीवास सुखदुःखफलाचा अनुभव व्हाव
यासाठीं या जगाची रचना करण्यास प्रवृत्त झालेली जी त्रिगुणात्मक प्रकृति जिचें स्वरूप पूर्वी लिहिलेंच आहे आणि पुढेंही प्रसं
गानें लिहूं तिचा नियंता म्हणजे आपलें कार्य करण्याविषयींची जी प्रेरणा करणें तद्रूप नियमन करणारा आणि क्लेश - कर्म - वि
पाक - आणि आशय यांचा संबंध ज्यास नाहीं असा जो पुरुषविशेष त्यास ईश्वर म्हणावें ॥ अविद्या - अस्मिता - राग - द्वेष - आणि
अभिनिवेश या पांचांस क्लेश असें म्हणावें ॥ अनित्य - अशुचि - दुःख - अनात्मा म्हणजे जड देहादिक यांवर क्रमेंकरून नें
नित्य शुचि सुख आत्मा अशी भेद किंवा अभेदाविषयीं उदासीन सामान्य स्वरूप जी विपरीत बुद्धि ती अविद्या ॥ बुद्ध्यादि
कावर स्वरूपेंकरून धर्मेंकरून अभेद जीत भासतो अशी जी आत्मबुद्धि जीस अहंकार म्हणतात ती अस्मिता ॥ सुखाचें साध
न जे विषय तद्विषयी जो अभिलाष तदनुकूल जी - हें मला असावें अशी मनाची वृत्ति तो राग ॥ दुःखास जीं साधनें त्याविषयीं
ची जी इच्छा तीस विरोधि म्हणजे - हें मला नसावें - अशी जी मनाची वृत्ति तो द्वेष ॥ स्वभावेंकरून अविद्वानास किंवा विद्वानास -
सर्वलोकप्रसिद्ध मरण त्रासानें होणारें जें भय किंवा तत्सजातीय भय तो अभिनिवेश ॥ हें पूर्वोक्त पांच क्लेशांचें स्वरूप ॥ देहेंद्रि
यादिकांचा जो व्यापार त्यास कर्म म्हणावें ॥ ते शुक्ल १ कृष्ण २ शुक्लकृष्ण ३ आणि अशुक्लअकृष्ण ४ चार प्रकारचें आहे ॥ केवल पुण्याचें
साधन जें जपकरणें अनशन म्हणजे उपवासादिक करणें असें जे कर्म तें शुक्ल कर्म ते वानप्रस्थाचें ॥ केवल पापाचेंच साधन असे
जे दुष्टाचें परस्त्री गमनादिक कर्म तें कृष्ण कर्म ॥ प्राधान्येंकरून पुण्याला उत्पन्न करणाऱ्या ज्या कर्मांत अंगभूत अनुषंगानें किंचित्पा

पापही उत्पन्न होते असेंजे यज्ञादिक कर्म ते शुक्लकृष्ण कर्म ॥ यज्ञादिक कर्म वेदविहित आहे यामुळें मोठया पुण्याला तरसाधन आहे व परंतु त्यांत
पशुहिंसा होते यामुळें आनुषंगीक यत्किंचित पापही होते। यास प्रमाण पितरांचें संज्ञापन म्हणजे हिंसा झाल्यामुळें जेएन म्हणजे पाप झा
लें त्यापासून माझें अग्नि रक्षण करो अशा अर्थाचे जे यज्ञप्रकरणांतील मंत्र त्यांतील लिंगें आहेत आणि अर्थवाद ही आहेत॥ हें त्रिविध
कर्म जे योगी नव्हेत त्यांचें आहे। समाधी करून पूर्वोक्त योग ज्यांस सिद्ध झाला आहे त्यांचें नव्हे॥ अशुक्ल अकृष्ण म्हणजे पुण्याला किंवा
पापाला उत्पन्न करणारे नव्हे असें जें कर्म ते॥ विपाक म्हणजे पूर्वोक्त कर्माचे आशयद्वारा विपाक म्हणजे - जाति - आयुः - भोग एतद्रू
प फलविशेष म्हणजे भिन्नभिन्न फलें॥ जाति म्हणजे उत्तम देवादिक योनींत किंवा मध्यम मनुष्यादिक योनीत किंवा अधम पशुप
क्षिकीटादिक योनींत जन्म होणे॥ आयुष्य म्हणजे दीर्घायुष्य अल्पायुष्य होणे॥ भोग म्हणजे सुखदुःखानुभव होणे॥ आशय म्हणजे पूर्वोक्त
विपाकांस कारणभूत पूर्वोक्त कर्मापासून होणारे पुण्यपापाचे समुदायरूप संस्कार॥ सांगितलेले लक्षणाचा हा ईश्वर जीवाप्रमाणे असंग
चिद्रूपत्व आहे आणि तो जीवाचे स्वरूपाहून भिन्न आहे॥ जर भिन्न मानला तर बद्ध आणि मुक्त ही व्यवस्था होणार नाहीं॥ जीव आ
णि ईश्वर असंग चिद्रूपत्वें करून समान असतां तरी ईश्वरस्वरूपाचे ठाईं विशेष आहे यामुळें प्रकृत्यादि नियंतृत्वरूप ईश्वरत्व आ
हे॥ अशा असंग चिद्रूप परमेश्वरास नियंतृत्व आहे याविषयीं याचें किंवा याचे भयाने वायु नियमाप्रमाणे वाहतो - याचे भयानें
सूर्य नियमाप्रमाणें उदयास पावतो आणि अस्ताप्रत पावतो - याचे भयानें इंद्र आणि अग्नि हे आप आपला व्यापार नियमानें करतात।
याचे भयाने पांचवा मृत्यु ही नियमानेच धांवतो - याप्रमेश्वराचे आज्ञेने सूर्य आणि चंद्र भय धरून राहतात - प्रधान म्हणजे सत्त्व
रज तमो गुणाची जी समान अवस्था असते ती प्रधान किंवा प्रकृति म्हणतात - क्षेत्रज्ञ म्हणजे जीव यांचा पति म्हणजे निय
ता तसाच गुण म्हणजे सत्त्वादिक गुण त्यांचा ईश म्हणजे नियता अशा अर्थाच्या अनेक श्रुति आणि अंतर्यामी ब्राह्मण प्रमाण आ
हेत आणि क्लेशकर्मादिक नसल्यामुळें तें नियंतृत्व त्यास युक्तच आहे॥ जीवाचे ही स्वरूप वस्तुतः असंग चिद्रूपच आहे यामुळें
त्यांस ही क्लेशादिकांचा वस्तुतः म्हणजे परमार्थ दृष्टीने संबंध नाही। तथापि प्रकृति आणि तिचे कार्य जे देह इंद्रिय मनोबुद्ध्यादिक

त्या पासून आपले स्वरूप निराळे आहे असा अविवेकाने म्हणजे विवेक नसल्या मुळें जीवास देहादिकाचा संबंध आहे यामुळें त्याचें ईश्वराशी वैलक्षण्य आहे॥ ईश्वरास अविवेक नाहीं असें योगी म्हणतात॥ असंग चिद्रूप जो ईश्वर त्यास नियंतृत्व संभवत नाहीं। ते मानले तर त्याचा संबंध झाल्या मुळें त्याची असंगता राहणार नाहीं॥ यास्तव जीवाहून त्या ईश्वराचे वैलक्षण्यार्थ आणि त्यास नियंतृत्व जगत्कर्तृत्वादिकाचा संबंध होण्यास विभुपरमेश्वरास नित्य ज्ञान-नित्य इच्छा नित्य कृति म्हणजे प्रयत्न-असे गुण मानावे॥ त्यागुणांही करून त्या पुरुष विशेषत्व संभवते दुसरे प्रकारानें संभवत नाहीं॥ ज्ञानादिक तीन गुण ईश्वराचे नित्य आहेत याविषयी तो ईश्वर सत्य काम सत्य संकल्प आहे. सत्य म्हणजे नित्य अशा अर्थाच्या अनेक श्रुति प्रमाण आहेत असें तार्किक म्हणजे नैय्यायिक बोलतात॥ सृष्टि स्थिति-प्रलय करण्यास उपयोगी जें ज्ञान आणि इच्छा आणि प्रयत्न हे जर ईश्वराचे नित्य आहेत तर सर्वदा सृष्टिच किंवा स्थिति किंवा प्रलयच होतील॥ क्रमानें जे होतात ते होणार नाहीत। यास्तव पूर्वोक्त लिंग देह समष्ट्यभिमानी सर्व जीव प्रधान रूप हिरण्य गर्भच ईश्वर आहे। या हिरण्य गर्भास ईश्वरत्वाविषयी हिरण्य गर्भाचे माहात्म्य ज्यांत मोठे विस्तारानें वर्णिलें आहे असे उद्गीथ वेदांतील ब्राम्हण सर्व प्रमाण आहे॥ या हिरण्य गर्भास लिंग शरीराचा संबंध असला तरी त्यास कर्म नाही यामुळे तो संबंध कर्म निमित्तक नाही। स्वकृत दु:खरूप मे फलाचे भोगा साठी जो कर्म निमित्तक शरीर संबंध होतो तोच जीव। यामुळे-हिरण्य गर्भ जीव नव्हे-तो ईश्वर आहे-असें हिरण्य गर्भाचे उपासक हैरण्यगर्भ बोलतात॥ स्थूल शरीराला सोडून लिंग शरीर कोठेंही दिसत नाही किंवा अनुभवास येत नाहीं यास्तव पूर्वोक्त स्थूल शरीराचे समष्टीचा अभिमानी असा सहस्र मस्तक-सहस्र चक्षु-सहस्र हस्तपाद-विराट् पुरुषच ईश्वर आहे। अशा विराट्पुरुषास ईश्वरत्वाविषयीं पुरुष सूक्त आणि ज्यास सहस्रावधि मस्तक चक्षु हस्त पाद आहेत अशा अर्थाच्या दुसऱ्याही श्रुति प्रमाण आहेत असें विश्व रूपाचें चिंतन करणारे बोलतात॥ कोणी चतुर्मुख देह ज्यास आहे असा जो ब्रम्हदेव त्यास ईश्वर असें म्हणतात आणि त्यास ईश्वरत्व आहे याविषयी प्रजापति जो ब्रम्हदेव तो या प्रजांप्रत उत्पन्न करता झाला। धाता म्हणजे ब्रम्हदेव यथापूर्व म्हणजे पूर्व कल्पींचे सृष्टी प्रमाणे सृष्टीप्रत करता झाला। या अर्थाची श्रुति प्रमाण दाखवितात॥ प्रजापति

जो ब्रम्हदेव तो विष्णूचे नाभिकमला पासून उत्पन्न झाला असें श्रुति पुराणांत सांगितले आहे यास्तव विष्णूच ईश्वर असे भागवत बोल
तात आणि विष्णूस ईश्वरत्व विषयीं सृष्टीचे पूर्वीं एक नारायणच होता ब्रम्हा तसाच ईशान म्हणजे रुद्र-अग्नि-सोम-आकाश-पृ
थिवी हीं कोणी नवती असें महोपनिषदांत सांगितलें आहे। पुरुषसूक्तांत ज्याचें स्वरूप वर्णिलें आहे असा जो नारायण तो या प्र
जांप्रत उत्पन्न करीन असें इच्छिता झाला। नारायणापासून ब्रम्हा रुद्र उत्पन्न झाले असें नारायणोपनिषदांत सांगितलें आहे। सृ
ष्टीचे पूर्वीं हें जग कांहीं नव्हतें। दिव्य देव नारायण एकच होता असें सुबालोपनिषदांत सांगितलें आहे। असेंच वैष्णवपुराणां
त नारायणाचेंच ईश्वरत्व करून वर्णन केलें आहे असें प्रमाण दाखवितात॥ या सर्व जगास कारण कोण असें विचार करणाऱ्या देवां
प्रत प्रथम म्हणजे सृष्टीचे पूर्वीं मी एकच होतो असें शिव बोलला असें आथर्वशिरसांत सांगितलें आहे। जेव्हां तमच होतें दिवस किंवा
रात्र नव्हती - सत म्हणजे व्यक्त झालेलें जग असत म्हणजे अव्यक्त जग नवतें तेव्हां केवळ शिवच होता तो शिव अक्षर ब्रह्म आहे अ
सें श्वेताश्वतर मंत्रोपनिषदांत सांगितलें आहे। जो देवाचा पूर्व आणि नंतर आहे आणि विश्वाधिक म्हणजे सर्वांपेक्षां श्रेष्ठ रुद्र महर्
षी आहे तो आपले पासून उत्पन्न झालेल्या हिरण्यगर्भाचें ज्ञान पाहता झाला असें तैत्तिरीय शाखेंतील मंत्रांत सांगितलें आहे। ब्रह्म
- विष्णु - अग्नि - इंद्र हे सर्व उत्पन्न होणार आहेत या सर्वांचे कारण जो सर्वैश्वर्य संपन्न सर्वेश्वर शंभु म्हणजे शिव तोच ध्येय-
म्हणजे जगाचे कारणत्वें करून ध्यान करण्यास योग्य आहे असें आथर्वशिरसांत सांगितलें आहे आणि बहुत उपनिषदांत शिवच
जगास कारण असें सांगितलें आहे। अष्टादश पुराणामध्ये दहा पुराणांत शिवाचें माहात्म्य वर्णिलें आहे। विष्णूचें चार पुराणांत मा
हात्म्य वर्णिलें आहे आणि शिवाचे पायांचा ठिकाण पाहावयास विष्णु समर्थ झाला नाहीं असें दहा पुराणांत वर्णिलें आहे यावरून शिवच ई
श्वर आहे विष्णु ईश्वर नव्हे असें शैव बोलतात॥ जेव्हां त्रिपुराचा म्हणजे पुरत्रयाचा दाह केला तेव्हां तें कर्म निर्विघ्न व्हावें यासाठीं शि
वानी गणपतीची पूजा केली असें पुराणादिकांत वर्णिलें आहे यास्तव गणपतीच ईश्वर असें गाणपत्य बोलतात। याप्रमाणें त्या त्या
देवतेचे प्रकाशक मंत्र तसेच वेद पुराणादिकांतील अर्थवाद वाक्यें म्हणजे त्या त्या देवतेची स्तुति करणारीं वाक्यें तसेंच कल्प म्ह

णजे त्यात्या देव ताचे उपासना करण्यात अनुष्ठान प्रयोग याचा आश्रय करून भैरव-मल्लारी-मारिका-यक्ष-राक्षस-अश्वत्थ-वट
जल-पाषाण-मृत्तिका-यव-व्रीहि-तातणी-कुराड-कोयता-तरवार-इत्यादिकांस कुलदेवतादिक बुद्धीने ईश्वर मानून त्याची पू-
जा करणारे पुष्कळ लोक आहेत॥ त्या पूज्य पूजकाचे तारतम्याने त्या पूजेमाहून फळे ही होतात असे मानतात॥ याप्रमाणे मायेनें
विचित्र शक्तीने हीं ईश्वर स्वरूपे आणि पूर्वोक्त देहादि जीव स्वरूपे भासविली आहेत॥ त्याविषयी पूर्वोक्त लोकायतादि सांख्यांत
जीव वादी तसेच योगादिक स्थावरांतेश्वर वादी ज्यास ज्यांस मायेने जसे जसे जीव आणि ईश्वर रूप भासविले आहे त्याचा त्याचा अभि
मान धरून जीवेश्वराचे स्वरूपा विषयीं विवाद करतात, जरी हीं जीवेश्वर स्वरूप मायेने भासविली नाहीत तर सर्व श्रुति पुराणात एके
ईश्वराचें प्रतिपादन करावें। विकल्प असू नये। जे वस्तु वास्तविक असते आहे ते तसेच सर्वदा आहे किंवा राहतें। विकल्प पुरुषाचे बुद्धी
ने मात्र होतात। बुद्धीने अनेक विकल्प केले तरी ते मनोमय विकल्प आहेत वास्तविक नव्हेत॥ यामुळे ज्या वस्तूवर विकल्प होतात तें वस्तु
एकरूपच राहते विकल्पाने भिन्न होत नाहीं। यात उदाहरण। जसा पुरोवर्ति पदार्थ एकच असता भ्रमाने कोणी स्थाणू अशी कल्पना क
रतो कोणी पुरुष अशी कल्पना करतो। द्रष्टुबुद्धीने कल्पिलेले स्वरूप मात्र भिन्न होते। मुळचें स्वरूप भिन्न होत नाही अथवा ईश्वर निर्मित मा
नास्ति मय स्त्री स्वरूपतः एकच असतां ही भर्तृसंबंध उपाधि बुद्धीने भार्या-श्वशुर संबंधोपाधिबुद्धीनें स्नुषा-भर्तृभगिनी संबंधरूप उ
पाधिबुद्धीनें ननांदा म्हणजे नणंद-देवर म्हणजे दीर त्याचे पत्नी स्वरूप उपाधिबुद्धीनें याता म्हणजे जाऊ इत्यादिक अनेक कल्पनेस योग
्य होते। याप्रमाणें अद्वितीय असंग सच्चिदानंदात्मक वस्तु-माया आणि मायेने भासविलेली जी मायेची कार्यें देहेंद्रियादिक आ
णि मायेचे जे गुण सत्त्व रज तम किंवा त्यांची कार्यं यांचे संबंधानें जीव ईश्वर अशा व्यवहारास योग्य होऊन त्याचे ठाई आपले भ्रां
तीनें पूर्वोक्त जीवेश्वरा विषयीं ज्या अनेक कोणी अनेक कल्पना केल्या तरी ते पारमार्थिक अद्वैत असंग वस्तु भेद पावत नाही। तें अ
खंड एकच निरुपाधिक आहे यास्तव त्यात्या वादीनीं त्यात्या जीवेश्वराचे स्वरूपा विषयीं प्रमाण म्हणून दाखविलेल्या सर्व श्रु
ति त्यात्या मताप्रमाणें अविद्येने किंवा मायेने भासविलेले जीवेश्वराचे स्वरूपाचा जो अनादि भ्रम त्यात्या वादीस झाला आहे त्या

न्या अनुवाद रूपच आहेत यथार्थ वस्तु विषयीं विकल्प नाहीं यास्तव आत्मवस्तूचें यथार्थ स्वरूप सांगणाऱ्या नाहींत॥ यास्तव श्रुतींतील
उपक्रम म्हणजे आरंभ आणि उपसंव्हार म्हणजे समाप्ति यांहींकरून चांगला तात्पर्य निर्णय होण्यास विचार केला म्हणजे ब्रम्हात्मतत्व
असंग अद्वितीयच आहे असें सिद्ध होतें॥ त्याविषयीं एक दोन उदाहरणे लिहितों॥ तैत्तिरी योपनिषदांमध्यें आत्मस्वरूप ब्रम्ह सत्य
ज्ञानानंद स्वरूप आहे असा आरंभ करून ज्यापासून वाणी आणि मन निवृत्त होतात म्हणजे वाणीस आणि मनास अगोचर जें आ-
हि तें ब्रम्ह अशी समाप्ति केली। तशीच छांदोग्योपनिषदांत सद्रूप अद्वैत ब्रम्हाचा उपक्रम करून तें ब्रम्ह तूच आहेस असा उपसं
हार केला आणि दोहोंत ही लोक दृष्टीनें जो जीवेश्वर जग या भेदाचा भ्रम झाला आहे त्याचा जगाची सृष्टि सांगून त्याउपाधीनें त्या
भेद भ्रमाचा अनुवाद केला॥ याच प्रमाणें सर्वोपनिषदांत आहे॥ अविद्या दशेंत पूर्वोक्त सर्व व्यवहारास आणि त्यांतील पदार्थांस
सत्यत्व भासलें तरी परमार्थतः आत्म्यास कर्तृत्व कारयितृत्व नाहीं असें अद्वितीय आत्मतत्वाचें वास्तविक स्वरूप श्रुतिच सांगते॥ अ
विद्या दशेंत जीवाचा आणि ईश्वराचा भेद असून ईश्वरास पूर्वोक्त पुण्यपाप कारयितृत्व व्यावहारिक असले तरी लोक व्यवहारां
त कोणी अपराध केला तर त्यास दंड करून दुःख देणारा आणि यथान्याय मार्गामें वर्तणारावर अनुग्रह करून सुख देणारा जो
धार्मिक राजा तो विषम भाव आहे - निर्दय आहे - असें कोणी ही म्हणत नाहीं प्रस्तुत अपराधी कोण निरपराधी कोण आहेत अ-
सा यथार्थ विवेक न पाहून त्याणीं सर्वांवर साम्य दृष्टि ठेविली तर तो लोकांत निंद्यच होतो त्याप्रमाणें परमेश्वर जीवांची जीं अ
नादि कर्में तदनुसार त्यांस पुण्य कर्मा विषयीं किंवा पाप कर्मा विषयीं वर्तवीत असला किंवा कोणी सुखी कोणी दुःखी असी वि
षम सृष्टि करीत असला तरी त्यास वैषम्य किंवा निर्दयत्व नाहीं। जर ईश्वर आपले इच्छेप्रमाणे आपले प्रयोजना साठींच करील
तर त्यास वैषम्यादिक येईल तसें करीत नाहीं आणि करवीत ही नाहीं। सर्व सृष्टि स्थिति प्रलयादिक कर्में जीवांचे कर्मानुसा
र त्यास त्याचे कर्माचें सुखदुःख देण्या करतांच करतो॥ १५॥ ते पूर्वोक्त आत्मस्वरूपाचें आवरण करणारें जीचें अज्ञान वेदांता
तील महावाक्य प्रमाणापासून झालेलें - मी ब्रम्ह आहे - असा आत्मतत्वाचे ज्ञानानें नाशाप्रत पावविलें आहे त्यांचे तें ज्ञान सूर्यजसा सर्वअप्रम

तमाचा नाश करून प्रकाशित करतो त्याप्रमाणें तत म्हणजे ते जें सच्चिदानंदरूप आणि परमार्थतः सद्रूप पर म्हणजे ब्रम्ह त्याप्रतस्व तें करून प्रकाशित करतें॥ यास्तव अनर्थप्रद जे अज्ञान त्याचा नाशार्थ ज्ञान संपादिजे ॥१६॥ आत्मतत्वज्ञानानें प्रकाशित होणारें जें ते ब्रम्ह त्याचे ठाई आहे बुद्धि म्हणजे वेदांतवाक्यापासून - ब्रम्ह आहे अशीपरोक्ष ज्ञानरूप बुद्धि - ज्याची आणि वेदांताचें श्रवण मननें करून प्रमाणावरून ज्यांची स्वरूपें निश्चित आहेत असा प्रमाणासंभावना आणि प्रमेयाचा संभावना - जाऊन तेंच ब्रम्ह ज्याचा आत्मा आहे असे म्हणजे आत्मा ब्रम्हच आहे अशा ज्ञानानें युक्त आणि त्याच ब्रम्हाचे ठाई आहे निष्ठा म्हणजे मध्ये दुसरी विजातीय अनात्म विषयक वृत्ति नहोतां मी ब्रम्ह आहें अशा सजातीय मनोवृत्तीचा प्रवाह त्याचा म्हणजे निदिध्यासनानें देहादिकावर आत्मबुद्धिरूपजी विपरीत भावना तीणें करून रहित आणि तेंच ब्रम्ह आहे परायण म्हणजे अज्ञानरूप उपाधी त्या नाशानें स्वात्मत्वें करून प्राप्य

ज्ञानेनतु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ॥ तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परं ॥१६॥

तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः॥ गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः॥१७॥

विद्याविनयसंपन्ने ब्राम्हणे गवि हस्तिनि॥ शुनिचैवश्वपाके च पंडिताः समदर्शिनः॥१८॥

ज्यांस असे जेते ज्ञानेकरून निर्धूत म्हणजे गेलें आहे कल्मष म्हणजे अज्ञान ज्यांचे असे होत्साते अपुनरावृत्तिं म्हणजे जो प्राप्त झा ल्यानंतर पुनः जन्ममरण प्रवाहरूप संसार प्राप्त होत नाहीं अशा मोक्षाप्रत पावतात ॥१७॥ आता असे जे तत्ववेत्ते त्यांची पारमार्थिक बुद्धि कशी होते ते सांगतात ॥ पंडा म्हणजे वेदांतश्रवणापासून झालेले ब्रम्हात्मा परं सज्ज्ञान ते ज्यास झाले आहे ते पंडित। ते विद्या म्हणजे वेदाध्ययन किंवा वेदार्थ ज्ञान - विनय म्हणजे नम्रता याहीकरून युक्त जो उत्तम ब्राम्हण त्याचे ठाईं तसाच श्वानाचा पाक करणारा म्हणजे श्वान मांस शिजवणारा जो चांडाळादिक त्याचे कर्मेंकरून जरी विरुद्ध आहेत तरी त्यांचे ठाईं तसेच गाय - हत्ती - श्वान हे जातीकरून अत्यंत विषम आहेत तथापि त्यांचे ठाईं तद्रूपें करून आणि स्फुरण रूपें करून भासणार ब्रम्ह एकच आहे असें पाहण्याचा ज्यांचा स्वभाव झाला आहे असे होत्साते मोक्षाप्रत पावतात। असा पूर्वश्लोकाशीं अन्वय करावा॥ तात्पर्य ब्राम्हण आहे - ब्राम्हण भासतो - चंडा

लमवादिक आहे-भासतो-याव्यवहारांत जी आहे अशीसत्ता भासते असेंजें स्फुरण म्हणजे त्यापदार्थांचा प्रकाश किंवा ज्ञान अनुभवास येतें तें ब्रम्हरूपच आहे। ब्राम्हण गाय इत्यादिकांचा जो शरीररूप आकार आणि ब्राम्हण-गाय-हे नाम त्यासद्रूप ब्रम्हावे वर्ई कल्पिलें तेंच आहे त्याची ब्रम्हसत्तेहून भिन्न सत्ता नाही। जशी सुवर्ण मृत्तिका यांपासून उत्पन्न झालेलीं कडीं-तोडे-कुडक्या किंवा घट-गडण इत्यादिक कार्यें यांत सुवर्ण मृत्तिका यांचे सत्तेहून भिन्न सत्ता नाहीं। त्यांचे कड्यांचे आणि घटाचे आकार आणि नावे मात्र भिन्न आहेत याप्रमाणें सच्चिद्रूप ब्रम्हापासून उत्पन्न झालेलें म्हणजे रज्जूवर सर्पाप्रमाणें भासलेजे ब्राम्हणादिक वैश्यलक्षणकरून जें सर्व जग-त्याचेआकार आणि नावे मात्र भ्रांतीनें निराळीं झालीं आहेत परंतु त्याची सत्ता ब्रम्हसत्तेहून निराळी नाहीं। नाम-आणि आकार हें सोडून पाहिलें म्हणजे आहे अशीसत्ता म्हणजे ज्ञान भासतें तद्रूप ब्रम्ह सर्वत्र एकच अखंड आहे। याप्रमाण विकार म्हणजे घट-गडण अशा व्यवहारांत आलेले वस्तु वाणीने निष्पन्न होणारे केवळ नाम मात्र आहे। केवळ म्हणजे त्यानामाचा

इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः॥ निर्दोषं हि समं ब्रम्ह तस्माद्ब्रम्हणि ते स्थिताः॥ १९॥

अर्थ म्हणून निराळा नाहीं असे सुचविले। तरकाय आहे मृत्तिका हेंच सत्यवस्तु आहे। याप्रमाणेच सद्रूपजें ब्रम्हत्या शिवाय त्यावर भासणाऱ्या जगाची निराळी सत्ता नाही। अस्ति-भाति-भासते-प्रिय नामरूप याप्रमाणें पांच अंश प्राय· सर्वच भासतात-त्यांत पहिले तीन अंश ब्रम्हाचें रूप। नामरूप हे जगाचें रूप अशा अर्थाच्या श्रुति स्मृति पुष्कळ आहेत॥१८॥ दोघे विद्यादिकांनी समान असतां त्यांचे पूजादिकांत विषम भाव जर केला तर समान एक विद्यादिकांनीं अधिक आणि एक न्यून किंवा उणा असे दोघे असतां दोघांची ही जरसारखीच पूजा केली तर तो पूजा करणारा लोकापासून आणि परलोकापासून च्युत होतो आणि तो अभोज्यान्न होतो म्हणजे त्याचे अन्नाचे भोजन करूं नये असे गौतम स्मृतींत सांगितलें आहे याकरून विषमाचे ठाईं समानबुद्धि करणें धर्मशास्त्र विरुद्धाचरण आहे तें करणें पंडितांस कसे योग्य आहे अशी शंका होईल तर त्याविषयी सांगतात॥ ज्यांचे मन त्यर्यांत पूर्वी लिहिल्या प्रमाणें साम्याचे ठाईं म्हणजे ब्रम्ह सत्ता सर्व भूतांचे ठाईं समानच आहे। भिन्न नाहीं असेंजें पाहणें-याचे

ठाईं स्थित म्हणजे राहिलें आहे त्यांनीं इहैव म्हणजे यादेहानें जीवंत असताच सर्ग म्हणजे जन्ममरण रूप संसार जितः जिंकिला आहे। हिंय स्मात् ज्या कारणास्तव ब्रम्हसत्ता सर्वत्र निर्दोष म्हणजे न्यूनाधिक्य रूप जो विषमभाव तद्रूप जो दोष तेणें करून रहित आहे ॥तात्पर्य। कवर्णा नें केलेलें देवतीचें आसन आणि देवतांच्या मूर्ती यांमध्ये [illegible] सुवर्णकारी सुवर्ण बुद्धीनें क्रयविक्रय काळीं समानच पाहतो। जो पूजक आहे तो मात्र त्याच्या आकार बुद्धीनें तारतम्य पाहतो। त्याप्रमाणें [illegible] ब्राम्हणादि देहाचे ठाईं ब्रम्ह बुद्धीनें साम्यच पाहतो। जो अज्ञानी आहे तो कर्में करून किंवा जाती करून तारतम्य [illegible] पूर्वोक्त गौतम स्मृति अज्ञानानें तारतम्य पाहणारे जे अज्ञानी आहेत त्याविषयींची आहे तत्वज्ञाना विषयींची नाहीं। याप्रमाणें ज्या कारणास्तव ते तत्वज्ञानी सर्वत्र ब्रम्ह निर्दोष आणि समानच-आहे असें पाहतात त्याकारणास्तव ते ब्रम्हाचे ठाईं स्थित आहेत म्हणजे ब्रम्हभूतच आहेत ॥१९॥ पूर्वोक्त साम्य बुद्धीचे स्थिरता

न प्रहृष्येत प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियं॥ स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रम्हवित ब्रम्हणि स्थित ॥२०॥

विषयीं साधन सांगतात॥ त्याकारणास्तव ब्रम्ह निर्दोष सर्वत्र एकच आहे त्याकारणास्तव प्रिय म्हणजे पुत्र विवाहादिक यांच्या प्राप्तीनें हर्ष पावूं नये आणि अप्रिय म्हणजे शत्रु दुःखादिक यांच्या प्राप्तीनें उद्वेग म्हणजे खेद पावूं नये। यासाधनानें पूर्वोक्त श्रुति आणि-युक्ति यांचे विचारानें आत्मा अद्वितीय ब्रम्हच आहे असा स्थिर केला आहे बुद्धि म्हणजे प्रज्ञा ज्याणें असा आणि असंमूढ म्हणजे अ[illegible]निदिध्यासनात्मक ध्यानानें झालेला जो ब्रम्हात्म साक्षात्कार तेणें करून गेला आहे मोह म्हणजे अज्ञान ज्याचें असा। या कारणास्तव ब्रम्हवित् म्हणजे स्वात्मत्वें करून निदिध्यासन काळीं ब्रम्हप्राप्ति झालेला तो निदिध्यासन रूप जो समाधि त्यापासून जेव्हां उठतो तेव्हां ही ब्रम्हाचे ठाईं स्थित आहे म्हणजे तो ब्रम्हच आहे ॥ २०॥

निदिध्यासनानें आलेलें करून ब्रम्हसाक्षात्कार होण्या पूर्वीं ज्याचा कधींही अनुभव नाहीं अशा ब्रम्हसुखाचे लाभाचे इच्छेने नि-
रंतर अनुभविलेले प्रसिद्ध बाह्य विषय सुख टाकणें अशक्य आहे तेव्हां - न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य - असें कसें सांगतां अशी शंका होई-
ल तर त्याविषयीं सांगतात ॥ बाह्यजे स्पर्श म्हणजे - विषय आणि इंद्रियें यांचे संबंध - त्याचे ठाई म्हणजे त्यापासून होणाऱ्या सुखानुभ-
वाचे ठाईं आसक्त म्हणजे इच्छारहित आहे मन ज्याचें असा होऊन जो आत्मनि म्हणजे अद्वयानंद रूप स्वात्म्याचे ठाईं सुषुप्तिस-
मयीं राहून यत् म्हणजे ज्यासुखाप्रत विंदति म्हणजे अनुभवितो तो सः म्हणजे सुख पावतो। कोणतें तें सुख तें सांगतात - ब्र-
म्हाचे ठाईं जो योग म्हणजे समाधि त्याचे ठाईं युक्त म्हणजे योजला आहे आत्मा ज्याणें तो ब्रम्हयोगयुक्तात्मा म्हणजे ब्रम्हसु-
ख स्वरूप ब्रम्हवेत्ता म्हणजे ब्रम्हसुख असें तात्पर्य। ब्रम्हवेत्ता ब्रम्हच होतो अशा श्रुतीवरून ब्रम्हवेत्ता ब्रम्हसुख रूपच आ-
हे अशाया अर्थाचें प्रतिपादन करणारे ब्रम्हयोगयुक्तात्मा हे पद पुल्लिंगी आहे म्हणून तत् असें न म्हणून सः असें म्हटलें आणि

बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखं ॥ स ब्रम्हयोगयुक्तात्मा सुखमक्षयमश्नुते ॥ २१॥

त ब्रम्हयोगयुक्तात्मा - असें न म्हणून म्हणजे त्या सुखाप्रत ब्रम्हवेत्ता अनुभवितो असें न म्हणून स ब्रम्हयोगयुक्तात्मा - म्हणजे
तो ब्रम्हवेत्ता असें म्हटले तें ब्रम्हवेत्ता ब्रम्हच आहे यामुळें म्हटलें। ब्रम्हसुख आणि ब्रम्हवेत्ता हे निराळे नाहींत। तो सुख स्वरू-
पच आहे असें सुचविलें। सुषुप्तिकाळीं आणि समाधिकाळी एकच सुख आहे तर मग सुषुप्त म्हणजे निजलेला आणि समाधि-
स्थ यांचा काय विशेष अशी शंका होईल तर त्याविषयीं सांगतात। ब्रम्हवेत्ता अक्षय जें मोक्ष सुख त्याप्रत अनुभवितो। समाधिका-
लीं आणि सुषुप्तिकाळीं देहेंद्रिय विषयादिक द्वैताचें दर्शन न होणें तुल्य जरीं असले तरीं आत्मतत्व ज्ञानानें अज्ञानाचे नाश
मुळें ब्रम्हवेत्ता अक्षय ब्रम्हसुखाप्रत अनुभवितो। सुषुप्ताचे मूलाज्ञानाचा उच्छेदन झाल्यामुळें त्यास सुषुप्तिकाळीं जरी ब्र-
म्ह आणि आत्मा याचें एकत्व झाल्यामुळे ब्रम्हात्म सुखाचा अनुभव झाला तरी सुषुप्तीहून उठल्या नंतर तो नाहीं यामुळे त्या-
चा विशेष आहे। एणेकरून ब्रम्हसाक्षात्कार होण्यापूर्वींही सुषुप्तीत ब्रम्हसुखाचा अनुभव आहे यामुळें त्या सुखाचे इच्छेने नि-

रंतर अनुभविलेल्या बाह्य विषय स्मरणाचा त्याग करणें शक्य आहे अशक्य नाहीं असा पूर्वोक्त शंकेचा परिहार केला ॥ २१॥ जर मोक्षसु
रव सध्यासीतील स्मरवा सारखें आहे तर त्या मोक्ष सुखार्थ बाह्य दिव्य अन्नपान स्त्री गीत वाद्यादिकांपासून होणाऱ्या सुखाचा कोणअ
ज्ञानी त्याग करील अशी शंका होईल तर त्या विषयी - बाह्य सुख अनित्य आहे - असें त्याची निंदा करून सांगतात ॥ जो विषय आणि इं
द्रिय यांचे संबंधापासून होणारे भोग म्हणजे सुखें आहेत ते दुःखांचीं पूर्णि नाश यांहीं करून युक्त आहेत यास्तव दुःखासच योनि
म्हणजे कारण आहेत। पुत्र झाला म्हणजे जे सुख ते पुत्र मरणपावला म्हणजे नाश पावत आणि फार दुःख होते यास्तव तशासु
खाचे ठाईं त्याचा परिणाम पाहणारा बुध म्हणजे ज्ञानी रमत नाहीं म्हणजे त्या विषयीं आसक्त होत नाहीं ॥ २२॥ तर उत्तम सुखी को
ण असें म्हणाल तर त्या विषयी सांगतात ॥ इहैव म्हणजे याच देहात असतांना शरीरविमोक्षणापूर्वी म्हणजे मरणापूर्वीच। एणेंकरू
न मरण पर्यंत पुढें अवश्य करावयास सांगतात जो काम क्रोध यांचा वेग तो त्या ज्ञाला असा विश्वास धरूं नये असें सुचविले। ऐकिलेला कि

ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते। आद्यन्तवन्तः कौन्तेय न तेषु रमते बुधः॥ २२॥

शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात्। कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३॥

वा पाहिलेला जो विषय त्याविषयी तृप्ति न होता जी तृष्णा तो काम त्यापासून उत्पन्न झालेला जो वेग म्हणजे आंगावर रोमांच उभेरा
हणे आणि नेत्र मुख हर्षयुक्त होणे या चिन्हांनें अनुमित होणारा जो मनाचा क्षोभ त्याचा वेग कामाचा कोणीं प्रतिबंध केल्या मु
ळें जो क्रोध रूपानें परिणाम होतो तो क्रोध त्यापासून उत्पन्न झालेला जो वेग म्हणजे आंगास कांप सुटणें - ओंठ चावणें - नेत्र रक्त होणें
या चिन्हांनीं अनुमित होणारा जो मनाचा परिणाम त्याप्रत सहन करण्या विषयीं जो शक्नोति म्हणजे समर्थ होतो तोच युक्त म्हण
जे मुख्य योगी आणि उत्तम सुखी आहे किंवा म्हणावा दुसरा नाहीं। अथवा योगवासिष्ठांत सांगितल्या प्रमाणें मरणानंतर विल
प करणाऱ्या स्त्रियांनी आलिंगन केलेला आणि पुत्रादिकांनी दाह केलेला गतप्राण पुरुष कामक्रोधाचे वेगाचें सहन करतो -
म्हणजे जसें त्यास ते उत्पन्न होत नाहींत तसा। मरणापूर्वी म्हणजे जीवंत असतांही जो काम क्रोधाचे वेगाचें सहन करतो -

तो युक्त म्हणजे सावधान आणि स्वरा म्हणावा। दुसरा अर्थान व नाही ॥ २३ ॥ आतां मुख्य योग्याचे आणि उत्तम स्वयाचे स्वरू प सांगून केवळ कामक्रोधाचें वेगाचेंच सहन केल्यांनि मोक्षस्वरूप प्राप्त होतें असें नाही त्याविषयीं दुसरीं ही साधनें पाहिजेत- असें सांगतात ॥ जो अतः म्हणजे आत्म स्वरूपाचे ठाईं स्वरव म्हणजे प्रीति मानितो म्हणजे करतो आणि बाह्य विषयाचे ठाईं- प्रीति करीत नाही तो अंतः स्वरव। तसाच आत्म्याचे ठाईं आहे आराम म्हणजे मनोवृत्ति सचाररूप प्रीति उत्पन्न होण्याचे का रण स्त्रियादिकाबरोबर क्रीडा ज्याची तो अंतरराम म्हणजे स्त्रियादिकां बरोबर क्रीडाकरून जो प्रीति भत पावत नाहीं। तसाअं तः म्हणजे आत्म्याचे ठाईं आहे ज्योति म्हणजे दृष्टि ज्याची आणि क्रीडा उपकरणे जीं गीत नृत्यादिक त्याचे ठाईं ज्याची दृष्टि नाहीं तो अंत र्ज्योति असा जो तो योगी म्हणजे मुख्य योगी आहे। कारण तो योग्यांस प्राप्त व्हावयाचें जें ब्रम्हरूप मोक्षस्वरव त्याप्र

योंतःस्वरवों तराराम स्तथा न र्ज्योतिरेवयः॥ सयोगी ब्रम्ह निर्वाणं ब्रम्हभूतो धिगच्छति॥२४॥
लभंते ब्रम्ह निर्वाण मृषय क्षीणकल्मषाः॥ छिन्न द्वैधा यतात्मानः सर्व भूत हिते रता॥ २५॥

त-ब्रम्हभूत म्हणजे जिवत असता यादेहांनच ब्रम्हात्म तत्व ज्ञानाने अज्ञान नाश होऊन ब्रम्हस्वरूपाप्रत पावला आहे यामुळे अनुभवितो ॥२४॥ अद्वैत ब्रम्हात्म तत्व ज्ञाने करून ज्यांचें कल्मष म्हणजे अज्ञान रूप पाप नाशपावलें आहे आणि या कारणा स्तव छिन्न म्हणजे नाशपावले आहे द्वैध म्हणजे आत्मा देहच किंवा देहाहून भिन्न आहे-भिन्न असला तरी कर्ता भोक्ता आ हे किंवा नाहीं-अकर्ता अभोक्ता असला तरी ब्रम्ह स्वरूप आहे किंवा त्याहून भिन्न आहे इत्यादिक संशय ज्यांचे आणि य त म्हणजे योगाभ्यासाने स्वाधीन झाले आहे आत्मा म्हणजे मन ज्यांचें आणि सर्व प्राण्यांचे हिता विषयीं रत असे ऋषि- म्हणजे तत्व ज्ञानी पूर्वींचे श्लोकांत सांगितलेले जे ब्रम्ह निर्वाण म्हणजे मोक्षस्वरव त्याप्रत पावतात म्हणजे अनुभ वितात ॥ २५॥

काम क्रोधादी करून जे रहित आणि यत म्हणजे स्वाधीन झाले आहे चित्त ज्यांचे असे समाधिस्थ योगी आणि विदित म्हणजे समाधि किंवा निदिध्यासन यांहीकरून आत्मा ब्रम्ह बे करून अपरोक्ष जाणला आहे आणि यती म्हणजे ब्रम्हापरोक्ष ज्ञान झाल्या नंतर जीवन्मुक्ति सुखानुभवार्थ ज्यांणी मन त्याग केला आहे त्यास अभित म्हणजे मरणानंतर आणि मरणा पूर्वींही ब्रम्ह म्हणजे ब्रम्ह स्वरूपानें स्थितिरूप मोक्ष वर्तत आहेच ॥ २६॥ याप्रमाणे उत्तम ज्ञाननिष्ठा ज्यास प्राप्त झाली आहे त्यास तत्काळीच मुक्ति सांगितली आणि कर्म योग फलेच्छा सोडून केवळ ईश्वर प्रीत्यर्थ केला असता चित्त शुद्धि आणि ज्ञान प्राप्ति होऊन त्याद्वाराने मोक्षास साधन होतो असेही सांगितले आता पुढे साहाव्या अध्यायात प्रत्यक्ष परोक्ष ज्ञानास अंतरंग साधन जो योग तो विस्तारें करून सांगावयाचा आहे त्याचा सूत्र भूत संक्षेप स्थूल तीन श्लोकांनी या अध्यायांत सांगतात ॥ या तीन श्लोकांतील प्रथम श्लोकाचे-प्राणापानौ समौ कृत्वा-या उत्तरार्धात पूर्वीं जी योगाची अष्टांगे सांगितली आहेत त्यांतील प्राणायाम सांगितला। स्पर्शान्कृत्वा ब-

काम क्रोध वियुक्तानां यतीनां यतचेतसां॥ अभितो ब्रम्ह निर्वाण वर्तते विदितात्मनां॥ २६॥

हिर्बाह्यान्-एणे करून प्रत्याहार सांगितला। चक्षुश्चैवांतरे भ्रुवो. क- या-एणे करून धारणा सांगितली। विगतेच्छा भयक्रोधः-एणे करून यम आणि नियम साधन भूत आणि फलभूत असे दोन प्रकारचे आहेत ते सांगितले। सवितर्क-सविचार-सानंद आणि सास्मित याभेदानी संप्रज्ञात समाधि चार प्रकारचा आहे त्यांतील यतेंद्रिय.-एणे करून सवितर्काख्य संप्रज्ञात समाधि सांगितला। यतमना-एणे करून सविचार संप्रज्ञात समाधि सांगितला। यतबुद्धि-एणे करून सानंद सास्मित हे दोन संप्रज्ञात समाधि सांगितले। संप्रज्ञात आणि असंप्रज्ञात याची पूर्वी सामान्य लक्षणे सांगितलीच आहेत। ज्ञा समाधीतें उपास्य किंवा ध्येय वस्तु याचा जो स्थूलांश चतुर्भुजादिक त्याचा साक्षात्कार होतो तो सवितर्क। ज्यांत सूक्ष्मांश अव्यक्त माया रूप शरीराचे साक्षात्कार होतो तो सविचार। या दोहोंचे अभ्यासाने आल्हाद साक्षात्कार ज्यांत होतो तो सानंद। यातिहींस कारण जी बुद्धि ध्यान करणार द्रष्टा त्याशी एकत्व झालेली अंतःकरण वृत्तिती अस्मिता। तिचा साक्षात्कार ही अस्मिता तो ज्यांत होतो तो सास्मित। अ

शीं त्यांचीं ही विशेष लक्षणे आहेत॥ मोक्षपरायण-एणेकरून असंप्रज्ञात समाधि सांगितला। प्राणायाम सांगितल्यानें त्यास साधन भूत आसनादिक हीं सूचविलीं। समाधि सांगितल्यानें त्यास साधन ध्यान धारणा ही सूचविल्या। याशिवाय दुसरे पदांनी योगफळ सांगितलें। असा विभाग आहे। हा विभाग सांगण्यासाठी या श्लोकांतील पदांचा क्रम न घेतां अर्थाचे क्रमानें पदांची व्याख्या लिहितो। विगतेच्छा भयक्रोधः याचा विगतेच्छ-विगत भय आणि विगत क्रोध असा अर्थ। ज्यास इच्छा आहे तो आपलें इच्छित इष्टसिद्ध व्हावें यासाठी हिंसा-असत्य-स्तेय-परिग्रह-यांहीं युक्त होतो। विगतेच्छ म्हणजे इच्छा रहित असा अर्थ आहे यावरून हिंसादिक त्यास नाहीत यामुळें त्यांस विरुद्ध जे अहिंसा-सत्य-अस्तेय-अपरिग्रह रूप पूर्वोक्त स्वरूप यम ते सूचविले। भय म्हणजे आपला उच्छेद होईल अशी शंका ती ज्यास आहे तो शौच-संतोष-तप-स्वाध्याय-ईश्वर प्रणिधान यांहीं युक्त होण्यास समर्थ होत नाहीं। विगतभय म्हणजे भयरहित असा अर्थ आहे यास्तव संतोषादिक पूर्वोक्त स्वरूप नियम सूचविले। पूर्वोक्त रूप धारणा ध्यान समाधि एकत्र झाले म्हणजे संयम होतो त्यासच चित्त प्रसादन किंवा मनो निग्रह म्हणतात। त्यास कारण प्राणायाम किंवा वासना नाश आहे। वासना नाश होऊन चित्त नैर्मल्य किंवा प्रसादन होण्यास कारण मैत्री-करुणा-मुदिता-उपेक्षा-याची भावना आहे। सुखित प्राणी पाहून त्याचे ठाई हे सर्व सर्व प्राणी माझे मित्रच आहेत अशी भावना करावी। अशी भावना केल्यानें याचे सुख तें माझेच आहे असे ज्ञान होऊन सर्व सुख विषयांचा अभिलाष नाहीं सा होतो। नंतर व्यग्रता रूप कलुष भाव होण्यास कारण नाही यामुळे चित्त निर्मल होऊन एकाग्र होते। त्यासच मनोनिग्रह किंवा मनाचे प्रसादन म्हणतात। याप्रमाणें दुःखित प्राण्याचे ठाईं करुणेची भावना करावी म्हणजे आपणास दुःख जसें असह्य आहे तसेंच दुसऱ्यासही असह्य म्हणजे सहन करण्यास अशक्य आहे असा दुःखावर द्वेष होऊन हे कोणासही होऊं नये असा दयेचे भावन करावे। अशी भावना करणाऱ्याच्या व्याधादिकावरील ही द्वेष निवृत्त होऊन त्याचे चित्त प्रसन्न होते। याप्रमाणे पुण्य करणार पुण्यवंता प्रत पाहून त्याचे ठाईं मुदितेचे भावन करावें म्हणजे त्यास पाहून हर्षाचे भावन करावे। आपण हर्षित व्हावे म्हणजे या पुण्ये करून आपण ही पुण्यवान् होतो। याप्रमाणें पापीज

न पाहून त्याविषयीं उपेक्षेचें भावन करावें। त्याचीउपेक्षाच करावी म्हण जे आपण पापापासून निवृत्त होतों। नतर चित्त प्रसन्न होतें। याप्रमा
णें मैत्र्यादिकांचे भावनेनें वासना नाश होऊन संयम होतो॥ जो क्रोधानें युक्त आहे तो सांगितल्या प्रमाणें मैत्र्यादिकांची भावना करण्यास
समर्थ होत नाहीं। विगत क्रोध याचा क्रोध रहित असा अर्थ आहे यामुळें त्यास पूर्वोक्त मैत्र्यादिकांच्या भावना होऊन मनाचे प्रमाद्यनौंको
या एकाग्रता रूप निग्रहानें होणारें धारणाध्यान समाधि आणि त्यांचा समुदाय एकत्र झाला म्हणजे होणारा संयम कथन केला। या
प्रमाणें साधकावस्थेत यम नियम आणि चित्त प्रसादन या चा सिद्धि होण्या साठीं निरिच्छत्व-निर्भयत्व-निष्क्रोधत्व-हीं साधनें
सर्वांनीं पाहिजेत त्या प्रमाणें फलावस्थेचे ठाईं ही तीं साधनें पाहिजेत असें योग शास्त्र संमत आहे ते असें। संप्रज्ञात समाधि सि
द्ध झाला म्हणजे मधुमती या नावाची भूमिका प्राप्त होते। त्या अवस्थेत साधक योग्यास इंद्रादि देवांनीं एथें बसावें-हीं सुंदर घरें
हेत-या सुंदर स्त्रिया आहेत-हीं भक्ष्य भोज्य पेय द्रव्य जरामरणास ..कारीं आहेत-हीं द्रव्य चमत्कार विनोद करण्या जोगीं आ
हेत-हे आम्ही सर्व आपले सेवक आहोत-हें स्थान तुमचे व पुण्यानें प्राप्त झालें आहे-अशी प्रार्थना करतात ती केली असतांना
पदार्थांचा संबंध किंवा हे भाषणास मिळावे अशी इच्छा करू नये आणि त्या देवांनीं पूर्वोक्त प्रार्थना केल्यामुळें मी मोठा देवांस
ही प्रार्थना करण्यास योग्य झालों असा स्मय म्हणजे गर्व करू नये। कारण त्या संग आणि स्मय पुढील प्राप्त होणाऱ्या असंप्रज्ञा
त समाधी पासून योग्याचा भ्रंश करण्यास हेतु म्हणजे कारण आहेत। यमें व भय हीं योगांतराय म्हणजे योगास विघ्न करणा
रे जे त्यांपासून होणारे आणि वितर्कापासून होणारें असें दोन प्रकार चें आहे। व्याधि-स्त्यान-संशय-प्रमाद-आलस्य-अ
विरति-भ्रांति दर्शन-अलब्ध भूमिकत्व-अनवस्थितत्व हे चित्ताचे विक्षेप त्यांस योगांतराय म्हणावें। व्याधि म्हणजे धा
तु रसादिकांच्या वैषम्यामुळें होणारा ज्वरादिक। स्त्यान म्हणजे चित्ताचे चंचलत्वामुळें त्यास कर्म करण्याची योग्यता नस
णें म्हणजे सिद्ध होईल कीं नाहीं असें ज्ञान। संशय प्रमाद म्हणजे का क्रोधादिक अथवा पूर्वी करावें असा निश्चय झा
ला असला तरी नंतर न करावे असा बुद्धि प्रमाद। आलस्य म्हणजे योगाचे अनुष्ठान करण्याची प्रवृत्ति होण्यास प्रति-

बंधक जे कफादिक तेणे करून शरीरास जें जडत्व येते तें। अविरति म्हणजे विषयांची तृष्णा। भ्रांति दर्शन म्हणजे रज्जूवरच
र्प बुद्धिसारखें हे कार्य सिद्ध होणार नाहीं व असे विपरीत ज्ञान। अलब्ध भूमिकत्व म्हणजे योगाभ्यास करणारास प्राप्त होण
यास समाधीच्या मधुमत्यादिक भूमिका सांगितल्या आहेत त्यांची प्राप्ति नहोणें। अनवस्थितत्व म्हणजे चित्ताचें स्थिरत्व पू
र्व भूमि सोडून पुढील भूमिका प्राप्त होण्यास पाहिजे ते नसणें। पूर्व भूमीवर स्थिर झालेलें चित्त व उत्तर भूमीवर आरोहण क
रतें यास तव चित्ताचें स्थिरत्व पाहिजे। सांगितलेले जे योगास विघ्न करणारे व्याधादिक अंतराय यांपासून शरीरास व म
नास दुःख होतें। मनाला दौर्मनस्य म्हणजे इच्छेचा विघात झाल्यामुळे क्षोभ होतो आणि अंगास कांप सुटतो। बाहेरचा वा
यु आंत घ्यावा त्यामुळें रेचक प्राणायाम होऊं नये। कोठ्यांतील वायु बाहेर न जावा यामुळे पूरक प्राणायाम होऊं नये अ
शीं हीं दुःखादिक उत्पन्न होऊन योगास विघ्न होते। वितर्क म्हणजे नियमांतील अहिंसादिकांचे विरोधी हिंसादिक। ते केले-

स्पर्शान् कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः॥ प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ॥ २७॥

यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः॥ विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः॥ २८॥

ले - करविलेले आणि अनुमोदन दिलेले असे तीन प्रकारचे आहेत। यांचीं फलेंही अनंत आहेत। योगांचे जे अंतरायसं
ची निवृत्ति पूर्वीं सांगितलेले ईश्वरप्रणिधान करून होते; वितर्कांची निवृत्ति यांचे विरोधी जे अहिंसादिक नियम त्यांही करू
न होते। अशा या विघ्नांनीं रहित आणि शुद्धचित्त होऊन योगाभ्यासार्थ सांगितलेले सुखासनावर कटि म्हणजे कंबर-
आणि वक्षस्थल म्हणजे उरस्थल आणि कंठ धरा म्हणजे मान यांनीं नम्र देहरचना केलेले शरीरास स्थापन करून आसनजय
म्हणजे आसनावर निश्चल बहुत वेळ बसण्याचा अभ्यास ... प्राणायामाचा अभ्यास करावा। तेणेकरून प्राण मंद
गति झाला म्हणजे मनाचें चांचल्य जाऊन ते स्थिर होते ... सांगतात। प्राण आणि अपान हे कुंभका
नें ऊर्ध्व गति आणि अधोगति यांचा विच्छेद होऊन नासिकेच्या ... असे सम म्हणजे अल्प करून नंतर

बाह्य म्हणजे बाहेरचे देशी झालेले जे स्पर्श म्हणजे श्रोत्र चक्षुरादिक इंद्रियांचे द्वारा अंतरजी बुद्धि किंवा अंतःकरण त्याचे ठाई निरंतर होणारे जे शब्दस्पर्श रूपादिक विषयांचे संबंध त्यापासून योग्याने पूर्वी सांगितलेला जो इंद्रियांचा प्रत्याहार तेणेकरून बहि. म्हणजे बाहेरच करावें आणि नंतर विषयापासून इंद्रियपराङ्मुख झाली असतां स्वस्थान इंद्रियें लीन होऊन विषयांचा इंद्रियद्वारा मनाशी संबंध न होतां अंतर्मनानें म्हणजे अंतर्वृत्ति मनानेंच राहावें यास प्रत्याहार म्हणतात। असा प्रत्याहार करण्यास जो समर्थ नाही त्याची काय गति त्याणें काय करावें - अशी शंका झाली तर त्याविषयीं दुसरा उपाय सांगतात। एथील त्व-शब्द वा म्हणजे विकल्प या अर्थी आहे। अथवा भ्रुवांचे मध्यभागीं चक्षूचे स्थापन करावें यास खेचरी मुद्रा म्हणतात। ही मुद्रा घशाच्या दोन छिद्रामध्यें जें मास लोंबत असें घंटिका त्याच्या ऊर्ध्वभागीं जें छिद्र आहे तेथें जिव्हा फिरवून स्थापन करावी आणि दृढ आसनावर चिरकाळ बसावें यास खेचरी मुद्रा म्हणावें अथवा भ्रूमध्यभागीं दृष्टीचें स्थापन करावें अशीही खेचरी मुद्रा होते असें महादेवानीं सांगितलें आहे। याप्रमाणें आंतरविषयाचे ठाई संयम करण्यास समर्थ जे नाहींत त्यांस पूर्वी ज्यांची स्वरूपें आणि फलें सांगितली आहेत असेजे सूर्यचंद्रादिकांचे ठाई संयम ते त्याणीं करावे। कांही एक स्थूल विषय सूर्य किंवा विष्ण्वादिक यांच्या प्रतिमा किंवा अविच्छिन्न नाद यांचे ठाई मनाचें धारण म्हणजे स्थापन करून त्याचा अभ्यास झाला म्हणजे आपला देह ही दिसत नाहीं। यास महाविदेहा नामक धारणा म्हणतात। ही सिद्ध झाली म्हणजे चक्षुरादिक इंद्रियें आपआपले विषयांचें ग्रहण करीत नाहींत। यास बाह्य विषय प्रत्याहार म्हणावें। आंतर विषय प्रत्याहार पूर्वी सांगितलाच आहे। जेव्हां चित्त देहाचें स्मरण टाकून पुढें केवळ मूर्त्याकार होतें तेव्हां त्या चित्ताचे मूर्त्याकार ते मनवृत्ति म्हणावे। जेव्हां देहाचें ही स्मरण न करतां केवळ ध्येय चतुर्भुजादि मात्राकार होतें तेव्हां त्यास महाविदेहा नामक धारणा म्हणावें। ती सिद्ध झाली म्हणजे त्यास बाह्य विषय समाधि म्हणावें। जेव्हां पूर्वापरानुसंधान नसून शब्दार्थांचा उल्लेख होऊन तत्पूर्वक या चतुर्भुजादि मूर्तीचें मी ध्यान करतों अशी भावना असून हा समाधि होतो तेव्हां त्यास सवितर्क बाह्य विषय समा

धि म्हणावें। जेव्हां पूर्वापर अनुसंधान नसून शब्दार्थाचा उल्लेख होऊन केवल ध्येय मूर्त्याकार पूर्वोक्त समाधि होतो आणि या मू
र्तीचें ध्यानमी करतों अशी ज्यांत भावना नसते तेव्हां त्यास निर्वितर्क बाह्य समाधि म्हणावें। हा मिद्ध झाला म्हणजे योग्यास जितें
द्रिय म्हणावें। आभ्यंतर प्रत्याहार पूर्वक जेव्हां मनानें कल्पिलेले सूक्ष्म विषयाचे ठाईं पूर्वापरानुसंधान असून शब्दार्थोल्लेखपू
र्वक मनाची भावना होते तेव्हां तो सविचार समाधि आणि पूर्वापरानुसंधान नसून शब्दार्थोल्लेखन होतां मनाची भावना जेव्हां
प्रवृत्त होते तेव्हां तो निर्विचार समाधि असें म्हणतात। यांत पूर्वीप्रमाणें सविचारांत मी याचें ध्यान करतों अशी भावना असते-
निर्विचारांत ती नसते। पूर्वींचे बाह्यविषय स्थूला विषयीं आणि आंतर विषय सूक्ष्मा विषयीं जाणावे। हे दोन समाधि सिद्ध झाले
म्हणजे योग्यास जितमना असें म्हणावें। जेव्हां मन ध्येय मूर्त्याकारास सोडून सत्वगुणाचे उद्रेकामुळें म्हणजे सत्वगुणवाढल्या
म्हणजे समष्टी मना विषयीं ची म्हणजे हें सर्व मीच आहें अशा आकाराची भावना होते तेव्हां त्यास सानंद समाधि म्हणावें। जेव्हां
त्याही भावनेप्रत टाकून कोणते ही विषयांचें भान नहोतां अस्मि म्हणजे आहें अशाच आकाराची भावना होते तेव्हां त्यास सा
स्मित समाधि असें म्हणावें। अस्मितेंत मन विषयविमुख होतें। अहंकारांत मन विषयोन्मुख असतें हतकाच अस्मिता आ
णि अहंकार यांचा भेद आहे। या सस्मित समाधीचे अवस्थेंत योग्यास बुद्धीहून निराळा जो महावाक्यांतील त्वं या पदाचा
अर्थ आत्मा त्याचा साक्षात्कार त्यास झाल्यामुळे जितबुद्धि असें म्हणतात. हें सर्व यतेंद्रिय मनोबुद्धि ह्यणें करून स्पष्ट केलें
। त्याचा जितेंद्रिय-जितमना-जितबुद्धि असा अर्थ आहे। जेव्हां पूर्वोक्त अस्मितेचाही त्या समाधीचे ठाईं लय होतो त्यास
निर्विकल्पक किंवा असंप्रज्ञात समाधि म्हणतात तो असंप्रज्ञात समाधि एकक्षणभर झाल्यानंतर शंभर कर्तें चें म्हणजे
यज्ञाचें फल प्राप्त होतें असें श्रुतींत सांगितलें आहे। तो हा मोक्षाचें असंप्रज्ञात समाधिच पर म्हणजे उत्कृष्ट अयन म्ह
णजे प्राप्ति करण्याचे स्थान ज्यास आहे तो मोक्षपरायण मुनी म्हणजे योगी म्हणावा। निर्विकल्पक समाधीचे अवस्थें
त त्यास जीवन्मुक्त असें म्हणतात। विगतेच्छा भयक्रोधः याची व्याख्या पूर्वीं लिहिलीच आहे। असा जो तो सदा म्हण

जे बंधक द्वैत प्रतीति कालीं ही मुक्त सारखाच आहे। कारण यानंतर महावाक्यापासून यासमाधीत अनुभवलेलें जें आत्म्याचें असंग
द्वितीयानंदरूप त्याचा ब्रम्हत्वें करून साक्षात्कार होऊन अज्ञाननाश होणें इतकेंच व्यवधान आहे। सद्य मुक्तच आहे एणेकरून अ
हंकारादिक बंधकाल नर्या ही नाहीं असें सूचविल्यानें तो बंधमिथ्याच आहे असें सूचविलें ॥ २७॥ २८ ॥ असा जो पूर्वोक्त यो
गानें युक्त योगी त्याणें काय जाणावें ते सांगतात। सोपाधिक जें कर्ते स्वरूप किंवा देवता रूप तेणें करून यज्ञ आणि तप या चा किंवा-
त्याचे फलाचा भोक्ता आणि सर्व जी भूतें किंवा त्याची कार्यें हिरण्यगर्भादिक चेतनाचेतन त्यांचा महेश्वर म्हणजे अंतर्यामी नियंता
तसाच सर्व भूतांचा सुहृत म्हणजे प्रत्युपकाराची अपेक्षा नकरतां उपकार करणारा सर्व प्रत्ययाचा साक्षी असा जो नारायण-
मी त्यामज स्वात्मत्वें करून म्हणजे स्वात्माभेदानें जाणून म्हणजे अपरोक्ष करून तत्स्वरूपत्वें प्राप्त होऊन नंतर शांति म्हणजे निरु

भोक्तारं यज्ञतपसां सर्वभूतमहेश्वरं ॥ सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥ २९ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रम्हविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे आ

त्मयोगो नाम पंचमोध्यायः॥ ५॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ ॥

पाधिक ब्रम्हस्वरूप कैवल्य मोक्षाप्रत पावतो। एणें करून सोपाधिक ब्रम्हप्राप्ति पूर्वक निरुपाधिक अद्वैत ब्रम्हप्राप्ति होते असें सू
चविलें ॥ इतिश्री मद्भगवद्गीतायां रघुनाथ शास्त्रि कृत भाषा विवृतौ पंचमोध्यायः समाप्तः॥ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥
चित्त शुद्ध झालें तरी ध्यानयोगाशिवाय केवल संन्यासानें जीवन्मुक्ति स्फुरद होत नाहीं यास्तव पूर्वाध्यायाचे ठाई अति संक्षेपानें जो
योग सांगितला त्याचा या अध्यायात विस्तार सांगावया साठीं त्या योगाचे प्राप्तीस कारणभूत कर्मयोग आहे म्हणून त्याची स्तु-
ति करतात ॥-अथवा - सर्वकर्माणि मनसा - एथून आरंभ करून सन्यासपूर्वक ज्ञाननिष्ठेवर तात्पर्य ठेवून ज्ञाननिष्ठा भगवंतानें सां
गितली आणि कर्म करण्यात दुःखही फार आहे यास्तव चित्त शुद्धि झाल्याशिवाय ही अकस्मात सर्व लोक कर्मसन्यासच
करतील तर तसें नकरावें यासाठीं सन्यासापेक्षां ही कर्मयोग श्रेष्ठ आहे अशी कर्मयोगाची स्तुति करतात। अशीही संगति

कोणी म्हणतात ॥ श्रीकृष्ण भगवान बोलतात ॥ कर्म फलाची इच्छा करीत नसतां जें अवश्य करायाचें जें नित्य नैमित्तिक कर्म तें
प्रतजो करतो तोच फल संकल्पाचा त्याग केल्यामुळें सन्यासी आणि योगी आहे॥ निरग्नि म्हणजे विधीनें श्रौत स्मार्त कर्माचा त्या
ग करणाराजो तोच सन्यासी आणि अक्रिय म्हणजे प्राणायामादिकांचें वाणी मन आणि शरीर यांचे व्यापार ज्याणें सोडले
आहेत असाजो तोच योगी असें नाहीं ॥१॥ कोणत्या सादृश्यानें कर्म योग्याची संन्यासी आणि योगी अशी स्तुति करतां अ
सें म्हणाल तर त्याविषयी फल संकल्पाचा त्याग करणें या सामान्य गुणानें कर्मयोग्यास सन्यासी आणि योगी म्हणावें असें सांग
तात ॥ हे पांडवा अर्जुना। ज्यास कर्मफल त्यागानें सन्यास म्हणजे संन्यासी असे म्हणतात त्यास त्याच सामान्य गुणानें योग
म्हणजे योगी असें जाण। संकल्प त्याग करणारा जो तो संन्यासी असें मोक्षशास्त्रांत सांगितलें आहे। ज्याअर्थी योगी हो संकल्प त्याग के

अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः॥ स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः॥१॥
यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव॥ न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ २ ॥
आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते॥ योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥ ३॥ ॥

ल्याशिवाय होत नाहीं। यास्तव त्या पूर्वोक्त सामान्य गुणानें संन्यासी आणि योगी यांचें ऐक्यच आहे। जसें व्याघ्र किंवा सिंह याचे ठाईं
जो क्रूरत्वरूप सामान्य गुण आहे तो ज्या पुरुषाचे ठाईं आहे त्यास त्या सामान्य गुणानें व्याघ्रादिक आणि पुरुष यांचें ऐक्य आहे यामु-
ळें हा पुरुष व्याघ्र किंवा सिंह आहे असें त्याची स्तुति करण्या साठीं म्हणतात त्याप्रमाणें संकल्प त्याग करणें या सामान्य गुणा
नें कर्म योगी हा संन्यासी आणि योगि आहे अशी त्याची स्तुति केली ॥ योगाधिकार सिद्धी साठीं निष्काम कर्में करावीं असे दोन
श्लोकांचें तात्पर्य ॥ २॥ असे जर आहे तर यावज्जीव कर्म योगच करावा कीं काय अशी शंका होईल तर त्याविषयीं अवधि सां
गतात ॥ यम नियमादि अष्टांग युक्त जो योग त्याप्रत अत्यंत उत्कृष्ट तेथें आरोहण करण्यास इच्छिणारा जो मुनि म्हणजे मन
न शील त्यास म्हणजे त्याच्या त्या इच्छेस वैराग्य द्वारा कर्म कारण आहे असें बोलतात। वैराग्य उत्पन्न होऊन योगावर आरो

हण करण्याची इच्छा उत्पन्न होई तों पर्यंत कर्मानुष्ठान करावें असें तात्पर्य ॥ योगारूढ म्हणजे त्या इच्छेनंतर अष्टांग योगानुष्ठाना-
विषयीं प्रवृत्त झालेला जो तो मुनि त्यास योगावर पूर्वोक्त आरोहण करण्यास विक्षेप म्हणजे प्रतिबंध करणारें जें कर्म त्याचा शम म्ह
जे विधीकरून त्यागरूप संन्यास कारण आहे यास्तव त्याणे कर्म संन्यास करावा। कर्म सन्यास न केला तर कर्मानुष्ठाना कडे चित्त
गुंतले म्हणजे अष्टांग योगानुष्ठान करण्यास शक्य नाहीं असें तत्ववेत्ते बोलतात ॥ ३॥ योग शब्दाचा मुख्यार्थ चित्तवृत्ति निरोध-
वृत्तिरूप समाधिच आहे। त्या समाधीवर ज्याणे आरोहण केलें आहे म्हणजे ज्यास समाधि झाला आहे त्याचा कर्म त्याग अर्थात
होतच आहे मग कर्म संन्यास करावा असा त्याला विधि कशास पाहिजे अशी शंका होईल तर तिचें निराकरण करण्यासाठीं ए
थें योग शब्दाचा विवक्षित जो अर्थ तो सांगतात ॥ जेव्हां श्रोत्रादिक जीं इंद्रियें त्यांचे जे शब्द स्पर्श रूप रस गंधरूप अर्थ म्ह

यदा हि नेंद्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ॥ सर्व संकल्प संन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ४॥

उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ॥ आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ५॥

णजे विषय त्यांचे ठाईं आणि त्यांचे श्रवण दर्शनादि द्वारा होणारा जो भोग. म्हणजे स्पर्शादिकाचा अनुभव त्याविषयीं वैराग्याचे
दृढ त्यामुळें आसक्त होत नाही आणि मनाने ही त्यांचें चिंतन करीत नाहीं आणि हें मला स्वर असावें यासाठीं हें मी कर्मादिक
करीन इत्यादिक सर्व संकल्पाचा सन्यास म्हणजे त्याग करतो तेव्हां त्यास योगारूढ असें म्हणावें। ज्यांस तीव्र भोजनाची इच्छा
झाली आहे ते दुसरा व्यापार टाकून भोजनारूढ होतात म्हणजे भोजनासच बसतात तसें योगावर आरूढ व्हावें म्हणजे योग
च करावा असी ज्यांस इच्छा तीव्र झाली आहे ते कर्म संन्यास करून योगारूढच होतात। योगारूढ होई पर्यंत कर्में करावीं नं
तर टाकावीं असें तात्पर्य ॥ ४॥ विषयासक्तीनें बंध होतो आणि तिचे त्यागानें मोक्ष होतो असें जाणून क्रमें करून कर्मानुष्ठान द्वा-
रा चित्त शुद्धीचें संपादन करून योगारूढ होत्सातां अभ्यास आणि वैराग्य याचे बलानें आपणाच म्हणजे मनानेच विवेक द्वारा-
आत्म्याचा म्हणजे आपला उद्धार करावा म्हणजे आपणास संसारांतून काढावें अधोगतीस नेऊं नये। ज्या कारणास्तव आत्म

त्मनः म्हणजे आपला बंधु म्हणजे उद्धार रूप हित करणारा आत्मा म्हणजे विषयासक्ति रहित मनच आहे। पुत्र भार्या दिक समर्थ नाहींत। आणि आत्मनः म्हणजे आपला रिपु म्हणजे संसार संकटांत घालणारा शत्रु आत्मा म्हणजे विषयासक्त मनच आहे॥ ५॥ मन कोणास बंधु आणि कोणास रिपु कसें होतें तें सांगतात॥ येन म्हणजे ज्या जीवात्म्यानें आत्मना म्हणजे आपणच किंवा आपले मनानेंच आत्मा म्हणजे मन देहेंद्रियादिक जिंकलें म्हणजे स्वाधीन केले आहे ज्या जीवात्म्यास त्याचें मन बंधु म्हणजे उपकार करणारें होतें। अनात्मन म्हणजे ज्याणें मन आदिकाचा जय केला नाहीं त्यास तें मन आदिक स्वाधीन नसल्यामुळें आत्मा म्हणजे मन आदिक शत्रुत्वाविषयींवर्तेत म्हणजे राहतें म्हणजे शत्रुच होतें॥ ६॥ ज्याणें मन आदिक आत्मा जिंकिला त्यास मन बंधु होतें असें जें सांगितलें तें च मनाचे जयाचें फल सांगून स्पष्ट करून दाखवितात॥ ज्याणें मन आदिकाचा जय केला आहे आणि याच कार-

बंधुरात्मात्मनस्तस्य येनैवात्मात्मनाजितः॥ अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत्॥ ६॥

जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः॥ शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः॥ ७॥

ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः॥ युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः॥ ८॥

णानें प्रशांत म्हणजे सुख दुःख-शीतोष्णादिक किंवा मानापमान प्राप्त झाले असतां ही ज्याचें मन विकार न पावतां शांत असतें-असा जो त्याचा आत्मा म्हणजे मन परं म्हणजे उत्कर्ष करून समाहित म्हणजे समाधीप्रत पावतो। यास्तव योगरूप समाधीचे सिद्धी साठीं मनाचाच जय करावा॥ ७॥ समाधि सिद्धीचें फल सांगतात॥ ज्ञान म्हणजे शास्त्र आणि गुरु यांचे उपदेशापासून झालें लें परोक्षात्म ज्ञान आणि विज्ञान म्हणजे श्रुतार्थाचें मनन निदिध्यासनें करून झालेला ब्रह्मात्म विषयक अपरोक्षानुभव त्याहीं करून तृप्त म्हणजे विषयकरवा विषयीं हें आतां पुरे असी अलं बुद्धि ज्यास झाली आहे असा आणि याच कारणानें कूटस्थ म्हणजे सांसारिक सापाचें ज्यास विकार नाहीं असा। येणें करून समाधीचें फल सांगितलें। आतां त्याचेंच लोकांत जें प्रसिद्ध लक्षण आहे तें सांगतात। इंद्रियांचा जय ज्याणें केला आहे आणि याच कारणानें लोष्ट म्हणजे ढेंकळ किंवा मृत्तिकेचा-

गोळा तसाच अश्म म्हणजे पाषाण आणि कांचन म्हणजे सुवर्ण ही ज्यास समानच आहेत असा जो योगी त्यास युक्त म्हणजे-
ज्यास योग सिद्ध झाला आहे असें विद्वान म्हणतात ॥८॥ ते समत्वच स्तुती करून पुनः विशेष करून सांगतात ॥ सुहृत् म्हणजे प्र
त्युपकाराची अपेक्षा न धरतां किंवा न सांगतां हितकर्ता - मित्र म्हणजे सांगितल्यानंतर हितकर्ता किंवा स्नेहवान - अरि म्हण
जे शत्रु - उदासीन म्हणजे वादिप्रतिवादि किंवा दुसरे कोणी त्यांचा पक्षपात न करणारा - मध्यस्थ म्हणजे दोघांचे हिताचे इच्छे
नें मध्यस्थी करणारा - द्वेष्य म्हणजे आपलें अप्रिय करणारा - बंधु म्हणजे संबंधी - साधु म्हणजे पुण्य करणारे - पाप म्हणजे पा
प कर्म करणारे - दुराचारी यांचे ठाई कोणाचें काय कर्म आहे याचा विचार न करतां समान आहे बुद्धि ज्याची असा जो आहे तो विशि
ष्यते म्हणजे श्रेष्ठ आहे ॥९॥ आतां योगारूढाने योगाभ्यास कसा करावा ते सांगतात ॥ योगाभ्यास नन्तर तो योगी त्याणें - रहसि म्हण

सुहृन्मित्रार्युदासीन मध्यस्थ द्वेष्य बंधुषु ॥ साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥९॥
योगी युंजीत सततमात्मानं रहसि स्थितः ॥ एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १० ॥
शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ॥ नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरं ॥११॥

जे एकांत स्थळीं स्थित आणि एकाकी म्हणजे कोणी ज्यास सहाय नाहीं असा किंवा सन्यासी आणि यत म्हणजे स्थिर केलें-
आहे चित्त म्हणजे मन आणि आत्मा म्हणजे देहेंद्रियादिक ज्याणे आणि निर्गत म्हणजे गेली आहे आशी म्हणजे योगसिद्धि-
शिवाय दुसऱ्या विषयाविषयींची प्रार्थना ज्याची म्हणजे तदेकनिष्ठ आणि एकाकी सन्यासी असला तरी बहुत पुस्तकादिका
चा परिग्रह म्हणजे संग्रह ज्यास नाहीं अथवा स्त्री पुत्रादिकांचा जो परिग्रह तेणें करून रहित म्हणजे सन्यासी असा होत्सा
ता आत्मान म्हणजे बुद्धी प्रत युंजीत योगानें युक्त करावी ॥१०॥ योग करावा म्हणोन सांगितला तो कसा करावा अशी जिज्ञासा
झाल्यास त्यांचीं आसनादिक अंगें आणि इतिकर्तव्यता म्हणजे अनुष्ठान प्रकार सांगतात ॥ शुचि म्हणजे स्वभावतः किंवा
उदक गोमयादिकाचे संस्कारानें शुद्ध केलेले पुण्य देशाचे ठाईं स्थिर म्हणजे चंचल न होणारें आणि फार उंच नव्हे फार स

वळ नव्हे आणि चैल-अजिन आणिकुश आहेत उत्तरे म्हणजे वर वर ज्याचे ठाईं म्हणजे कृष्णाजिनावर चैल म्हणजे कंबळा हिक
ल्न आणि कुशदर्भाचेवर कृष्णाजिनादिक आणि स्थंडिल म्हणजे ओटा त्यावर कुशअशा आसनाचे स्थापन करून ॥ ११ ॥ त्या आ
सनाचे ठाई उपविश्य बसून यत म्हणजे निगृहीत किंवा जिंकल्या आहेत विषय स्मरण रूप चित्ताच्या क्रिया आणि विषयग्रह
ण करणें अशा इंद्रिय क्रिया ज्याणे असा होऊन अत एव बाह्य आणि आंतर विषयांही करून असंगझालेलें मन एकाग्र म्हण
जे एकत्व आत्मतत्व ज्यास अग्रभागीं स्फुरतें दुसरें कांहीं स्फुरत नाहीं असें दुसऱ्या विषयाकार वृत्तिज्यांत नाहींत असाजो-
आत्मतत्वाकार अविच्छिन्न वृत्तिप्रवाह त युक्त करून मनाची स्थिरता साठी म्हणजे आत्म विशुद्धये म्हणजे मनाचेवि

तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः॥ उपविश्यासने युंज्याद्योगमात्मविशुद्धये॥ १२॥
समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः॥ संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन्॥ १३॥

शुद्धी साठीं पूर्वोक्त वृत्तिप्रवाहाचाही जो रोध तद्रूप योग करावा ॥ १२॥ चित्ताचे एकाग्रतेचे उपयोगी जी देहेंद्रिया दिक
ची धारणा ती दोन श्लोकानीं सांगतात ॥ योगाभ्यास करणाऱ्यानें स्थिर म्हणजे निश्चल होत्सातां दृढ प्रयत्न करून शरी-
राचा मध्य आणि मस्तक आणि ग्रीवा म्हणजे मान यांप्रत अचल आणि समान धारण करून म्हणजे मूलाधारापासू
न मस्तक पर्यंत शरीरभाग निश्चल आणि ज्यांत वकता नाही असा सरळ राही असें बसून आणि आपले नासिकेचे
अग्रावर दृष्टि ठेवून म्हणजे अगदीं नेत्र मिटले तर निद्रा एऊन मनाचा लय होईल चांगले उघडे ठेविले तर बाहेर रूपादि
क विषयांकडे जातील हीं दोन्हीं न व्हावीं यासाठीं अर्धे उघडे अर्धे मिटलेले असे नेत्र ठेऊन नासाग्र दृष्टि होऊन हिकडेति
कडे दिशाकडे न पाहता असा ॥ १३॥ ॥

युक्त म्हणजे योगयुक्त योगी त्याणे गुरुशुश्रूषा-भिक्षा भुक्ति इत्यादिक जें ब्रम्हचारी व्रत त्याचे ठाई स्थित म्हणजे त्या व्रताचे अनुष्ठा-
न करणारा असा होत्साता मन. संयम्य म्हणजे मनाचा निग्रह करून मच्चित्त माझे ठाइंच आहे चित्त ज्याचें आणि मत्पर: मी-
च सर्व भूतांचा आत्मा वासुदेव आहें पर ज्यास म्हणजे उत्कृष्ट पुरुषार्थत्वें करून पावावयास योग्य मीच आहें असें माननारा-को-
णी स्त्री चित्त असता तरी स्त्री पर म्हणजे स्त्रीच सर्वांहून श्रेष्ठ मानीत नाहीं तर राजा किंवा देवच सर्वांहून श्रेष्ठ असे मानितो
म्हणून तो तत्पर नव्हे अथवा कोणी परमेश्वर किंवा राजा तच्चित्त असतां ही ... त्याचे आराधनानें ते इष्ट फल आपणास पाहिजे
तत्परच असतो-हा तर मच्चित्त असून माझे च ठाई मनाचें स्थापन करून मी ... परम पुरुषार्थ रूप आहें दुसरे मजशिवाय न-
हीं असा मत्पर आहे। याच कारणास्तव प्रशांतात्मा म्हणजे बाह्य आणि आं... र विषय स्मरणाचा त्याग करून आणि समा धी-

प्रशांतात्मा विगतभीर्ब्रम्हचारिव्रते स्थित.॥ मन: संयम्य मच्चित्तो युक्त आसीत तत्पर:॥१४॥
युंजन्नेवं सदात्मानं योगी नियत मानस:॥ शांतिं निर्वाण परमां मत्संस्थामधिगच्छति॥१५॥

पासून होणाऱ्या स्मरणाचा ही त्याग करून शांत म्हणजे उपरत आहे आत्मा ... चित्त ज्याचें असा पूर्वोक्त अस्मिता मात्र शेष राहिलें
ज्याची असा होऊन विगत भी म्हणजे पूर्वोक्त भयरहित होत्साता आसीन अस... वे। या अवस्थेसच सत्व पुरुषान्यता ख्याति
किंवा ब्रम्हात्म साक्षात्कार असे म्हणतात। या अवस्थेची प्राप्ती झाली म्हणजे पुरुष परम पुरुषार्थ भागी होतो॥१४॥ या-
अवस्थेचें फल सांगतात॥ याप्रमाणें सर्वदा निरंतर आत्मान म्हणजे मनास युंजन् म्हणजे समाधीनें युक्त करणारा योगी-
नियतमानस: म्हणजे योगशास्त्रोक्त ख्याति फलापासून ही निरिच्छ केलें आहे मन ज्याणे असा होत्साता निर्वाण परमां
मत्संस्थां शांतिं अधिगच्छति म्हणजे निर्विकल्प पदप्राप्तिरूप मोक्षच आहे परम म्हणजे उत्कृष्ट फल जीचें आणि माझे
च ठाई संस्था म्हणजे ऐक्य भावानें स्थिति किंवा समाधीची प्राप्ति होवे जीणे करून अशा शांती प्रत म्हणजे वैराग्याप्रत पा-
वतो। ध्यानाचे ठाई फलाची इच्छा न करणाऱ्यास सत्व रज तमोगुणात्मक प्रधानाहून भिन्न जो पुरुष त्याविषयींचा सर्वगु

याचे ठाईं मिळवयाचें तें मिळालें - आणावयाचें तें आणलें - करावयाचें तें केलें - टाकावयाचे ते टाकलें - देहादिक मी नाहीं - हे माझे नव्हेत असा जो आत्मा नात्म विवेक साक्षात्कार होतो त्यास विवेक ख्याति म्हणतात तिनें सर्व वृत्तींचा निरोध करावा अशा इच्छेच्या सहायानें ज्या मध धर्ममेघ समाधी म्हणजे मेघाप्रमाणे सत्ता आणि मोक्षास अनुकूल योग ज धर्म त्यास म्हणतात अशा पुण्याचा वृष्टि करणारा समाधी म्हणतात तद्रूप फल होतें। सांगितलेले पुरुषाचा आणि त्रिगुणात्मक प्रधानाचा जो विवेक त्याच्या साक्षात्कारास पुरुषख्याति म्हणतात। त्याचे फळ गुण वैतृष्ण्य म्हणजे स्वर्गातील किंवा यालोकचे सर्व भोगावरील तृष्णा जाणें असें जें उत्कृष्ट वैराग्य तें होतें। याचेंच मोक्षरूप फळ नंतरी यक म्हणजे अवश्य होणारें असे योगी म्हणतात। सत्व आणि पुरुष यांचीजी अन्यता म्हणजे विवेक त्याचे साक्षात्कारापासून सर्व नियंतृत्व सर्वज्ञत्वादिक फल होते अशी हीं विवेक ख्याति - पुरुष ख्याति - सत्व पुरुषान्यता ख्याति या नावांच्या ख्यातींचीं फळें योग शास्त्रांत सांगितली आहेत ॥१५॥ याप्रमाणे योगाभ्यास निष्ठ जो झाला त्यास आहारादिकांचा नियम सांगतात।

नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकांतमनश्नतः॥ न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन॥१६॥
युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु॥ युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा॥१७॥

त्या नियम सांगतात॥ हे अर्जुना अत्यश्नतः म्हणजे फार भोजन करणारास आणि एकांतें अनश्नतः म्हणजे अगदींच भोजन न करणाऱ्यास चित्तवृत्तिनिरोध म्हणजे योग किंवा समाधि सिद्ध होत नाहीं आणि अति स्वप्नशील स्य जाग्रतश्च योगो न म्हणजे फार निद्रा करणाऱ्यास किंवा फार जागरणच करणाऱ्यास हा योग सिद्ध होत नाहीं॥१६॥ तर योग कोणास होतो ते सांगतात॥ ज्याचा आहार म्हणजे खाणे विहार म्हणजे फिरणें युक्त म्हणजे मित किंवा अमुक वेळेस इतकेंच खावयाचें अमुक वेळेस इतकेंच फिरावयाचे असा नियमाचे आहेत आणि या शिवाय दुसरीं जीं बोलणें न्हाणें ऐकणें इत्यादिक कर्मे त्याचे ठाईं ही ज्याच्या चेष्टा म्हणजे व्यापार नियमाचे परिमित च आहेत आणि ज्याचे स्वप्न व बोध म्हणजे निद्रा आणि जागरणे अमुक वेळ निद्रा किंवा जागरण करावयाचे अशा नियमाचे परिमितच आहेत त्यास दुःख नाश करणारा योग सिद्ध होतो॥१७॥ ॥

के कां योगी होऊन - शांति निर्वाण परमां - प्णें करून सांगितलेल्या शांतीप्रत पावतो याची लक्षणें माझ्याश्लोकानीं मागून स्पष्ट करणारजे
ह्या विनियत म्हणजे विशेष करून एकाग्रते प्रत पावलेलें चित्त बाह्यविषयाचें चिंतन न करता आत्म्याचेच ठाई अवतिष्ठते म्हणजे स्थिति-
पावते । पूर्वोक्त अस्मिता ही नसते आणि सर्व जे जागृत स्वप्न आणि सविकल्प समाधीचे ठाई प्राप्त झालेले काम म्हणजे विषय त्या-
विषयी निर्विकल्पक समाधीनें सर्व अन्य प्राप्त झाल्या मुळे निस्पृह म्हणजे निरिच्छ होतो तेव्हां त्यायोग्यास संयुक्त म्हणजे निर्विकल्प
क योगी असे म्हणतात ॥ १८॥ एकाग्रतावस्थेचे ठाई योग्याचें चित्त कसे असते त्या विषयी उपमा सांगतात ॥ निर्वातस्थ म्हणजे निर्वात प्रदेशीं
राहिलेला जसा दीप नेंगते म्हणजे चळून पावत नाही तो उपमा आत्म्याविषयीचा योग करणारा जो योगी त्याचे एकाग्र केलेलें चित्त मयोगाचे
त्यानीं सांगितली आहे । योग्याचे चित्त योगकाली तसेंनिश्चल झालें पाहिजे असा [illegible] य ॥ १०॥ इष्ट प्राप्तिरूप योगाचें फल सांगतात । यत्र

यदाविनियतंचित्तमात्मन्येवावतिष्ठते ॥ निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्तइत्युच्यते तदा ॥ १८॥
यथादीपो निवातस्थोनेंगते सोपमास्मृता ॥ योगिनोयतचित्तस्य युंजतो योगमात्मन. ॥ १९ ॥
यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ॥ यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ २० ॥ ॥
सुखमात्यंतिकंयत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियं ॥ वेत्तियत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥ २१ ॥

म्हणजे ज्याकाळी योग सेवेने म्हणजे योगाभ्यासाने निरुद्ध म्हणजे बाह्य विषयाकडे संचार करण्यापासून निवारण केलेलें चित्त उपरति म्हणजे लय-
प्राप्त पावतें आणि ज्याकाळी आत्मना म्हणजे समाधीचे परिशुद्ध झालेले अंतःकरणानें चैतन्य आनंद ज्योतिस्वरूप आत्म्याप्रत अ-
परोक्षत्वें करून अनुभवून किंवा पाहून तुष्यते म्हणजे संतोषाप्रत पावते । अर्थात बाह्य विषयांचे ठाई संतोष पावत नाहीं । त्यास योगम्ह-
णावें । असापुढें चवऱ्या श्लोकांत अन्वय आहे ॥ २०॥ आणि आत्यंतिक म्हणजे अंतरहित आणि इंद्रियांस अगोचर म्हणजे इंद्रियांचे अगम्य आ-
णि विषयांचे संबंधापासून उत्पन्न न होणारे यास्तव इंद्रियांची अपेक्षा न करतां केवळ बुद्धीनेंच जे अनुभवास येते असा सुखा-
त वेत्ति म्हणजे अनुभवितो आणि पूर्वोक्त आत्मस्वरूपाचे ठाई स्थित असतां अयं म्हणजे विद्वान त्यास आत्मस्वरूपापासून तत्त्वतः

चलन पावत नाहीं। आत्म्याचा आणि बुद्धीचा तादात्म्या ध्यास जेव्हा आहे ते व्हां चळून पावल्या प्रमाणे भासला तरी परमार्थतः चलन पावत नाहीं। यास प्रमाण। बुद्धि ध्यान करीत असता हा ध्यान करणारा प्रमाणे दिसतो - बुद्धि लोळयमान म्हणजे चंचल झाली म्हणजो चंचल झाल्या प्रमाणें दिसतो अशा अर्थाचे श्रुतीन ध्यान चांचल्य वास्तविक आत्म्याचे ठाई नाही। बुद्धीचे तादात्म्याभिमानाने झालें लें नाहीं, तें मिथ्याच आहे असे जें सांगितलें ते आहे॥ २१॥ चळून न पावण्यास कारण सांगतात ज्या निरतिशय सुखरूप आत्मस्वरूपाचा योगाभ्यासानें लाभ झाला म्हणजे त्याहून दुसरा लाभ अधिक आहे असे मानित नाही आणि ज्या योगाभ्यासाने आत्मस्वरूप स्फुरवाचे ठाई स्थित असतां गुरू म्हणजे मोठें जें शस्त्रपातादिक किंवा शीतोष्णादिक दुःख तेणें करून ही चळून पावत नाही। एणे करून अनिष्ट दुःखादि निवृत्ति रूप हें फल योगाचें सांगितले॥ २२॥ यत्रोपरमते चित्तं - एथून आरंभ करून जितकी विशेषणें

**यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः॥ यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते॥ २२॥**
**तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितं॥ स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा॥ २३॥**

सांगितलीं तितक्या विशेषणांनी युक्त असा योग स्थितिरूप त्याचा दुःखाचा जो संयोग म्हणजे संबंध त्याचा आहे वियोग म्हणजे नाश ज्या अवस्थेत त्या अवस्थेस योग अशी संज्ञा केली आहे असें जाणावें। यावरून समाधि स्वरूप जो योग तोच स्वरूपेकरून आणि फलें करून मुख्य आहे। पूर्वी कर्मास च योग अशी संज्ञा केली ती या मुख्य योगास कर्म साधन आहे या अभिप्रायानें केली असें जाणावें। योग स्वरूप आणि फल सांगण्याची समाप्ति करून निश्चय आणि अनिर्वेद यांस योग साधनत्व आहे असें सांगण्या साठीं योगाची कर्तव्यता सांगतात। तो पूर्वोक्त योग मोठे फल देणार आहे या स्तव शास्त्राचे आणि गुरूचे उपदेशापासून योग स्वरूप आणि त्याचे अभ्यासाचा अनुष्ठान प्रकार यांचा निश्चय करून घेऊन असा दुर्घट योग कसा सिद्ध होईल असा खेद ज्यापासून गेला आहे अशा मनाने प्रयत्न शिथिल न करतां मोठे प्रयत्नाने करावा॥ २३॥ ॥

विभूति अ०६
९७

दें मला असावे अशा मनोवृत्तिरूप संकल्पापासून उत्पन्न होणारे जे मनांतील काम म्हणजे विषयवांच्छा त्या इच्छा त्याप्रत अशेषतः म्हणजे वासना सुद्धां टाकून-एणेकरून त्याग सांगितला आतां दम सांगतात-आणि मनानेंच विषया वरील दोष दृष्टीने सर्व इंद्रियांचा बाह्य-विषयांपासून निग्रह करून पूर्वोक्त योगाभ्यास करावा ॥ २४ ॥ जर जन्मांतरीय कर्मयोगें करून मनचंचल होईल तर त्याविषयीं सांगतात ॥ शनैः शनैः म्हणजे अभ्यासाचे क्रमानें किंवा भूमिकेचा क्रम योगशास्त्रांत सांगितला आहे त्या क्रमानें-धृत्या ययाधारयते मनः प्राणेंद्रिय क्रियाः॥ योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥-असें पुढें अठराव्यांत सांगतील त्या धृतीनें म्हणजे धैर्यानें गृहीत म्हणजे वश केलेले ले बुद्धी करून सर्व दिव्य आणि लोकांतील विषयापासून उपरम करावा. आणि आत्म्याचे स्वरूपाचे ठाई आहे संस्था

संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः॥ मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समंततः ॥ २४॥

शनैः शनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया॥ आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत्॥ २५॥

यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरं ॥ ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत्॥ २६॥

म्हणजे उत्तम प्रकारची स्थिति ज्याची असें मन करून म्हणजे सर्व आत्माच आहे त्याहून दुसरे काहीं नाहीं असें एकाग्रवृत्ति करून-एणेकरून संप्रज्ञात समाधि सांगितला त्यांत पूर्वाभ्यास वरोंकरून द्रष्टा दृश्याकार वृत्तीचा मी या ध्येयाचें ध्यान करतो असा संबंध असे त्याचें निराकरण होऊन असंप्रज्ञात समाधि सांगतात· किंचित् म्हणजे कांहीं ही म्हणजे ध्याता आणि ध्यान असा विभाग मनही जाणूं नये आणि सुषुप्ती प्रमाणे अखंड सच्चिदानंदात्मक आत्मरूपानेंच राहावें ॥ २५॥ शनैः शनैः उपरम करावा असें सांगितलें तो उपरम कसा करावा तें सांगतात ॥ ज्या ज्या विषयाप्रत ग्रहण करण्या साठीं इंद्रियांचे द्वारा मन बाहेर गमन करतें त्या त्या विषयावरील दोष मनांत आणून त्या त्यापासून आवरणें काढणें असा मनाचा प्रत्याहार करून त्याचें आत्मस्वरूपाचे ठाईंच स्थापन करावें ॥ २६॥

याप्रमाणें मन आत्मवश म्हणजे आत्म्याचे ठाईं स्थिर केले म्हणजे त्या अभ्यासाने चंचल स्वभाव जो रजो गुण त्याचा नाश झाल्या मुळे मनवश कर
णा त्यास सुख होतें असें सांगतात ॥ बाह्याभ्यंतर विषयांचे त्याग करून प्रशांत म्हणजे रजोगुणेकरून रहित झालें आहे मन ज्याचे आ
णि शांत म्हणजे क्षीण झाला आहे रज म्हणजे रजो गुणाचे कार्य क्लेशादिक ज्याचे असा जो उपरत मनाचा योगी त्यास एकाग्रता भूमी
चे ठाईं ब्रम्हभूत म्हणजे सद्रूप ब्रम्हस्वरूप-उत्तम म्हणजे निरतिशयित आणि अकल्मष म्हणजे पुण्य पापाचे वैषयिक सुख दुःखरू
प फळाणें किंवा पुण्य पापाने रहित जे सुख ते उपैति म्हणजे प्राप्त होतें। याविषयीं एकाग्रचित्त झालें असतां जो सद्रूप ब्रम्हरूप अर्थ
त्या प्रकाश करतो-कर्म बंधने शिथिल करतो-क्लेशाचा क्षय करतो-त्यास संप्रज्ञात समाधि असें म्हणतात असें योग भाष्यांतसां
गितले हे प्रमाण आहे। ब्रम्हाकार मनाचे वृत्तीने जो ब्रम्हभूतत्व झाला आहे आणि योगाभ्यासाने त्याने पापगेलें आहे अशा योग्यान

प्रशांतमनसंह्येनं योगिनंसुखमुत्तमं॥ उपैतिशांतरजसं ब्रम्हभूतमकल्मषं॥ २७॥
युंजन्नेवं सदात्मानं योगीविगतकल्मषः॥ सुखेनब्रम्हसंस्पर्शमत्यंतंसुखमश्नुते॥ २८॥

स उत्तमजें समाधिसुख ते प्राप्त होते अशी श्री कोणी व्याख्या करतात ॥ २७॥ याप्रमाणे आत्मस्वरूपाचे ठाईं मनाचे उत्तम प्रका
रचें स्थापन करणारा आणि पूर्वी सांगितलेले योगाचे विघ्नांनी रहित असा योगी विगत म्हणजे गेले आहे कल्मष म्हणजे अ
विद्या क्लेश किंवा पाप ज्याचें असा होत्साता सुखेकरून म्हणजे अनायासेंकरून अत्यंत म्हणजे द्रष्टा दृश्य रूप जो परिच्छे
द म्हणजे भेद तद्रहित ब्रम्हसंस्पर्श म्हणजे अखंड अद्वितीय ब्रम्हाचा आहे संस्पर्श म्हणजे निरुपाधिक ऐक्य ज्यास अ
से जे ब्रम्ह सुख त्याप्रत अश्नुते म्हणजे स्वात्म स्वरूपाने अनुभविले ॥ २८॥ ॥ श्री कृष्णार्पणमस्तु ॥ ॥

॥ ७ ॥ ७ ॥ ॥ ३

संप्रज्ञात असंप्रज्ञात समाधिरूप दोन्ही योगांचे फळ सांगतात । सोपाधिक आणि निरुपाधिक यादोहों भेदाने ब्रह्मवेत्ता दोनप्रकारचा आहे. जो सर्वांचे ठाई आपले तादात्म्य पाहील तो सोपाधिक. जो सर्व उपाधींना रहित असे अद्वितीय स्वरूप तो निरुपाधिक। असे वार्तिकात सांगितले आहे। त्याप्रमाणे संप्रज्ञात समाधीत घट कुंडलादिकांचे ठाई त्यांचें उपादान कारण मृत्तिका सुवर्णादिक जसे आहे त्याप्रमाणे सर्व भूतांचे ठाई उपादानकारण स्वरूपानें आत्मस्वरूप राहिले आहे असें योग करून युक्त म्हणजे ज्ञान नाधिरूढ झाला आहे आत्मा म्हणजे चित्त ज्याचें तो पाहतो आणि असंप्रज्ञात समाधीचे ठाई ब्रम्हादिक स्तंबपर्यंत सर्व भूतांप्रत आत्म्याचे ठाई आत्मसत्तेनेच पाहतो। सर्पजसा रज्जूवर रज्जूचेच सत्तेनें आहे त्याप्रमाणे याच योग्याची व्युत्थान समयी स्थिति सांगतात, सर्वत्र ब्रम्हादिक स्थावरांत समविषम भूतांचे ठाई निर्विशेष स्वरूप ब्रम्हाचें दर्शन ज्यास आहे असा तो असतो ॥ २९ ॥ अशा या आत्मकत्व दर्शनाचे फल सांगतात ॥ जो मी म्हणजे सर्वांचा आत्मा

**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि॥ ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः॥ २९॥**

**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ॥ तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति॥ ३०॥**

जो मी यास्तव पूर्वी सांगितले प्रमाणें उपादान कारण स्वरूपाने सर्वत्र पाहतो आणि सर्वांप्रत अधिष्ठान भूत जो मी त्याचे सत्तेनेंच पाहतो त्या योग्यास मी सर्वात्मा. न प्रणश्यामि - म्हणजे अदृश्य होत नाहीं म्हणजे ज्ञानें करून अज्ञानाचे सावरणाचा नाश झाला म्हणजे म्यात्मत्वे करून प्रकाशित झालेला मी पुन: आवृत होत नाही. कार्य देहेंद्रियादिक - कारण अज्ञान यांच्या समुदायावर अभिमान ठेवणारा जो सोपाधिक जीव त्याणें अभिमान त्याग करून म्यात्मत्वे करून जाणलेले स्वाधिष्ठान भूत ब्रम्ह स्वरूप पुन: आच्छादित होत नाहीं परंतु शुक्तीवर अध्यस्त रजत जसे शुक्तिस्वरूप जे अधिष्ठान त्याचे ज्ञानाने समूल नाश पावते तसे ब्रम्हस्वरूप अधिष्ठानाचे ठाई अध्यस्त म्हणजे भ्रमाने कल्पिलेले स्वरूपाप्रत पावलेले सोपाधिक जीव रूपाचे अधिष्ठान जे ब्रम्ह त्याच्या साक्षात्काराने समूल नाश होईल मग मोक्ष फल कोणास होईल अशी शंका होईल तर त्या विषयी सांगतात। स च म्हणजे तो जीव ही मला - न प्रणश्यति - म्हणजे अदृश्य होत नाही। तात्पर्य जीव जर माझे ठाई अध्यस्त असेल तर त्याचा पूर्वोक्त नाश होईल असें नाहीं। महावा

कांही जीवाचा आणि ब्रम्हाचा भेदनाही असे मानिलें आहे। यावरून जीवस्वरूप माझे हून भिन्न नाहीं असे असतां अज्ञानानें केलेले आवरणामुळे जो देहादिक उपाधीवर आत्मत्व भ्रम झाला तो मात्र ज्ञानाने समूल नाशपावतो आणि आपलें स्वरूप ब्रम्ह अभिव्यक्त होते॥३०॥ त्याकारण त्यास्तव सर्वात्मैकत्व दर्शी जीवस्वरूप मीच आहें यास्तव त्याच्या मोक्षास प्रतिबंध होत नाहीं असे सांगतात॥ सर्वोपादान कारण स्वरूप सर्वभूतांचे ठाई मद्रूपे करून स्फुरण रूपें करून स्थित जो मी त्याप्रत जो जीव ब्रम्हाचे ऐक्य रूपानें जाणून निर्विकल्पक समाधीने - भजते - म्हणजे सेवितो तो योगी समाधीपासून जेव्हा उठतो तेव्हां त्या अवस्थेत ज्ञानानें बाधित झालेले पूर्व संस्कारामे प्रारब्ध कर्मवशें करून देहावर अभिमान ठेवणाऱ्या प्रमाणे सर्वथा म्हणजे सर्वप्रकारानें याज्ञवल्क्या प्रमाणे कर्मत्याग करून किंवा वसिष्ठ जनकादिका प्रमाणें विहित कर्माचरणानें किंवा दत्तात्रेयादिका प्रमाणे निषिद्ध कर्माचरणाने व्यवहार करीत असतां ही विधिकिंकर तो नाही यामुळे माझेच ठाई राहतो। मत्स्वरूप मोक्षापासून च्युत होत नाही।।या ब्रम्हवेत्याचें ऐश्वर्य च्युत करण्यास देवही समर्थ नाहीत। तो देवांचा

सर्वभूतस्थितं योमांभजत्येकत्व मास्थित:॥ सर्वथा वर्तमानो पि सयोगी मयि वर्तते॥३१॥

आत्मौपम्येन सर्वत्र समंपश्यति योऽर्जुन॥ सुखंवा यदिवा दुःखं सयोगी परमो मत:॥ ३२॥

आत्माच आहे याअर्थाच्या श्रुतीवरून त्याचे मोक्षास प्रतिबंध करण्यास देवही समर्थ होत नाहीत। पूर्वोक्त ज्ञानी मला अदृश्य होत नाहीं। आणि मी त्याला अदृश्य होत नाही ... मी प्रत्यक्ष होऊन कृपादृष्टीने त्यास पाहून त्यावर मी अनुग्रह करतों असें ही तात्पर्य कोणी बोलतात॥३ ... निषिद्ध कर्म करून ... आत्मवेत्यास मोक्षाविषयीं प्रतिबंध होत नाही तथापि विहित कर्मशील योगीच श्रेष्ठ आहे ... अथवा मलाभजणाऱ्या योग्यामध्ये ही ... त्या करणारा श्रेष्ठ आहे असे सांगतात॥ मला सुखजसें प्रिय आहे आणि दुःख जसें प्रियनाहीं त्याप्रमाणेच ... प्रिय आहे आणि दुःख प्रियनाहीं। असे आपले सादृश्याने सर्वत्र जो पाहतो म्हणजे सर्वांस सुखच असावे ... हे अर्जुना ... योगी परम म्हणजे श्रेष्ठ मला मान्य आहे॥३२॥

॥ ... ॥

सांगितले प्रमाणे साम्येकरून योग होणे अशक्य आहे असे [illegible] नर असल [illegible] सम [illegible] इच्छेने अर्जुन प्रश्न करतो
हे मधुदैत्यास मारणाऱ्या कृष्णा। जो इंद्रियनिग्रहकरणे या प्राधान्याने [illegible] क सूत्रे प्रमाणे मनात कोणतीही वृत्ति न उठणे-किंवा वि
क्षेप म्हणजे विरुद्ध वृत्ति न होणे -याद्वारे करून [illegible] केवळ आत्माकार वृत्तीने आत्मस्थिति होणे किंवा सर्व वृत्तींचा निरोधक
रणे असा जो योग तूं सांगितला [illegible] मनाचे चंचलत्वामुळे स्थिर [illegible] चिरकाल स्थिति होईल असे मी पाहत नाही ॥ ३३॥
हे कृष्णा। मन स्वभावाने-चंचल [illegible] प्रमाथी म्हणजे [illegible] करणे असे जे [illegible] आहे आणि बलवत् म्ह
णजे विचारे करून ही जिंकावयास [illegible] आहे आणि दृढ म्हणजे [illegible] मनाना [illegible] आहे [illegible] भेद करण्यास अशक्य
आहे यास्तव आकाशात इकडे तिकडे संचार करणारा जो वायु त्याचा [illegible] आवरकरून [illegible] करण्यास जसा अशक्य आहे त्याप्रमा

अर्जुनउवाच ॥ योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन॥ एतस्याहं न पश्यामि चंचलत्वात्स्थितिं स्थिराम्॥ ३३॥
चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथी बलवद्दृढं ॥ तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करं ॥ ३४॥ श्रीभगवानुवाच
॥ असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलं ॥ अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५॥ ७ ॥

णे मनाचा ही विषयांपासून निग्रह म्हणजे आवरणे फार कठीण आहे असे मी मानितो। ३४॥ मन चंचल आहे इत्यादि जें अ
र्जुन बोलला त्याचा अंगीकार करून त्याचा निग्रह करण्यास साधन श्रीकृष्णभगवान सांगतात। हे महाबाहो अर्जुना। मनाच्या चंचल
स्वभावामुळे त्याचा निग्रह करणे कठीण आहे असे जे तूं बोललास ते नि:संशय सत्य आहे तथापि-हे कुंतीपुत्रा अर्जुना-परमात्मा
कार मनाच्या वृत्तीचा प्रवाह करण्याचा वारंवार प्रयत्न करणे असा जो अभ्यास तेणेकरून किंवा बाह्य ध्येय चतुर्भुजादि मूर्तीचा
निरंतर मनात आणण्याचा जो अभ्यास तेणेकरून आणि पाहिलेले ऐकिलेले जे विषय किंवा त्यांची साधने त्यांचेठाई अनित्यत्व अ
स्थिरत्व इत्यादिक दोषदृष्टीने त्याविषयी तृष्णा न होणे असे जे वैराग्य त्याच्या साधनाने गृह्यते म्हणजे विपरीत वृत्ति होणे असा
जो विक्षेप त्याचा प्रतिबंध होऊन विषयाकडे वृत्ति न होतां केवळ आत्माकार वृत्ति स्वरूपाने मन स्थिर होते ॥ ३५॥ ॥

पूर्वोक्त अभ्यास आणि वैराग्य या साधनांहीं करून असंयत म्हणजे अजित किंवा स्वाधीन झाला नाहीं आत्मा म्हणजे मन ज्याचें असा-जो त्यास पूर्वोक्त योग सिद्ध होणे कठीण आहे। असें मला वाटते। परंतु त्या दोन साधनांनीं वश म्हणजे स्वाधीन झाला आहे आत्मा म्हणजे मन ज्याचे असा आणि यत्न करणारा त्या सउपायें करून म्हणजे प्रयत्नें करून योग सिद्ध किंवा प्राप्त होण्यास शक्य आहे॥ ३६॥ मनाचा निग्रह कठीण आहे यास्तव योग सिद्धी विषयी विघ्नें आहेत असें मानून अर्जुन प्रश्न करतो॥ हे कृष्णा। योग म्हणजे कर्म योग त्यापासून चलित आहे मानस ज्याचें असा म्हणजे कर्मयोग सोडलेला पुरुष श्रद्धें करून उपेत म्हणजे योग मार्गांत प्रविष्ट झालेला ही अयति म्हणजे आयुष्याचे अल्पत्वामुळें किंवा दृढ वैराग्य नसल्यामुळें योगाभ्यासाविषयी अल्पप्रयत्न झालेला योग सिद्धि म्हणजे योगफल जो ब्रह्मात्मतत्व साक्षात्कार त्याप्रत न पावून मरण पावला तर कोणते गतीस जातो॥ ३७॥ प्रश्नाचा अ-

असंयतात्मना योगो दुःप्राप इति मे मतिः॥ वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः॥ ३६॥ अर्जुन उवाच॥ अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः॥ अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति॥ ३७॥ कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति॥ अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि॥ ३८॥ एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः॥ त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते॥ ३९॥ ॥

भिप्राय स्पष्ट करून [illegible] त्यास साचा आरंभ केल्याने कर्म [illegible] मुळे स्वर्गादिक फल त्यास होणार नाहीं। योगाची सिद्धि न झाल्यास [illegible] मार्गाचे ठाई तर विमूढच म्हणजे अज्ञानीच आहे यामुळें मोक्षफल ही नाही। याप्रमाणे पुरुषार्थ-साधन भूत जे कर्म [illegible] आणि योगमार्ग या दोहोंपासून भ्रष्ट होऊन पुरुषार्थ साधनास [illegible] आश्रय त्यास नाहीं असा निराश्रय होत्साता जसे पहिलें [illegible] फाटलेलें आणि दुसरे अभ्रास न मिळालेले असें अभ्रच नाश पावते त्याप्रमाणें-हे महाबाहो कृष्णा-तो योगभ्रष्ट [illegible] नाश पावत नाही॥ ३८॥ एतत् म्हणजे या माझ्या संशयाचा अशेषतः म्हणजे साकल्येंकरून छेद करण्यास तूं योग्य आहेस। हे कृष्णा। तुजवांचून या संशयाचा छेद करणारा कोणी नाही॥ ३९॥ । ॥

या अर्जुनाचे प्रश्नाचे उत्तर श्रीकृष्ण भगवान् सांगतात। हे पार्था अर्जुना। त्याचा इह म्हणजे यालोकीं नाश म्हणजे नीचयोनीची प्राप्ति अ
मुत्र म्हणजे परलोकीं नाश म्हणजे नरकप्राप्ति ही दोन्हीं ही होत नाहींत। कारण। हे ताता बाबा अर्जुना। हे लोकरीती प्रमाणें वर्त
ल तेनें संबोधन आहे। कल्याणकृत म्हणजे शुभकर्माचरण करणारा कोणी दुर्गती प्रत पावत नाहीं। तुझे प्रश्नातील पुरुष श्रद्धे
ने प्रथम प्रवृत्त झाल्यामुळे शुभकर्माचरण करणारा होतो यामुळे तो दुर्गतीप्रत जाणार नाही॥ ४०॥ यालोकीं आणि परलोकीं
ही त्यास महत्वच प्राप्त होतें असे सांगतात॥ पुरुष मरण पावल्यानंतर तो जर सकाम आहे तर अश्वमेधादिक पुण्यकर्मे करणा
त्यास जे प्राप्त व्हावयाचे लोक स्वर्गप्रत जाऊन तेथें बहुत वर्षें पर्यंत राहून त्या लोकांतील सुखानुभव करून सदाचारसंपन्न जे श्रीम
त म्हणजे धनिकपुरुष त्याचे गृहाचें ठाईं जन्मास एतो। जे सदाचारसंपन्न आहेत ते सत्कारणींच द्रव्याचा व्यय करतात आणि प

श्रीभगवानुवाच॥ पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते॥ नहि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं
तात गच्छति॥ ४०॥ प्राप्य पुण्यकृतांलोकानुषित्वा शाश्वतीः समाः॥ शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभि
जायते॥ ४१॥ अथवा योगिनामेव कुले भवति धीमतां॥ एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशं॥ ४२॥
तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकं॥ यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन॥ ४३॥ ॥

हिले पेक्षा ही मोठे पदाप्रत जातात असें तात्पर्य॥ ४१॥ तो योगभ्रष्ट विरक्त आणि निष्काम आहे तर त्याविषयीं सांगतात। अथवा
धीमंत म्हणजे ज्ञानसंपन्न जे योगी त्यांचे कुळांत जन्म पावतो। पूर्वी सांगितले जे धनिक ते जर योगी नाहींत तर त्यांचे कुळांत जन्म पा
वत नाही। ज्ञानसंपन्न योग्यांचे कुळांत जन्म होणे हें परंपरेने मोक्षसाधन आहे यामुळे फार दुर्लभ आहे॥ ४२॥ हे कुरुनंदना अर्जुना
तें जन्म प्राप्त झालें म्हणजे त्याचे ठाईं पौर्वदेहिक जो बुद्धिसंयोग त्याप्रत म्हणजे पूर्वदेहाचे ठाईं योगाभ्यास करीत असतां जित
की योगभूमि प्राप्त झाली होती त्या भूमिकेंत जितके बुद्धीचा म्हणजे ज्ञानाचा लाभ झाला होता तितक्याप्रत पूर्वाभ्यासापेक्षा अ
ल्पाभ्यासानेंच पावतो। ततः म्हणजे तदनंतर भूयः म्हणजे पुनः संसिद्धौ म्हणजे पूर्वभूमिकेपेक्षां ही अधिक योगभूमी सिद्ध व्हा
वी याविषयीं यतते म्हणजे यत्न करतो॥ ४३॥ ॥

कोणी शिक्षित असतां ही कसा यत्न करतो ते सांगतात। अवश म्हणजे प्रह्लादिका प्रमाणें पिता आदिकानीं दुसरे मार्गा कडे योजिला त
रीं पूर्वीचा किंवा प्रतिबंधक कर्मामुळे योगाभ्यासा विषयी इच्छा न झाली तरी त्या कर्माचा नाश झाल्यावर जो अभ्यास तो त्यास कर्मापेक्षां
ही बलवत्तर झाल्यावर आपले कडे ओढून घेतो म्हणजे त्यास योगा विषयी प्रवण करतो। हेंच स्पष्ट करून दाखवितात। योगाविषयीं जि
ज्ञासु म्हणजे योग स्वरूपाचे ज्ञान व्हावें असें इच्छिणारा ही शब्दब्रम्हाचा म्हणजे वेदोक्त कर्माचे फलाचा अतिक्रम करतो म्हणजे त्या
हून अधिक फल त्यास प्राप्त होतें। मग योगाभ्यासाचा ज्यास पूर्वीचा संस्कार आहे तो कर्मादिकाचें उल्लंघन करून पुनः योगाभ्यासा
विषयी प्रवृत्त होईल म्हणून काय सांगावयाचे आहे॥ ४४॥ याप्रमाणे योगभ्रष्टाची गति सांगून विषयांची आपले कडे ओढून नेलेल

पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोपि सः॥ जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रम्हातिवर्तते॥ ४४॥
प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः॥ अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिं॥ ४५॥
तपस्विभ्योधिकोयोगी ज्ञानिभ्योपि मतोधिकः॥ कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन॥ ४६॥

जो योगाभ्यासा विषयीं पुनः प्रवृत्त होतो। त्याची गति सांगतात। प्राणवायूचा निरोध करण्या विषयीं जो दृढप्रयत्न म्हणजे खेचरी आ
दिक मुद्रा करण्याचा दृढाभ्यास तेणे करून जो यतमान म्हणजे प्राणायामाभ्यास सिद्धी विषयीं यत्न करणारा तो संशुद्धकिल्बिष
म्हणजे निष्पाप होतो। हाच अर्थ प्राणायामादी करून मन म्हणजे पाप जाते अशा प्रकारें मनुस्मृतीत सांगितला आहे। याच कारणास्तव
तो अनेक जन्मांही करून संसिद्ध म्हणजे योगसिद्ध होऊन नंतर ज्ञान द्वारा मोक्षा प्रत जातो॥ ४५॥ याच कारणाने योग्याची स्तुति करता
त। कृच्छ्र चांद्रायण मासोपवासादिक तप करणाऱ्यापेक्षा योगी श्रेष्ठ आहे आणि ज्ञानी म्हणजे ब्रम्हात्मापरोक्ष ज्ञान नसून जे वृथा पां
डित्य ज्ञानी त्यांहूनही योगी श्रेष्ठ असें मान्य आहे आणि कर्मी म्हणजे अग्निहोत्रादिक कर्म करणाऱ्या पेक्षांही योगी अधिक श्रेष्ठ आ

हे यास्तव-हे अर्जुना-तूं योगी हो ॥ ४६॥ कर्म योगाचे निरूपणाचे प्राधान्य करून महावाक्यांतील त्वं पदार्थाचा विचार समाप्त
करून अनंतर उपासनेचें निरूपण प्रधान करून महावाक्यांतील तत्पदार्थाचा विचार सांगावा या इच्छेने मोठे फल दाखवून प्रथम
उपासनेची स्तुति करतात।-देव मेवा परे यज्ञं-एथून जे पंचमाध्यायात सांगितले सर्व योगी त्यांमध्ये-मद्गतेन अंतरात्मा-म्हणून
जे मी जो वासुदेव भगवान त्याचे ठाई स्थापन केलेले अंत करणाने श्रद्धायुक्त होत्साता। माम्हणजे मज प्रत जो भजतो तो मत्प्रयुक्त
तम म्हणजे फार श्लाघ्य-श्रेष्ठ-स्वरूप असा मान्य आहे। यास्तव तूं माझा भक्त हो असे तात्पर्य॥ ४७॥ इतिश्री मद्भगवद्गीता-
या. रघुनाथ शास्त्रिकृत भाषा विवृतौ षष्ठोध्याय. समाप्त.॥ ६॥ ॥ श्री कृष्णार्पणमस्तु ॥ पूर्वी ध्यायांती मत्पर
मेश्वराला जो भजतो तो मोठा श्रेष्ठ आहे असे सांगितले त्याविषयी पूर्वोक्त निष्काम कर्म योगापेक्षां तुझें भजन विलक्षण कसें आणि कोण्या
योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना॥ श्रद्धावान् भजते यो मां स मे युक्ततमो मतः॥ ४७॥
इतिश्री मद्भगवद्गीता सूपनिष० श्रीकृष्णार्जुन संवादे अध्यात्मयोगो नाम षष्ठोध्यायः॥ ६॥
श्री भग०॥ मय्यासक्तमनाः पार्थ योगं युंजन्मदाश्रयः॥ असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु॥ १॥
प्रकारांनी कोणते गुणांनी तुझें भजन करणारास श्रेष्ठत्व आहे अशी शंका येईल अथवा तुझें परमेश्वराचें स्वरूप समजल्याशिवाय तुझें भजन क
से होईल अशी शंका येईल तर त्या शंकेचा परिहार आपणच श्रीभगवान् करतात॥ राजाचा आश्रय केलेला कोणी पुरुष धन आणि मा
न यांजकडे आसक्त मनाचा असतो तसा न होऊन माझेच ठाईं ज्याचें मन आसक्त आहे असा होत्साता मदाश्रय म्हणजे परम पुरुषार्थ
रूप जो मी त्याचेच मार्ग... करणारा आणि योगं युंजन् म्हणजे माझे ठाईं समाधीचे अनुष्ठान करणारा असा होत्साता-सर्व भूत
स्थ मात्मानं-असें जें पूर्वी सांगितलें तेणे करून त्वं पदार्थाचे विचार समयीं जरी माझें ज्ञान झालें असले तरी ईश्वर जीवाहून भि-
न्न आहे असें पातंजल म्हणजे योगी किंवा तार्किक मीमांसक म्हणतात-सांख्य ईश्वर नाहीं असें म्हणतात-इत्यादिक पूर्वी सांगित
लेले ईश्वरस्वरूपाचे विषयीचे विवादानें किंवा अज्ञानानें संशयरूपच होण्याजोगे आहे यामुळें समग्र नव्हे यासाठीं तत्पदार्थ

जो मी ईश्वर याप्रत असं सशय म्हणजे संशयरहित निश्चयात्मक समग्रज्ञानानें जसें जाणशील तसें तुला सांगतो। विभूति-ब
ळ-ऐश्वर्य इत्यादिक रूनयुक्त मी-असा समग्रपदाचा कोणी अर्थ करतात ॥१॥ जें पुढें सांगावयाचें तें ऐकण्यास श्रोत्याची श्र
द्धा उत्पन्न व्हावी यासाठी त्याचें पूर्वी स्तोत्र करतात ॥ ज्ञान म्हणजे ज्ञानानें प्रकाशित होणारें जें सत्य ज्ञान-आनंद अद्वितीयस्वरू
प इदं म्हणजे जीवस्वरूपाहून भिन्न नव्हे असें सर्वात्मभूत ब्रम्ह तें-अशेषतः म्हणजे त्याचें ज्ञान होण्यास जीं साधनें त्यांसुद्धां क
थयामि म्हणजे सांगतों। शब्दाचा परोक्षज्ञान उत्पन्न करण्याचा स्वभाव आहे यास्तव स्वर्ग आहे-धर्माधर्म आहेत-याचाक्यां-
पासून स्वर्ग धर्मादिकांचें जसें परोक्ष ज्ञान होतें त्याप्रमाणें तुमच्या वाक्यापासून पूर्वोक्त ब्रम्हस्वरूपाचें परोक्षज्ञान मला जरी झालें
तरी मी ईश्वर नव्हे। संसारी-सुखी-दुःखी-कर्ता-भोक्ता-बद्ध आहे असा जो मज अपरोक्षभ्रम झाला आहे त्याची निवृत्ति त्या परो
क्ष ज्ञानानें कशी होईल अशी शंका होईल तर त्याविषयीं सांगतात। सविज्ञानं म्हणजे अपरोक्ष किंवा अनुभवात्मक ज्ञान या सुद्धां

ज्ञानंतेऽहंसविज्ञानमिदंवक्ष्याम्यशेषतः ॥ यज्ज्ञात्वा नेहभूयोन्यत् ज्ञातव्यमवशिष्यते ॥२॥

पूर्वोक्त ज्ञान तुला सांगतों ॥ तात्पर्य। जो कधींही अपरोक्ष नव्हे असा जो अर्थ त्याचें परोक्षच ज्ञान वाक्यापासून होतें असा शब्दा-
चा स्वभाव असला तरी जो नित्य अपरोक्षच असून अज्ञानादि कारणामुळें त्याची अपरोक्षता जाऊन त्यास परोक्षता येते त्याविष
यीचें वाक्यरूप शब्दापासूनही अपरोक्ष ज्ञान होतें असाही शब्दाचा स्वभाव लोकांत पाहिला आहे। यास उदाहरण। तूं दशम आ
हेस असें वाक्य आहे। तें असें-कोणी दहा पुरुष नदी उतरून पलीकडे गेले परंतु त्या दहांतील आपण एक असतांही संख्या कर
ते वेळेस त्याणें आपणास सोडून मोजलें यामुळें नदीचे पलीकडील पुरुषावरील नऊ या संख्येचे ज्ञानानें मी दहावा आहे असें वि
वेक ज्ञान त्याचें नष्ट होऊन मी दहावा असें तो जाणता नाहीसा झाला आणि त्या दशमाचे अज्ञानानें आपण दहावा असतांही दशम दि
सत नाहीं तेव्हां दशम नाहीं। तो नदीत मरण पावला असें तो बोलूं लागला हें त्याचे अज्ञानानें केलेलें आवरण म्हणावें आणि त्या
मुळें जो शोक हृदयताडनादिक करूं लागला हें अज्ञानाचें कार्य आहे। नंतर कोणी आप्त तेथें आला त्याणें त्यास-का शोक क

रतो स- अके पुसल्या नतर दशम मरण पावला असे त्याणे सागितल्या वर त्या आप्ताने त्याकडून दाहा पुरुषांची संख्या करून दशम मरण पा

वला नाही दशम आहे असें सागितलें तेव्हां त्या आप्त वाक्या वरून दशम आहे असे स्वर्गादि लोक आहे अशा परोक्ष ज्ञाना प्रमाणे

परोक्ष दशामाचे ज्ञान प्रथम त्यास होऊन मगतो कोठे आहे अशा प्रश्नावरून त्या आप्ताने त्याकडून गणना करून दाखऊन- हेनऊ आ-

णि दाहवा तूं- असा उपदेश केला। त्यापासून अज्ञानाने जो भ्रम झाला होता तो जाऊन दशममी आहे असे अपरोक्षानुभवात्मक नित्य

अपरोक्ष जो स्वात्मा त्याविषयीचे ज्ञान त्यास उत्पन्न होऊन त्याचा शोक गेला। याप्रमाणे प्रथम ब्रम्हस्वरूप कोणतें अशा प्रश्नावरून-

ब्रम्ह सत्य ज्ञानानंदात्मक अद्वितीय आहे अशा वेद वाक्याच्या उपदेशाने सत्यज्ञानानंदात्मक ब्रम्ह आहे असे परोक्ष ज्ञान प्रथम होऊन-

त्याचीं जी लक्षणें तीं पूर्वोक्त रीतीने आपले स्वरूपावर आहेत असे पंच कोशादिकांचे विवेकरूप विचार करून जाणून ते ब्रम्ह आणि

आत्मा एकच असावें अशी संभावना होतां नंतर ते ब्रम्ह तूंच आहेस अशा गुरूपासून झालेले महावाक्याच्या उपदेशापासून नित्य अपरो

मनुष्याणां सहस्त्रेषु कश्चिद्यतति सिद्धये॥ यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्वतः॥३॥

क्ष जो आत्मा त्याचे ब्रम्हस्वरूपानें अपरोक्षानुभवात्मक ज्ञान होऊन सर्व अज्ञान कृत भ्रम शोकापासून जीवन्मुक्त होतो॥ यत् म्हणजे

जें ब्रम्हस्वरूप जाणल्यावर भूयः म्हणजे पुन. दुसरें ज्ञातव्य म्हणजे जाणावयाचें अवशिष्ट राहत नाही। सर्व जगास सद्रूप ब्रम्हच कारण आ

हे त्या जगाची सत्ता कारणभूत ब्रम्हसत्तेहून निराळी नाही। नामरूप मिथ्याच असते सोडून पाहिलें म्हणजे जगाचें स्वरूप सद्रूपच आहे

जसे घटादिकाचें नामरूप सोडून मृत्तिकाच स्वरूप त्याप्रमाणें। तेव्हां सर्व सद्रूपात्म ब्रम्हस्वरूपच आहे यामुळें ब्रम्हज्ञानाने सर्व जाणले

से व्हां त्याहून दुसरें ज्ञातव्य नाहींच असें तात्पर्य॥२॥ त्याच ज्ञानाला दुर्लभत्व दाखवून त्याचा स्तव करतात॥ जीव असंख्य आहेत त्यां

मध्यें मनुष्यांशिवाय दुसरे जीवाची ज्ञानाविषयी प्रवृत्तिच नाही मनुष्यांतही हजारांत एखादा पुण्यवशेंकरून ज्ञान आपणास प्राप्त व्हा

वें याविषयी प्रयत्न करतो। सहस्त्रावधि प्रयत्न करणाऱ्यामध्यें ही पुण्यवशेंकरून कोणी एखादाच मत्परमेश्वराला तत्वतः म्ह

णजे स्वानुभवें करून जाणतो। असें हे ज्ञान दुर्लभ आहे तथापि तुला सांगतों॥३॥ ॥ ॥

ब्रम्हज्ञाने करून सर्व जाणलें जातें कांहीं जाणावयाचें राहत नाहीं असें जें पूर्वी सांगितलें त्याची उपपत्ति करण्यासाठीं सर्व चेतनाचेतन प्रपं-
च ज्ञानस्वरूप ब्रम्हरूप कारणापासून उत्पन्न झालेला आहे असें सांगतात ॥ भूमी म्हणजे पृथिवी-आप म्हणजे उदक-अनल म्हणजे ते-
-वायु म्हणजे वारा-ख म्हणजे आकाश-मन-बुद्धि आणि अहंकार। हे भूम्यादिक विकृति म्हणजे विकारच आहेत। आणि पुढें ही आ-
ठ प्रकारची प्रकृति म्हणून सांगतात यास्तव भूमि शब्दानें भूमीची प्रकृति म्हणजे सूक्ष्म रूप ज्यास गंधतन्मात्र म्हणतात तें घ्यावें। या
प्रमाणेंच पुढें ही जाणावें। आप शब्दानें रसतन्मात्र-अनल शब्दानें रूपतन्मात्र-वायु शब्दानें स्पर्शतन्मात्र-ख या शब्दानें शब्दतन्-
मात्र-मन या शब्दानें त्याचा कारणभूत अहंकार-बुद्धि शब्दानें महत्तत्व ज्यास समष्टि बुद्धि असें म्हणतात-अहंकार शब्दानें-
त्यास कारणभूत मूल प्रकृति किंवा अविद्या-हीं त्या उदकादिकाचीं प्रकृतिरूप सूक्ष्म रूपें घ्यावीं। या आठ भेदांनीं भिन्न आठ प्र-
कारची माझी ही मूल प्रकृति आहे अथवा अभिन्ना असा पदच्छेद करून ही आठ प्रकारची प्रकृति मे म्हणजे मासेहून अभिन्न आहे।

भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ॥ अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४॥

जसें शुक्तीवर भासलेलें रजत शुक्तीहून अभिन्न आहे त्याप्रमाणें ॥ त्रयोदशाध्यायाचे ठाईं-महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च॥
इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः-या श्लोकानें पंचमहाभूतें-अहंकार-बुद्धि-अव्यक्त-पांच ज्ञानेंद्रियें-पांच कर्मेंद्रियें-मन-
आणि शब्द स्पर्श रूप रस गंध हे पांच विषय-अशा चतुर्विंशति तत्वांचे भेदानें भिन्न प्रकृति चोवीस प्रकारची आहे असें सांगि-
तलें आहे तथापि पूर्वोक्त आठ भेदांतच बाकीच्या तत्वांचा समावेश करावा या अभिप्रायानें येथें आठच भेद प्रकृतीचे असें सां-
गितलें आहे॥ सांगितलेले आठ भेदांत चतुर्विंशति तत्वांचा समावेश करावयाचा तो असा-येथील भूम्यादिक शब्दांनीं पंचमहाभू-
तें आणि त्यांचीं पूर्वोक्त गंधतन्मात्रादिक सूक्ष्म रूपें घ्यावीं। अहंकार शब्दानें अहंकार आणि अहंकाराचीं कार्यें जीं पांच ज्ञानेंद्रि-
यें आणि पांच कर्मेंद्रियें अशीं अकरा घ्यावीं। बुद्धि शब्दानें महत्तत्व घ्यावें। मन या शब्दानें मनानेंच जाणावयाचें असें जें महत्तत्व-

याप्रमाणें क्षेत्र स्वरूप प्रकृतिसांगून क्षेत्रज्ञरूप प्रकृति सांगतात॥ हीपूर्वोक्त अष्टो प्रकारची प्रकृति जड आहे याकारणामुळे यापकृतीस अपर प्रकृति म्हणतात। याअपर म्हणजे कनिष्ट जड प्रकृतीहून दुसरी चेतन जीवस्वरूप उत्कृष्ट प्रकृति माझी आहे असे-हेमहाबाहो अर्जुना- तूंजाण। याचेतन प्रकृतीस क्षेत्रज्ञ असे म्हणतात। जीवरूप प्रकृतीस उत्कृष्टत्वा विषयी कारण सांगतात॥ ययाम्हणजे ज्या जीव स्वरूप प्रकृतीनें या सर्व जगाचे आपले कर्म द्वारा धारण केलें आहे। तात्पर्य। जीवानें केलेलीं जी शुभाशुभ कर्में त्यांचें सुख दुःखरूप जें फळ त्याचा भोगण्याचा समय जेव्हां प्राप्त होतो तेव्हा त्या कर्म बलानें ईश्वरास जग करण्याची इच्छा उत्पन्न होऊन तो जगाची उत्पत्ति करतो। उत्पन्न झालेलें जग जीवाचे कर्माचा फलोपभोग समाप्त होई तोपर्यंत राहते। नंतर त्याचा लय होतो। असें शास्त्रात सांगितलें आहे। यावरून जगाची स्थिति होण्यास आपले कर्मद्वारानें जीवच कारण आहे॥ ५॥ क्षेत्र-

अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम्॥ जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत्॥ ५॥
एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय॥ अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा॥ ६॥

रूप अपर प्रकृति आणि क्षेत्रज्ञ जो जीव ती पर प्रकृति असे सांगून त्याचे द्वारा आपणास जगाच्या उत्पत्तिस्थिति लयाचे कारणत्व सांगतात॥ एतद्योनीनि म्हणजे या माझ्या दोन परापर प्रकृति आहेत योनि म्हणजे उत्पत्तिस्थिति लयाचे कारण ज्याचें अशीं हीं सर्व भूतें आहेत असें जाण। पूर्वोक्त अपर जड प्रकृतीचा देहादि रूपानें परिणाम होतो। नंतर माझी अंश भूत जी चेतन जीवरूप परप्रकृति ती भोक्तृस्वरूपानें त्या देहांत प्रवेश करून कर्मफलोपभोग समाप्त होई तोपर्यंत त्या देहादिकांस आपले कर्मबलानें धारण करते। या दोन्ही प्रकृति माझेपासूनच उत्पन्न झाल्या आहेत यास्तव प्रकृतीस कर्ता सर्व जगाचा प्रभव म्हणजे उत्पत्ति कर्ता परम कारण मीच आहें। तथा म्हणजे तसाच प्रलय म्हणजे प्रलय स्थान मीच आहें॥ ६॥ हे धनंजया अर्जुना। सांगितलें कारणानें मत्तः म्हणजे माझे शिवाय परतर म्हणजे दुसरें कोण तेंही श्रेष्ठ असें जगाचे सृष्टि स्थिति लयांस स्वतंत्र कारण नाहीं। जगाची उ

त्पत्ति आणि लय हे ब्रम्हाचे ठाई आहेत असें सांगित ल्यानें जगास ब्रम्ह उपादान कारण आहे यामुळे ब्रम्ह सत्तेवांचून जग सत्ताभिन्न नाहीं। यास दृष्टांत। घटादिकाची उत्पत्ति मृत्तिकेपासून म्हणजे तिचेठाईं होते आणि लय ही तिचेच ठाईं होतो यास्तव घटादिकास मृत्तिका उपादान कारण आहे। उपादान कारणावांचून कार्याची पृथक् सत्ता नाहीं। घट असा आकार हा वाणीनें निष्पन्न झालेलें नाममात्र आहे परंतु मृत्तिकेशिवाय घटाची दुसरी सत्ता नाहीं। कार्य मात्र उपादान कारणावांचून अन्य आहे असें कच विलें यावरून मृत्तिकेचें ज्ञान झालें म्हणजे मृत्तिकेची सर्व घटादिक कार्ये मृत्तिकेचे स्वरूपाने असी जाणली जातात त्याप्रमाणे ब्रम्हज्ञानेंकरून सर्व जग सद्रूपानें जाणून दुसरें मग ज्ञातव्य राहत नाहीं असें पूर्वी कार्चें दृढीकरण केलें। याप्रमाणें सर्व जगाचे ठाईं उपादान कारण भूत जें ब्रम्ह त्याची सद्रूपानें अनुवृत्ति आहे यामुळें सर्व जग सद्रूपानन्य आहे असा अन्वय सांगून आतां दृश्यमान नाम रूपात्मक सर्व जगाचा ब्रम्हाचे ठाईं

मत्तःपरतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय॥ मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव॥ ७॥

रसोहमप्सु कौंतेय प्रभास्मि शशिसूर्ययोः॥ प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु॥ ८॥

व्यावृत्ति लक्षण अतिरेक सांगतात॥ मयि म्हणजे सद्रूपेंकरून स्फूर्तिरूपानें सर्व जगाचे ठाईं स्थित जो मी याचे ठाईं हे सर्व जग मणिजसे सूत्रांत ओंवलेले राहतात त्याप्रमाणें ओंवलेले आहे। तात्पर्य। सूत्रांत ओंवलेले मणि सूत्रांत राहतात परंतु सूत्र त्यांत एकच असतें तरी मणि परस्पर भिन्न असतात यामुळे त्यांहून सूत्र निराळें आहे। तसें जगांत सद्रूपानें ब्रम्ह एकच असलें तरी त्याचे ठाईं मण्या प्रमाणें ओंवलेले जग परस्पर भिन्न आहे यामुळें त्याहून ब्रम्ह भिन्न आहे। यास्तव मण्याचे विकारानें सूत्र जसें विकार पावत नाहीं याप्रमाणें जगाचे विकारानें मी विकारी होत नाहीं॥ ७॥ श्रीकृष्णाने आपणास जगाचे स्थितीचें कारणत्व जें सामान्यरूपानें सांगितलें तेंच विस्तारेंकरून सांगतात॥ हे कौंतेया अर्जुना - उदकाचा सारभूत जो रस तो मी आहें म्हणजे रसरूप जो मी त्याचे ठाईं उदकें आश्रित आहेत। चंद्र आणि सूर्य यांची सारभूत जी प्रभा ती मी आहे म्हणजे प्रभारूप जो मी त्याचे ठाईं चंद्र आ-

णि सूर्य आश्रित आहेत। सर्व वेदाचे सार भूतजो प्रणव म्हणजे ओंकार मी आहे म्हणजे ओंकाररूपजोमी त्याचे ठाई सर्ववेद आश्रित-
आहेत। आकाशाचा सार भूत जो शब्द तो मी आहे म्हणजे शब्दरूपजो मी त्याचे ठाई आकाश आश्रित आहे। जेणे करून मनुष्याचे ठा-
ई पुरुषअशी बुद्धि उत्पन्न होते असें जे पौरुष म्हणजे पुरुषाचाभावकिंवा वीर्य ते मी आहे म्हणजे पौरुषरूपजो मी त्यामाझे ठाई-
पुरुष आश्रित आहेत ॥८॥ पृथिवीचा सारभूत जो पुण्य म्हणजे उत्तम असा गंध तो मी आहे म्हणजे गंधरूपजो मी त्याचे ठाई पृ-
थिवी आश्रित आहे। विभावसु म्हणजे अग्नि त्याचे ठाई सार भूत जे ते म्हणजे दाहकरण्याची शक्ति ती मी आहे म्हणजे तेजरूप जो मी
त्याचे ठाई अग्नि आश्रित आहे। सर्व भूतांचे ठाई सार भूत जे जीवन म्हणजे आयुष्य किंवा जेणे करून जीवन होतें असे अन्न तें मी-

पुण्यो गंधः पृथिव्यांच तेजश्चास्मि विभावसौ ॥ जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥
बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनं ॥ बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहं ॥ १० ॥

आहे म्हणजे जीवनरूप जो मी त्याचे ठाई सर्वभूते आश्रित आहेत। तपस्वीचे ठाई सारभूत जे तप ते मी आहे म्हणजे तपरूप जो मी
त्याचे ठाई तपस्वी आश्रित आहेत॥९॥ सर्व पिंड ब्रम्हांड स्वरूप भूताचे सारभूत जे सनातन म्हणजे पुढील पुढील कार्याचे ठाई श
करूपाने किंवा नाश रहित स्वरूपाने राहणारे बीज तें मी आहे म्हणजे बीजरूप जो मी त्या माझे ठाई सर्वभूते आश्रित आहेत। अ
से-अर्जुना-तू जाण। बुद्धिमताचे ठाई जी सार भूत बुद्धि ती मी आहें म्हणजे बुद्धिरूप जो मी त्याचे ठाई बुद्धिमत आश्रित आहे
त। तेज स्वीचे ठाई जे सार भूत तेज म्हणजे प्रगल्भता ती मी आहे म्हणजे तेजरूप जो मी त्याचे ठाई तेजस्वी आश्रित आहेत॥
॥१०॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्री नारायणार्पणमस्तु ॥ ॥

बळ वंतांचे ठाईं सारभूत जें बळ तें मी आहें म्हणजे बळरूप जो मी त्याचे ठाईं बलवंत आश्रित आहेत। तें बळ कोणतें तें सांगतात। प्राप्त न झालेले वस्तूचा जोर जो गुणापासून झालेला अभिलाष तो काम- अभिलषित वस्तु प्राप्त झालें म्हणजे त्यापेक्षां अधिक दुसरें असावें अशी जी चिंता ऊ रंजन करणारी तमोगुणापासून झालेली तृष्णा तो राग- असे जे काम आणि राग यांही करून रहित जें सत्वगुणापासून झालेलें स्वधर्मानुष्ठान करण्याचें सामर्थ्य रूप बळ तें पूर्वींप्रमाणें मीच आहें। हे भरतश्रेष्ठा अर्जुना- धर्माविरुद्ध म्हणजे- विधीनें जिचें पाणिग्रहण केलें आहे अशी जी विवाहित पत्नी तिचे ठाईं पुंन्नाम नरकापासून संरक्षण करणारा जो पुत्र त्याचे उत्पत्तीचे उपयोगापुरता- जो काम म्हणजे स्त्रीचा अभिलाष तो मी आहें॥ ११॥ आणि सात्विक म्हणजे सत्वगुणापासून उत्पन्न झालेले जे धर्म ज्ञान शमदम वैराग्यादिक भाव म्हणजे पदार्थ- तसेच राजस म्हणजे रजोगुणापासून उत्पन्न झालेले लोभ हर्ष दर्प प्रवृत्त्यादिक पदार्थ- तसेच तामस म्हणजे तमोगुणापासून उत्पन्न झालेले निद्रा आलस्य शोक मोह प्रमाद इत्यादिक पदार्थ ते सर्व माझे

बलं बलवतां चाहं कामरागविवर्जित ॥ धर्माविरुद्धो भूतेषु कामोस्मि भरतर्षभ ॥ ११॥

ये चैव सात्विका भावा राजसा स्तामसाश्चये ॥ मत्त एवेति तान्विद्धि नत्वहं तेषु ते मयि ॥ १२॥

त्रिगुणात्मक प्रकृतीचे कार्यभूत आहेत या स्तव मत्त एव म्हणजे रसतन्मात्र स्वरूप सूत्रात्मक माझेपासूनच उत्पन्न झाले आहेत असें तूं जाण। याप्रमाणें जर तूं सर्वजगत्स्वरूप आहेस तर जगाचे विकारानें तुला विकारित्व येईल अशी शंका होईल तर त्याविषयी सांगतात। ज्या रसादिक पदार्थांच्या ठाईं आप म्हणजे उदकादिक पदार्थ प्रोत म्हणजे आश्रित आहेत म्हणून सांगितलें ते सूत्रात्म्याचे अवयवभूत मिथ्या जड स्वरूप आहेत त्यांचे ठाईं मी नाहीं म्हणजे माझे स्वरूपाचे ठाईं भासलेलें जें जग त्यास अधिष्ठानभूत जो मी याची सत्ता स्फुरणे करून प्राप्त होऊन भ्रमकालीं तें अस्ति म्हणजे आहे- भाति म्हणजे भासतें- अशा व्यवहारास मात्र योग्य होतें। जसें रज्जु शुक्ति इत्यादिकावर भासलेले सर्प रजतादिक रज्जु शुक्तीचे सत्तेनें पूर्वोक्त व्यवहारास योग्य होतें त्याप्रमाणें। परंतु मी मिथ्या जड जगत्स्वरूप नाहीं। जसें रजत सर्प शुक्ति रज्जु स्वरूप नाहीं त्याप्रमाणें

ते पूर्वोक्त पदार्थ मयि माझेठाईं अध्यस्त म्हणजे भ्रमानें शुक्तीवर रजता प्रमाणे भासले आहेत। कार्य भूत जगास कारणभूत ब्रम्हानन्य त्व जें सांगितले तें जग आणि ब्रम्ह एकच आहे अशा तात्पर्याने सांगितले नाही तर जगसत्ता ब्रम्हसत्तेहून भिन्न नाहीं ब्रम्हाचे स्वरूप भूत सत्तेनेच पूर्वोक्त प्रकारानें अस्ति-भाति-या व्यवहाराची उपपत्ति होते अशा तात्पर्याने सांगितले ॥१२॥ असा जो परमेश्वर तूं याप्रत पूर्वोक्त स्वरूपानें सर्व कां जाणत नाहींत असें अर्जुन म्हणेल तर त्याविषयी सांगतात॥ त्रिभिः म्हणजे प्रकाश प्रवृत्ति मोहात्मक किंवा पूर्वोक्त धर्म ज्ञानादिक गुण एतन्मय म्हणजे सत्वरजतमोगुणापासून उत्पन्न झालेले विकारात्मक भाव म्हणजे पदार्थ त्यांही करून हें सर्व मोहित झालेलें जग म्हणजे प्राणिमात्र एभ्यः म्हणजे या भावाहून पर म्हणजे यांहीं करून रहित किंवा यांचा संबंध ज्यास नाही असा जो यांचा नियंता अव्यय म्हणजे नाशरहित मी याप्रत सांगितले स्वरूपानें जाणत नाहींत ॥१३॥ तर कोण जाणतात ते सांगतात॥ जीवस्वरूपानें लीले करून क्रीडा करणार जो देव मी याची ही प्रसि

त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ॥ मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययं ॥१३॥

दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ॥ मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥ १४ ॥ ॥

द्ध पिंड ब्रम्हांड रूपाने परिणाम पावलेली आणि आत्मा स्वप्रकाश आनंद चिद्रूप असतांही तो आपणास जाणत नाहीं असा सर्वांस अनुभव आहे यावरून जी आहे असें कल्पना करण्यास योग्य झालेली आणि जीस अविद्या ही म्हणतात आणि जिचा अतिक्रम करण्यास फार कठीण आहे अशी माझी माया आहे। या मायेपासून तरण्याचा उपाय सांगतात। मामेव म्हणजे सर्व भूतांचा आत्मा सर्व भूतांनाच्छिन असा जो मी वासुदेव त्याप्रतच ये म्हणजे जे प्रपद्यंते म्हणजे स्वात्मत्वे करून भजतात ते -मायामेतां तरंति- म्हणजे या मायेपासून तरतात। अधिष्ठान ज्ञानानेंच समूळ भ्रमाचा उच्छेद होतो दुसरे ज्ञानानें किंवा मनाचे वृत्तीचे निरोधानें होत नाहीं असा अर्थ। त्याचें तात्पर्य असें- ईश्वर आणि जीव असा विभाग जेथें नाहीं असें जें शुद्ध चिन्मात्र ब्रम्हस्वरूप त्याचे ठाईं मायेची कल्पना झाली म्हणजे त्या मायोपाधिकास ईश्वर अशी संज्ञा होते। त्या-

माया रूप दर्पणाचे ठाई त्या मायोपाधिक चैतन्याचा प्रतिबिंब जो होतो तो जीव त्यास बिंब भूत जो ईश्वर त्याचे अनुरोधाचें म्हणजे आपण ईश्वराचे स्वाधीन होऊन जीवास आपले वश करून संसारांत येणे जाणें अज्ञाव्यापाराने युक्त करते। जसें मुखाचे अनुरोधानें दर्पणांतील प्रतिबिंब चलनादि कक्रियायुक्त होते किंवा दर्पण मलिन झालें किंवा छिन्न भिन्न झाले म्हणजे दर्पणांतील प्रतिबिंबही मलिन किंवा छिन्न भिन्न होते त्याप्रमाणें। जीवास बिंब भूत ईश्वराबरोबर चैतन्य आणि मायेवरील सर्व कर्तृत्व दुःखादिक संसारांत जन्मास जाणें येणें याही करून जीवस्वरूप युक्त होते हेंच मायेस ईश्वराधीनत्व आणि मायेचे द्वारा ईश्वरास सर्व जगाचे उत्पत्त्यादिकांचे कर्तृत्वादिक मायी परमेश्वर या विश्वाची सृष्टि करितो त्या सृष्टीत मायेनें वश केलेला दुसरा जीव निरुद्ध म्हणजे बद्ध झाला आहे या अर्थाच्या श्रुतींत सांगितले आहे। याप्रमाणें एकच माया उपाधि किंवा दर्पणस्थानापन्न होऊन ईश्वररूप बिंब आणि प्रतिबिंबरूप जीव असा विभाग करते किंवा प्रस्तावनेंत लिहिले प्रमाणे एकच माया अविद्या आणि माया या दोन प्रकारची होऊन मायेत प्रतिबिंबित ईश्वर आ

न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः ॥ माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥१५॥

णि अविद्येत प्रतिबिंबित जीव असा विभाग करते। या जीवेश्वरांहून निराळे उपाधिरहित या दोहोंमध्ये राहिलेले शुद्ध चैतन्य- मुक्तानी पावावयाचे तृतीय आहे। हे जीवेश्वर आपले उपाधीचे पक्षपाताने उपाधि दर्शनेंत अल्पज्ञ-शास्य-म्हणजे शासन करण्यास योग्य जीव आणि सर्वज्ञ-शास्ता-नियंता ईश्वर असे होतात। हा जीवास जेव्हां ईश्वराराधनाने झालेले ईश्वर प्रसादें करून- आपले आणि ईश्वराचे सच्चिदानंदात्मक अद्वितीयस्वरूप एकच आहे माया आणि तिणें कल्पिलेले जे सर्व उपाधि ते मिथ्या आहेत ते आपल्या स्वरूपी नाहीत। ईश्वर आणि मी निरुपाधिक स्वरूपानें एकच आहे। असें ब्रह्मात्म तत्वज्ञान होते तेव्हां माया नष्ट होऊन जीवास पूर्वोक्त तृतीय चिन्मात्र स्वरूपाची प्राप्ती होऊन तो मुक्त होतो ॥१४॥ असें आहे तर सर्व तुला कां भजत नाहीत असें म्हणेल तर त्याविषयी सांगतात ॥ दुष्कृतिनः म्हणजे पापाचरण करणारे अतएव त्यांची चित्तशुद्धि नाहीं यामुळें मूढ म्हणजे आत्मानात्म विवेकज्ञान ज्यास नाहीं असे अतएव नरांमध्ये जे अधम आणि मायेनें अपहृत म्हणजे नष्ट झालें आ

हे ज्ञान म्हणजे सच्चिदानंदात्मका द्वितीय ब्रह्मात्मतत्व ज्ञान त्याचें एणेंकरून मायेस आवरण करण्याची शक्ति आहे असें सूचविलें - यामुळें आसुर भाव म्हणजे विरोधनादिकजे असुर त्याचाजो भाव म्हणजे देहेंद्रियादिक च आत्मा आहे याहून दुसरा आत्मा नाहीं यास्तव - ऋणं कृत्वा घृतंपिबेत - यालौकिकातील न्यायानें देहेंद्रियादिकाचेंच विषय भोग करून समाधान करावें हाच मुख्य पुरुषार्थ आहे इत्यादिक जो चित्ताभिप्राय किंवा सिद्धांत याप्रत आश्रित म्हणजे आश्रय केले लें - एणेंकरून मायेस विक्षेपकरण्याची शक्ति आहे असें सूचविलें - याप्रमाणे या दोहीं शक्ती करून मायेचे योगानें आपले वास्तविक स्वरूपाचें आवरण झाल्यामुळे देहादिकावर आत्मत्व भ्रम होऊन त्याचें स्वरा साठीं दुष्कृत करणारे असे मूढ किंवा दंभ दर्प क्रोध पारुष्य इत्यादिक जे असुरांचे स्वभाव त्याप्रत आश्रय केलेले जे आहेत ते मां न प्रपद्यंते - म्हणजे भजप्रत भजत नाहीत संसार रूप अनर्थच पावतात ॥१५

चतुर्विधा भजंते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ॥ आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६ ॥

॥ देहाभिमान असतांही भजपासून भय पावून सुकृत म्हणजे पुण्याचरण च करतात असे जे पुण्यवंत ते जन मला भजतात । हे अर्जुना - ते जनही सुकृताचे तारतम्यानें चार प्रकारचे आहेत ॥ ते सर्वही माझी प्राप्ति व्हावी अशा कामनेचे नाहीत । कोणी आर्त म्हणजे तस्कर व्याघ्रादिकांनी पीडा केलेला असतो तो त्या पीडा परिहारार्थ मला भजतो - कोणी जिज्ञासु म्हणजे आत्मस्वरूपाचे अज्ञानाचा नाश होण्या साठीं आत्मतत्व समजावें अशी इच्छा करणारा असतो तो ज्ञानप्राप्त्यर्थ मला भजतो - कोणी अर्थार्थी म्हणजे धन स्त्री पुत्रादिक प्राप्त व्हावें या विषयीं इच्छा करणारा असतो तो त्या अर्थाच प्राप्ती साठीं मला भजतो आणि कोणी ज्ञानी म्हणजे आत्मतत्व वेत्ता असतो तोही मला भजतो । हे जन्मांतरार्जित पुण्यवंत आहेत तर मला भजतात नाहीं तर त्या त्या कामनेनें क्षुद्र देवतांसच भजतात असे सुकृति एणें करून सूचविलें ॥ १६ ॥ ॥

हे सर्व ही सुकृति आहेत तथापि त्यांमध्यें ज्ञानी - ईश्वरत्व किंवा आत्मतत्व एकच आहे त्याशिवाय दुसरा भजनीय पदार्थच
हीं अशा निश्चयाने नित्य म्हणजे निरंतर युक्त म्हणजे मन्निष्ठ आहे आणि एक भक्ति म्हणजे मीजो एक वासुदेव सर्वांचा आ
त्मा त्याचेच ठाई सर्वदा ज्याची भक्ति आहे कधीही तिचा व्यभिचार नाही असा आहे यामुळें तो विशिष्यते म्हणजे अधिक-
आहे। आर्तादिक त्यात्या अर्थांची प्राप्ति झाली म्हणजे मला भजत नाहीत यामुळें ते नित्ययुक्त नाहीत आणि जे रोगी आर्त आ
हेत ते सूर्याला भजतात - जे ज्ञानार्थी आहेत ते सरस्वतीस भजतात - द्रव्यार्थी कुबेरादिकांस भजतात - यामुळें ते अनेक भ
क्ति म्हणजे अनेकांची भक्ति करणारे आहेत ते एकभक्ति नाहींत असें तात्पर्य। ज्याकारणास्तव ज्ञानी एकभक्ति आहे झाला
व ज्ञान्यास मी परमप्रेमास्पद आत्मस्वरूप आहे म्हणून अत्यंत प्रिय आहे। आपला आत्मा जसा प्रिय आहे तसा दुसरा को

तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते॥ प्रियोहि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः॥१७॥
उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतं॥ आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिं॥१८॥

णी प्रिय नाही। सर्व ही आत्म्यासाठींच प्रिय आहे असे सर्व लोकांत प्रसिद्धच आहे। आणि तो ज्ञानी मला फार प्रिय आहे। भक्त फा
र दुर्लभ आहे असें तात्पर्य॥१७॥ हे सर्व माझी भक्ति करतात या कारणामुळे उदार म्हणजे उत्कृष्टच आहेत अथवा मला प्रि
यच आहेत। तथापि ज्ञानी माझा आत्मा आहे म्हणजे आत्म्याप्रमाणे निरतिशयित प्रिय आहे असे माझे मत आहे। ज्याकार
णास्तव तो युक्तात्मा म्हणजे मीच भगवान् वासुदेव आहें मी त्याहून अन्य नाहीं असे ज्याचें उत्तमप्रकारें करून माझे ठाई
चित्त स्थित आहे असा होत्साता - अनुत्तमा गति मामेव आस्थितः - म्हणजे ज्यापेक्षां उत्तम प्राप्त व्हावयाचें स्थान नाहीं-
असा जो ब्रम्हस्वरूप मी वासुदेव त्याप्रत गमन करण्याविषयीं प्रवृत्त होऊन माझी भक्ति करणारा आहे दुसऱ्या तिघांस
रखा आरोग्यादिक प्राप्त व्हावे या इच्छेने माझी भक्ति करणारा नाहीं॥१८॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥

पुनः ज्ञान्याची स्तुति करतात ॥ ज्ञानप्राप्त्यर्थ ईश्वरी देशाने निष्काम कर्माचरण करून चित्तशुद्धीने द्वारा वेदांतादिकांचें श्रवण
मननादिक करीत असतां बहुत जन्माचे अंती-वासुदेवः सर्वमिति ज्ञानवान्-म्हणजे शेवटचे जन्मी सर्व वासुदेवच आहे अ
शा ज्ञानाने युक्त होत्साता-मां प्रपद्यते-म्हणजे मला वासुदेवात्मक ब्रम्हाला स्वात्मत्वे करून अपरोक्षानुभवाने जाणतो-सम
हात्मा-म्हणजे असा जो ब्रम्हभूत ज्ञानी तो सुदुर्लभ म्हणजे फार दुर्लभ आहे। एथें-बहूनां जन्मनामंते-येणे करून पूर्वोक्त अ
परोक्ष ब्रम्हात्म तत्वज्ञान होण्यास जो प्रतिबंध आहे तो नाश पावला म्हणजे पूर्वोक्त ज्ञानवान् होतो इतकेंच विवक्षित आहे
। मुमुक्षा उत्पन्न होऊन भगवद्भक्ति आत्मविचार इत्यादिक करण्यास प्रवृत्त जे झाले त्या सर्वांस हीच बहुत जन्माचे अंतीं अ
परोक्ष आत्मतत्व ज्ञान होते असें विवक्षित नाही। याविषयी निश्चय होण्यासाठीं विचार लिहितो। ब्रम्हात्म तत्वज्ञान-परो
क्ष आणि अपरोक्ष किंवा अपरोक्षानुभवात्मक या भेदाने दोन प्रकारचें आहे। त्यांतील परोक्ष ज्ञान होण्यास वेद शास्त्र गुरुयां

बहूनां जन्मनामंते ज्ञानवान् मां प्रपद्यते ॥ वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ १९॥

चे वाक्यावर अश्रद्धा म्हणजे अविश्वास प्रतिबंधक आहे तिचा नाश होऊन श्रद्धा उत्पन्न झाली म्हणजे आत्मा सच्चिदा
नंदात्मक-अद्वितीय ब्रम्हस्वरूप आहे अशा उपदेश वाक्यापासून आत्मतत्वाचें परोक्ष ज्ञान म्हणजे मांगितलेप्रमाणें
आत्मतत्व आहे असा निश्चय होतो। पूर्वोक्त आत्मतत्वाचा आत्मत्वे करून ब्रम्ह साक्षात्काररूप अपरोक्ष ज्ञान उत्पन्न होण्या
स अविचार म्हणजे विचार न करणें प्रतिबंधक आहे यास्तव वेदांतश्रवण मननादिक विचार करावा म्हणजे अविचाररूप
प्रतिबंधकाचा नाश होऊन महावाक्यापासून विचाराचे साहाय्याने आत्मतत्वाचे अपरोक्ष ज्ञान उत्पन्न होतें। महावाक्यांती
ल तत्पदार्थ जो ईश्वर जीव यांचा वेद्यत वाक्याने विचार केला तरी ब्रम्ह आणि आत्मा यांचे ऐक्याचा साक्षात्कार महा-
वाक्यापासून जर न होईल तर पुनः पुनः अपरोक्ष ज्ञान होई तोपर्यंत विचार करावा। कारण अपरोक्ष ज्ञानास विचारावांचू
न दुसरें कारण नाही। कारण जो अनुष्ठानाचा विधि अदृष्टार्थच आहे म्हणजे पुण्यार्थच आहे त्याचे एकवार अनुष्ठान पुर

ते। असें पुरोडाशार्थ व्रीहीच प्रोक्षण करावें असें जें विधीनें सांगितलें तें एकवार ही केलें तरी अदृष्ट उत्पन्न होतें यासाठी त्याची आवृत्ति म्हणजे वारंवार अनुष्ठान नको परंतु जो अनुष्ठानाचा विविदिषार्थ म्हणजे प्रत्यक्ष जें फल त्यासाठी आहे त्याचें अनुष्ठान तें फल होई तोंपावेतों वारंवार केलें पाहिजे। जसें विधीनें सांगितलेलें व्रीहीचें अवहनन म्हणजे कांडणें तें एकवार केलें असतां व्रीहीवरील कोंडा जाऊन पुरोडाशास उपयोगी चांगले स्वच्छ तांदुळाची निष्पत्ति होत नाहीं यासाठीं कोंडा जाऊन शुद्ध तांदूळ निष्पन्न होत तों पर्यंत व्रीहींचें कंडण केलें पाहिजे। तसा वेदांत विचार अपरोक्ष ज्ञान होऊन अज्ञान निवृत्ति होणें हें दृष्ट फल होई तोपर्यंत केला पाहिजे। उतएवश्वेतकेतु लाउद्दालकानें - तूं ब्रम्ह आहेस - अशा अर्थाच्या महावाक्यानें नऊ वेळ उपदेश केला असे छांदोग्योपनिषदांत लिहिलें आहे असें श्रीवेदव्यासानीं ब्रम्हसूत्रांत सांगितलें आहे। याप्रमाणें मरण पर्यंत विचार केला तरी प्रतिबंधामुळें जर आत्मतत्वाचें अपरोक्ष ज्ञान न होईल तर प्रतिबंधाचा नाश झाला म्हणजे जन्मांतरी पूर्वीं केलेल्या विचाराचे संस्कारानें अपरोक्षात्मतत्व साक्षात्कार होतो असे प्रतिबंध नसला तर याच जन्मीं विचारापासून आत्मविद्या म्हणजे अपरोक्षात्मतत्व ज्ञान होतें आणि प्रतिबंध असला तर जन्मांतरीं होतें - अशा अर्थाच्या सूत्रांनी वेदव्यासानी सांगितलें आहे आणि श्रवण करणारे हा बहुत अपरोक्ष लेंकरून ब्रम्हात्मतत्व जाणत नाहींत असें श्रुतींत ही सांगितलें आहे आणि वामदेव नामक ऋषीनीं वेदांत विचार केला असतां ही प्रतिबंधामुळें त्यांस त्या देहांत आत्मतत्व साक्षात्कार न होऊन दुसरा देह प्राप्त झाला तेव्हां त्यास गर्भांत असतांच आत्मत्वें करून ब्रम्हसाक्षात्कार झाला अशा अर्थाचा वेदांत मंत्र आहे। कृषीस आरंभ केल्यापासून काही कालानेंच तें कर्मफलास येतें तसाच गर्भाधानापासून कांहीं कालानेंच गर्भाचा परिपाक होऊन त्यास चैतन्य उत्पन्न होतें। तसा आत्मविचार ही शनैः शनैः म्हणजे कालें करून परिपक्व होऊन फलास येतो म्हणुन तत्कालच फलद्रूप होत नाही। पुन: पुन: विचार केला तरी त्यास त्रिविध जो प्रतिबंध आहे त्याचा नाश झाल्याशिवाय त्यापासून आत्मतत्व साक्षात्कार होत नाहीं असें सुरेश्वराचार्यांनी वार्तिकांत सांगितलें आहे।

तो प्रतिबंध - भूत - वर्तमान आणि भावी असा तीन प्रकारचा आहे। भूतप्रतिबंधाचें उदाहरण लौकिक गाथेने ग्रंथांतरीं लिहिलें आहे तें
लिहितो। कोणीएक संन्यासी संन्यासापूर्वी गृहस्थाश्रमी असतां त्याचा एका महिषीवर बहुत स्नेह झाला होता नंतर सन्यास कर
न वेदांतश्रवणार्थ प्रवृत्त झाला तरी त्यापूर्वीच्या महिषीचे ठाईं झालेल्या स्नेहाने तिचे वार वार स्मरण होऊन गुरूनें उपदेश केलेले
आत्मतत्वाचें त्यास अपरोक्ष ज्ञान झाले नाही। नंतर गुरूने तो प्रतिबंध जाणून महिषीतील आत्मस्वरूपाचा उपदेश केला तेव्हां त्या
चें चिंतन करीत असतां महिषी हा उपाधि सुटून त्यास केवळ आत्मतत्वाचें चिंतन होऊं लागलें यामुळे तो स्नेहरूप प्रतिबंधना
शपावून त्या संन्याशास आत्मतत्वाचा साक्षात्कार झाला॥ चित्ताची विषयभोगाकडे आसक्ति - प्रज्ञा म्हणजे बुद्धीचें मंदत्व - कु
तर्क म्हणजे कुतर्कानें वेदवाक्याचे विपरीत अर्थ करणे - विपर्यय म्हणजे आत्मा कर्ता - भोक्ता - आहे किंवा ईश्वराहून परमार्थतः
भिन्न आहे असा दुसरा ग्रह - हें वर्तमान प्रतिबंध। यांच्या श्रवणादिकांच्या आवृत्ति भगवद्भक्ति शमदमादिक इत्यादिकांनीं ना
श झाला म्हणजे अपरोक्ष आत्मतत्व साक्षात्कार होतो॥ जन्मांतर झालेच पाहिजे असा जो प्रारब्धकर्मरूप प्रतिबंध तो भावी प्रतिबं
ध। हा पूर्वोक्त वामदेवाचे दृष्टांताने जाणावा। तो वामदेवाचा एका जन्मानें च नाश पावून त्यास अपरोक्षात्मतत्व ज्ञान झालें। भरता
स विचार केला असतांही अपरोक्ष ज्ञान होण्यासाठी त्या प्रतिबंधाच्या नाशार्थ तीन जन्म घ्यावे लागले नंतर तो नाश पावला अशी पुरा
णात कथा आहे। जो योगभ्रष्ट झाला त्यास बहुत जन्म गेल्यावर प्रतिबंधाचा नाश होऊन ब्रम्हात्मतत्व साक्षात्कार होऊन तो मुक्त
होतो असे - प्राप्य पुण्यकृतां लोकान् - इत्यादि श्लोकांनी गीतेंत च सांगितले आहे। ब्रम्हलोकाची प्राप्ति व्हावी अशी इच्छा ध
रून जे वेदांत श्रवणादिक करतात त्यांस या लोकीं आत्मतत्व साक्षात्कार न होऊन ते ब्रम्हलोकीं जातात नंतर त्यास तेथे आ
त्मतत्व साक्षात्कार होऊन ब्रम्हदेवाचे प्रलयकाळी ते ब्रम्हदेवाबरोबर मुक्त होतात असे वेदांत सांगितलें आहे। यास्तव शा
स्त्रार्थाचे विचारावरून ब्रम्हात्मतत्व साक्षात्कारास जे त्रिविध पूर्वोक्त प्रतिबंध आहेत त्यांचा नाश झाला म्हणजे वेदांत श्रव
णादिक विचार आणि भगवद्भक्तीनें झालेला भगवत्प्रसाद याही करून आत्मतत्व साक्षात्कार होऊन मुक्ति होते इतका अर्थ

–बहूनाजन्मनामंते ज्ञानवान् भावति तदनंतरं मांप्रपद्यते– एणेकरून विवक्षित आहे असें सिद्ध झालें ॥१९॥ चारप्रकारचें भजनकरण्यांत ज्ञान्याशिवाय दुसऱ्यांस सर्व वासुदेवच आहे असे माझे परमेश्वराचें ज्ञान होण्यास कारण सांगतात ॥ तैस्तैः कामैः म्हणजे द्रव्यपुत्र पशु स्वर्ग इत्यादिकांविषयींच्या ज्या इच्छा त्यांहींकरून हृतज्ञानाः म्हणजे नष्ट झालें आहे विवेकज्ञान ज्यांचें असें आणि–स्वया प्रकृत्या नियताः–म्हणजे आपली जीजन्मांतरार्जित कर्मसंस्काररूप पुढें सांगावयाची दैवी आणि आसुरी प्रकृति तीणें आपलें स्वाधीन केलेले असे अज्ञानी–तंतं नियमं आस्थाय–म्हणजे त्यात्या इंद्रादिक देवतांचें आराधन करण्याचें विधींत जेजे चतुर्दश्युपवासादिक नियम प्रसिद्ध आहेत त्यांचा स्वीकार करून–अन्यदेवताः प्रपद्यंते–म्हणजे सर्वात्मभूत वासुदेवाहून अन्यदेवतांप्रत यादेवतेपासून हे फल मी पावेन या कामनेनें भजतात ॥ २०॥ योयो भक्तः यांयां तनुं श्रद्धया अर्चितुमिच्छति म्हणजे जोजो सात्विक

कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाःप्रपद्यंतेन्यदेवताः॥ तंतं नियममास्थाय प्रकृत्यानियताःस्वया ॥ २०॥
योयो यांयां तनुं भक्तःश्रद्धयार्चितुमिच्छति॥ तस्यतस्याचलांश्रद्धां तामेव विदधाम्यहं॥ २१॥
सतयाश्रद्धयायुक्तस्तस्याराधनमीहते॥ लभतेच ततःकामान् मयैव विहितान् हितान्॥ २२॥

क किंवा राजस किंवा तामस भक्त ज्याज्या शरीराचे देव यक्ष राक्षस पिशाचादिक देवतेप्रत श्रद्धेकरून पूजावयास इच्छितो तस्य तस्य म्हणजे त्यासत्यास तामेव अचलां श्रद्धां म्हणजे त्याचत्याच सात्विकी किंवा राजसी किंवा तामसी स्थिरश्रद्धेप्रत विदधामि म्हणजे मी उत्पन्न करतों ॥ २१॥ सः तया श्रद्धया युक्तः सन्–म्हणजे तदनंतर तोतो भक्त त्याश्रद्धेने युक्त होत्साता–तस्याः आराधनं ईहते म्हणजे त्यात्या मूर्तीचे देवतेचें आराधन पूजनादिक करण्यास इच्छितो आणि ततः मयैव विहितान् हितान् कामान् लभते च म्हणजे तो त्यात्या देवतेला मीच आज्ञा करून त्यात्या देवतेपासून देवविलेले जे पूर्वोक्त द्रव्यपुत्रादिक इच्छितविषय त्यांप्रत पावतो। एणेकरून सर्व देवता आपले परमेश्वराचे आज्ञेत आहेत असें किंवा सर्वांतर्यामी मी परमेश्वर सर्व देवतास काम देण्या विषयीं

सर्व देवता माझेच अंश आहेत यामुळे त्याचे आराधनानें त्यांचा अंतर्यामी जो मी त्याचेंच आराधन होते। त्या आराधनाचाही त्यांकडून किंवा त्या देवतांचे स्वरूपानें फल देवविणारा किंवा देणारा मीच आहे तथापि साक्षात् माझे भक्त आणि मदंशभूत दुसऱ्या देवतांचे भक्त यांच्या फलांत वैलक्षण्य आहे असें सांगतात॥ अल्पमेधसां तेषां तत् फलं अंतवद्भवति - म्हणजे अल्प म्हणजे परिच्छिन्न किंवा परिमित आहे बुद्धि ज्यांची किंवा अल्पस्फुरण करणारे जे पुत्र पशु इत्यादिक त्यांचे ठाई आहे सुख साधन बुद्धि ज्यांची असे जे ते अन्यदेवताभक्त। त्यांस त्यापासून प्राप्त झालेले जे द्रव्य पुत्रादिक फल तें नाशवंत आहे। माझे भक्तांस होणारें ब्रम्हप्राप्तिरूप फल नाशवंत नाही। कारण सांगतात। देवयजो देवान् याति म्हणजे मदंशभूत अंतवत ज्या देवता त्यांचे यजन करणारे त्या देवतांप्रत पावतात। अपि म्हणजे अंतवत जे यक्षराक्षसपिशाच त्यांचे यजन करणारे यक्षराक्षसादिकांप्रत जातात। मद्भक्ता मां यांति - म्हणजे माझे जे भक्त ते नाशरहित जो मी त्याप्रतच येतात॥ २३॥ असे जर फलांत तारतम्य आहे तर सर्व मोठे फलासाठी तुझाचकां भजत नाहीत अशी शंका होईल तर त्याविषयी सांगतात। अव्यक्तं मां सर्वोपाधिरहित यामुळे इंद्रियादिकांस अगोचर असा जो मी त्यास मम अव्ययं अनुत्तम - परं भावं अजानंतः म्हणजे माझे जे नाशरहित आणि ज्याहून दुसरें उत्तम नाही असे उत्कृष्ट तत्त्वस्वरूप त्याप्रत न जाणत होत्सात्यां तो - व्यक्तिमापन्नं मां मन्यते - म्हणजे इतर जीवाप्रमाणें चालक देव शरीरानें उत्पन्न झालेला आणि देहाभिमानी आहे असे मला मानितात॥ २४॥

अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसां॥ देवान्देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि॥ २३॥
अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यंते मामबुद्धयः॥ परं भावमजानंतो ममाव्ययमनुत्तमं॥ २४॥ ॥

तुझ्या वास्तविक स्वरूपाचें ज्ञान लोकांस कां नाहीं असें म्हणेल तर त्याविषयी सांगतात॥ हे योग म्हणजे हे योगिन् अर्जुना-अर्थादिक
स्तव अन्य प्रत्यय करून योग ज्यास आहे तो योगी असा योगशब्दाचा अर्थ होतो। योगमायासमावृतः असें एकच पद कोणी करतात
योग म्हणजे सत्वरजतमोगुणाचें जें घटन म्हणजे एकमेकांत मेळून तीच जी माया म्हणजे त्रिगुणात्मक माया अथवा भगवंताचा चित्तसं
धि योग त्याणें केलेली जी माया म्हणजे भगवंताचे संकल्पास अनुसरणारी जी योगमाया तिणें समावृत म्हणजे आच्छादित जो तत्वार्थ मी
तो सर्वस्य म्हणजे संपदार्थ मानास आणणारा जो सर्व जीवसमुदाय त्यास-प्रकाशन म्हणजे प्रत्यक्ष नाहीं। अयं मूढः लोकः अजं अव्य
यं मां नाभिजानाति म्हणजे हा अज्ञानी जीवसमुदाय उत्पत्तिरहित आणि नाशरहित असा जो मी त्या प्रत जाणत नाहीं॥ २५॥ यो
गमाया माझे स्वाधीन आहे यामुळें मायी जो मी याचे ज्ञानाचा प्रतिबंध तिचे कडून होत नाहीं। जसा लौकिक इंद्रजाल विद्या करणा

नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः॥ मूढोयं नाभिजानाति लोको मामजमव्ययं॥ २५॥
वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन॥ भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन॥ २६॥ ॥

रा आपले मायेनें लोकांस मोहित करतो परंतु ती माया त्याचे स्वाधीन आहे यामुळें त्याचे ज्ञानाचा प्रतिबंध करण्यास तीस मुर्थ
होत नाहीं। त्याप्रमाणें-असें सांगतात॥ जीवसमुदाय आणि मी वस्तुतः एकच असतां ही मायारूप उपाधीनें जीव आणि ईश्वर अ
सा विभाग केला आहे त्यामुळें उपाधीचे जे धर्म त्यांवर अभिमान ठेवल्यामुळें जीव मूढ आहेत। मला अभिमान नाहीं यामुळें स
र्वज्ञ मी-समतीतानि-म्हणजे उत्पन्न होऊन नाश पावलेली-वर्तमानानि-म्हणजे वर्तमान कालीं ज्यांची स्थिति आहे ती आ
णि भविष्याणि म्हणजे पुढें उत्पन्न होणारीं अशा सर्व भूतां प्रत मी जाणतो। मां तु कश्चन-न वेद-परंतु त्या भूतांतील कोणी
मला जाणत नाहीं॥ २६॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥ श्रीनारायणार्पणमस्तु॥ ॥

परमात्मा जो ईश्वर त्याचे स्वरूपाविषयीं वें अज्ञान जीवास जन्मण्याचे कारण सांगतात॥ जे आपणास अनुकूल करुप किंवा करणारें साधन त्याविषयींची जी इच्छा आणि जें आपणास प्रतिकूल दुःख किंवा दुःखास साधन त्याविषयींचा जो द्वेष-यापासून उत्पन्न झालेला जो द्वंद्व मोह म्हणजे शोभन-अशोभन-सत्य असत्य-नित्य अनित्य-आत्मा अनात्मा-अशीं जीं द्वंद्वे यांचे ठायी मोह म्हणजे रक्त मांसादिक अशुद्ध पदार्थांनीं उत्पन्न केलेले अशोभन स्त्र्यादिकांवर शोभन अशी बुद्धि आणि शोभनावर अशोभन बुद्धि असत्य म्हणजे मिथ्या जो प्रपंच त्यावर सत्यत्व बुद्धि आणि सत्य आणि देहान्य अशा आत्म्यावर मिथ्यात्व बुद्धि-अनित्य स्वर्गादिकांवर नित्यत्व बुद्धि आणि अनात्मा जो देहादिक त्यावर आत्मत्व बुद्धि असा विपरीत ज्ञानात्मक भ्रम तेणें करून हे भरत कुलोत्पन्ना हे शत्रूंस ताप देणाऱ्या अर्जुना-सर्वभूतानि म्हणजे सर्व जीव-सर्गे-म्हणजे सृष्टींतील पदार्थांविषयी-संमोहं यांति-म्हणजे पूर्वोक्त मोहाप्रत पावतात।

इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत॥ सर्वभूतानि संमोहं सर्गे यांति परंतप॥ २७॥
येषां त्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणां॥ ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजंते मां दृढव्रताः॥ २८॥

तात्पर्य। जो सृष्टीचें उपादान कारण आणि सृष्टीचे स्वरूप तत्वतः जाणतो तो ब्रह्मवेत्ता ब्रह्मस्वरूपानें सर्व जाणतो। आणि सृष्टीचें स्वरूप विषयीं पूर्वोक्त विपरीत ज्ञान आहे त्यांस प्रतिबंधामुळें सर्व भूतांचे किंवा त्याचे उपादान कारण जें परमात्म स्वरूप त्याचें ज्ञान होत नाहीं॥ इच्छा आणि द्वेष यापासून उत्पन्न झालेला जो द्वंद्व मोह म्हणजे शीतोष्ण सुखदुःखरूप जीं द्वंद्वे त्याप्रमाणें परस्पर विरुद्ध जे पूर्वोक्त इच्छा आणि द्वेष तद्रूप मोह तेणें करून सर्व भूतें-सर्गे-म्हणजे उत्पत्ति काळीच मोहाप्रत पावतात म्हणजे मोहाचे वश होऊन मोहित असतांच उत्पन्न होतात। यामुळें सर्वभूतें अतीतादि सर्व भूताप्रत किंवा सर्व भूतांचा अधिष्ठान भूत जो मी त्याप्रत जाणत नाहींत असा ही याचा अर्थ आहे॥ २७॥ येषां पुण्यकर्मणां जनानां-म्हणजे पुण्य करणाऱ्या ज्या जीवांचे-पापं अंतगतं-म्हणजे पाप नाशाप्रत पावलें आहे ते-द्वंद्वमोहनिर्मुक्ताः-म्हणजे पूर्वोक्त द्वंद्व मोहानें रहित आणि-दृढव्रत-म्हणजे शमदमादि साधनयुक्त होत्साते-मां भजंते-म्हणजे मज भजतात॥ २८॥ ॥

जरामरण मोक्षाय-म्हणजे जरा म्हणजे वृद्धपणेने जन्म आणि मरण यांचा प्रवाहरूप जो संसार त्यापासून आत्म्याचा मोक्ष व्हावा यासाठीं-
मां आश्रित्य -म्हणजे माझेठाईं चित्ताचे स्थापन करून ये यतति-म्हणजे आत्मतत्व ज्ञाना साठीं वेदांत श्रवणा दिक विषयीं जे यत्न कर-
ताततें- तद्ब्रम्ह विदु: -म्हणजे सर्व वेदांत प्रसिद्ध जें तें ब्रम्ह त्याप्रत स्वात्मत्वे करून जाणतात आणि कृत्स्नं अध्यात्मं विदु. म्हणजे सर्व
अध्यात्म म्हणजे शरीराचे ठाईं स्थित जें त्वंपद वाच्य आत्म वस्तु त्याप्रत जाणतात आणि अखिलं कर्मच विदु म्हणजे तत्व पदार्थ ज्ञाना-
चें साधनभूत जे श्रवण मनादिक तें सर्व जाणतात। अथवा कृत्स्नं ब्रम्हविदु: म्हणजे विराट् पुरुष सूत्रात्मा दिकाची उपासना करणा-
रे ब्रम्ह जाणतात परंतु स्थूल सूक्ष्म समष्टि शरीरोपाधि युक्त रूपानें जाणतात म्हणून ते कृत्स्न म्हणजे सर्व ब्रम्ह जाणत नाहींत। मा
झे वासुदेवाचे भक्त तर त्या शरीराहून भिन्न आणि त्याशरीराहून अतीत असा एक ब्रम्ह स्वरूपाप्रत जाणतात -या स्तव ते कृत्स्न
ब्रम्ह जाणतात। अशी योजना करावी॥ एणेंकरून त्या ब्रम्हाचे ज्ञान झालें म्हणजे कांहीं जाणावयाचे शेष राहत नाहीं असें जे-एक ब्र

जरा मरण मोक्षाय मामाश्रित्य यतंति ये॥ ते ब्रम्ह तद्विदु: कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलं॥ २९॥

साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदु:॥ प्रयाणकालेपि च मां ते विदुर्युक्तचेतस:॥ ३०॥ ॥

म्ह ज्ञानानें सर्व ज्ञान होतें असें सांगण्यास आरंभिलें होतें त्याची समाप्ति केली॥ २९॥ याप्रमाणें तात्काल मुक्तीस साधनभूत तत्पदा
र्थाचा विवेक म्हणजे विचार सांगून त्याची समाप्ति करून ज्यांपासून कर्मे करून मुक्ति रूप फल प्राप्त होते अशी तत्पदार्थ ईश्वराचे-
प्राप्तीची साधनें भूत जीं उपासनादिक ती सविस्तर सांगावी अशा इच्छेने त्याचें प्रथमत. संक्षेपे करून कथन करतात॥ साधिभूताधिदैव
मां - म्हणजे अधिभूत-अधिदैव आणि अधियज्ञ यांची स्वरूपे अर्जुनाचे प्रश्नाचे उत्तरांत पुढील अध्यायांत श्रीकृष्ण भगवान् सां
गतील -अधिभूत आणि अधिदैव याहींकरून युक्त आणि साधियज्ञंच विदु म्हणजे अधियज्ञानें युक्त जो मी याची जे उपासना
करतात-विदु एथील धातु ज्ञानाप्रमाणें उपासनेचाही वाचक आहे -ते युक्तचेतस. म्हणजे माझेठाईं ज्यांणीं चित्ताची योजना केली
आहे असे होत्साते-प्रयाण कालेपि मां विदु:-म्हणजे वेळेस सर्व मोह पावतात असा मरण समई ही ते मला जाणतात॥ या सांगी

भगवताचे ठाई निरंतर भावना करावी असे तात्पर्य॥ ३०॥ इतिश्री मद्भगवद्गीताया रघुनाथ शास्त्रि कृत भाषाविवृतौ सप्तमो-
ध्यायः समाप्तः॥ ७॥ पूर्वाध्यायी मायोपाधिक ब्रम्ह सर्व जगाचे उत्पत्ति स्थिति लयास कारण आहे असें सांगितलें। तें उत्तमाधि
काऱ्यांस उपाधि स्वरूप लक्षणाचे द्वाराने उपाधि सोडून निरुपाधिक सच्चिदानदात्मस्वरूपाने ज्ञेय आहे आणि उपाधि सहित प
रमेश्वर स्वरूपाने उपास्य आहे या प्रमाणे मानून ज्ञेय ब्रम्हस्वरूपाविषयी एक आणि उपास्य ब्रम्हस्वरूपाविषयीं साहा असेस
त प्रश्न अर्जुन करणार त्याचे सात विषय - ते ब्रम्ह तद्विदुः कृत्स्न - इत्यादिक दीड श्लोकानें भगवंतानीं सूत्रभूत सूचविलें त्या
वरून त्याविषयींचे प्रश्न अर्जुनानें केले आहेत। त्यासूत्रभूत भगवंताचे वाक्याचे व्याख्यान रूप या अध्यायाचा आरंभ करता

इतिश्री मद्भगवद्गीता सूपनिषत्सु ब्रम्हविद्यायां योग शास्त्रे श्रीकृष्णा
र्जुन संवादे ज्ञानविज्ञान योगोनाम सप्तमोध्यायः समाप्त.॥७॥ ७॥
अर्जुन उवाच॥ किंतद्ब्रम्ह किमध्यात्मं किंकर्म पुरुषोत्तम॥ अधि
भूतंच किंप्रोक्त मधिदैवं किमुच्यते॥१॥ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥

त॥ अर्जुन उवाच - पूर्वाध्यायांतील पूर्वोक्त दीड श्लोकांतील सूत्रभूत जे ब्रम्हादि शब्द त्याच्या अर्थाचा चांगला स्पष्ट बोध
होण्याचे इच्छेनें अर्जुन प्रश्न करतो॥ हे पुरुषोत्तमा पुरुषश्रेष्ठा कृष्णा - तद्ब्रम्ह किं - म्हणजे ते ज्ञेय कृत्स्न ब्रम्ह कोणतें आणि
अकृत्स्न सोपाधिक उपास्य परमेश्वर रूप ब्रम्ह कोणतें - असे हे ब्रम्ह शब्दानें सोपाधिक आणि निरुपाधिक ब्रम्हस्वरूपाविषयी दोन
प्रश्न - किं अध्यात्मं - म्हणजे अध्यात्म ते कोणते। किं कर्म - म्हणजे कर्म तें कोणते। चपरं अधिभूत किंप्रोक्तं - म्हणजे अधि-
भूत म्हणून जें सांगितलें तें कोणतें। अधिभूतं किमुच्यते - आणि अधिदैव कोणास म्हणतात॥१॥ श्रीकृष्णार्पणमस्तु
॥ श्री नारायणार्पणमस्तु॥ ॥ ७॥ ॥ ॥ ७॥ ॥ ॥ ७॥ ॥

अत्र देहे अधियज्ञ. कः-म्हणजे या देहाचे ठाईं यज्ञाचा प्रवर्तक किंवा यज्ञाचें फळ देणारा अधियज्ञ तो कोण आहे। हा अधियज्ञाचे स्वरूपाविषयीं प्रश्न। कथं-म्हणजे तो कसा जाणावा। ह्या त्या अधियज्ञाची उपासना कशी करावी याविषयींचा प्रश्न हे दोन्ही प्रश्न मिळून एकच प्रश्न। अध्यात्म अधिदैव इत्यादिकांचे स्वरूपाविषयींचे प्रश्नावरून अधियज्ञादि उपाधीनें युक्त जें उपास्य सगुण ईश्वराचें स्वरूप त्याविषयींचे प्रश्न अर्थातसिद्ध झाले। हे मधुसूदना म्हणजे हे मधुदैत्यास मारणाऱ्या कृष्णा। नियतात्मभिः प्रयाणकाले कथं ज्ञेयः असि-म्हणजे ज्यांणीं चित्त स्वाधीन केले आहे ते मरणकाळीं तुला कसें जाणतात॥ २॥ या प्रश्नांचीं उत्तरें क्रमें करून तीन श्लोकांनी श्रीकृष्ण भगवान् सांगतात॥ ज्ञेय ब्रम्ह कोणतें असा जो प्रश्न केला त्याचे उत्तर प्रथम सांगतात॥ परमं अक्षरं ब्रम्ह-म्हणजे परम जें अक्षर तें ब्रम्ह। अक्षर असें लोकांत वर्णास म्हणतात आणि प्रणवरूप जें एकाक्षर त्यासही श्रुतिस्मृतींत ब्रम्ह असे म्हटलें आहे तें ब्रम्ह अशी शंका होईल ती नव्हावी यासाठीं-परम-हें अक्षराचें वि

अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन् मधुसूदन॥ प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः॥ २॥ श्रीभगवानुवाच॥ अक्षरं ब्रम्ह परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते॥ भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः॥ ३॥ ॐ॥

शेषण केलें। यावरून- अक्षरापासून सर्व जगाची उत्पत्ति सांगून तें अक्षर कोणतें अशी शंका झाली तर तिचें निराकरण करण्यासाठीं-हे गार्गि जें स्थूल नव्हे-जें अणु नव्हे-जें ह्रस्व नव्हे-जें दीर्घ नव्हे-असें जें जगास कारण भूत वस्तु त्यास ब्रम्हवेत्ते अक्षर असें म्हणतात असें उपनिषदांत सांगितलें आहे असें जें अक्षर तें ब्रम्ह असा अर्थ निष्पन्न होतो॥ प्रणवरूप अक्षर तसें नाहीं म्हणून तें ब्रम्ह नव्हे असें ह्याची व्यावृत्ति झाली॥ अथवा। द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च॥ क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते-या पंधराव्या अध्यायांतील श्लोकांत आणि प्रधानास अक्षर म्हणावें-अमृत जो जीव त्यास अक्षर म्हणावें-असें श्रुतींत सांगितले आहे यावरून-अक्षर असें जीवाचें हीनाम आहे तेव्हां अक्षर ब्रम्ह असें म्हटले तर जीव ब्रम्ह म्हणजे मायोपाधिक जगाचे उत्पत्ति स्थिति लयास कारण भूत सर्वज्ञत्वादिक गुणयुक्त पूर्वाध्यायीं सांगितलेले सोपाधिक ब्रम्ह असा अर्थ होईल तो विरुद्ध आहे

जीवास पूर्वोक्त सोपाधिक ब्रम्हरूपता संभवत नाहीं। सोपाधिक जीव आणि ईश्वर याचा भेद उपाधिनिमित्तक आहे यासाठी परम हें अक्ष
राचें विशेषण केलें। तेणेकरून जें जीवाख्य अक्षर तें परम म्हणजे निरुपाधिक ब्रम्ह असा अर्थ होतो तो विरुद्ध नाहीं॥ वेदांतींतील महाव
क्यानीं महावाक्यांतील त्वंपदाचा जो विवक्षित निरुपाधिक जीवात्मा त्यास तत्पदाचा जो विवक्षित निरुपाधिक परब्रम्हरूपार्थ तद्रूप
ता स्पष्ट सांगितलीच आहे। तो वयेथें जीव ब्रम्हैक्य रूप महावाक्यार्थ सांगितला। किं तद्ब्रम्ह-या प्रश्नवाक्यांनि परम ब्रम्ह कोणतें असें ज
री पुसलें नाहीं तथापि पूर्वाध्यायांतील सूत्रभूत वाक्यांत-तद्ब्रम्ह तद्विदुः कृत्स्नं-असें म्हटलें आहे त्यावरून-किं तद्ब्रम्ह-असा प्र
श्न केला त्यावरून या प्रश्नांतील ब्रम्हपदानें तें कृत्स्न म्हणजे परब्रम्ह कोणतें असा प्रश्न निष्पन्न झाला त्याचें उत्तर-अक्षरं परब्रम्ह
-असें सांगितलें यास्तव प्रश्न आणि उत्तरें दोन्ही एकाविषयींचीच सिद्ध झालीं अशी अर्थाची योजना करावी। आतां अध्यात्म को
णतें या प्रश्नाचें उत्तर सांगतात। स्वभावः अध्यात्म उच्यते-म्हणजे ब्रम्ह आपला जो अंश भूत जीव त्याचें जे सर्व देहांचे वाईं कर्त्ते भोक्तृ
स्वरूप तेणेकरून स्थित झालें असतां त्यासच अध्यात्म असें म्हणतात। स्व स्य म्हणजे आपला जो भाव म्हणजे कृत्दे भोक्त स्वरू
पानें स्थिति होणें-असा स्वभाव शब्दाचा अर्थ केला म्हणजे पूर्वोक्त अर्थ होतो। आतां कर्म कोणतें या प्रश्नाचें उत्तर सांगतात।
भूतभावोद्भवकरः विसर्गः कर्म संज्ञितः। जरायुज-अंडज-स्वेदज-उद्भिज-या भेदानें चार प्रकारचे जे प्राणी ती भूतें। त्यांचा
भाव म्हणजे उत्पत्ति आणि उद्भव म्हणजे-आदित्यापासून वृष्टि होते-वृष्टिपासून अन्न होतें-अन्नापासून प्रजा होतात
या क्रमें करून होणारी प्राण्यांची वृद्धि ती प्रत करणारा जो विसर्ग म्हणजे देवतांचे उद्देशानें अग्नि आदिकांत केलेला हविरा
दिकांचा त्याग त्यास कर्म अशी संज्ञा आहे। उत्पत्तिसमयीं ज्यांचे शरीरास जरेचें वेष्टन असतें ते जरायुज म्हणजे मनुष्या
दिक। जरेस जार असें लोकांत म्हणतात। ज्यांचे शरीराची उत्पत्ति अंडांत होते आणि अंड फुटलें म्हणजे शरीर बाहेर व्य
क्त होतें ते अंडज म्हणजे पक्षि सर्प इत्यादिक। ज्यांची शरीरें घर्मापासून उत्पन्न होतात ते स्वेदज म्हणजे कृमि-दंश-मत्कु
ण इत्यादिक। जे भूमीचा भेद करून ऊर्ध्वभागीं वाढतात ते उद्भिज म्हणजे वृक्ष-लता-गुल्म इत्यादिक। असे हे प्राण्यांचे भेद जाण
वे॥ ३॥

आता अधिभूत तें कोण अशा प्रश्नाचें उत्तर सांगतात। क्षरो भावः अधिभूतं - नाशाप वणारे जें सर्व प्राण्याचें कर्म फल भूत देहेंद्रियादि
क वस्तुमात्र उत्पन्न होणारें तें अधिभूत। हें सर्व प्राण्यांस कर्मफळाचा उपभोग देणारें आहे म्हणून यास अधिभूत अशी संज्ञा आहे। आ
तां अधिदैव कोणास म्हणतात याप्रश्नाचें उत्तर सांगतात। पुरुषः अधिदैवतं - आणि ज्याणें हें सर्व जग व्यापलें आहे किंवा
सर्व शरीररूप पुरींत जो शयन करतो असा जो सर्व इंद्रियांस आपआपली कार्यें श्रवण दर्शनादिक करण्याविषयीं अनुग्रह करतो किंवा
शक्ति देतो असा जो सूर्य मंडळांतरा रहाणारा सकल देवतांचा आत्मा हिरण्यगर्भ त्यास अधिदैवत म्हणावें। सर्व देवता ज्याच्या अंशभूत
आहेत म्हणून यास अधिदैवत अशी संज्ञा आहे। यास प्रमाण - तोच हिरण्यगर्भ त्यास ब्रम्हा असेंही म्हणतात तो प्रथम शरीरी अ
हे त्यास पुरुष ही म्हणतात। आणि सर्व भूतांचा अधिपति - आदिकर्ता तो आहे या अर्थाची श्रुति आहे। आतां या देहाचे ठाईं अधिय
ज्ञ तो कोण या प्रश्नाचें उत्तर सांगतात। हे देहभृतांवर - अत्र अधियज्ञः अहमेव - म्हणजे हे देह धारण करणाऱ्यांत श्रेष्ठा अर्जुना।

अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतं॥ अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतांवर ॥ ४॥

यज्ञ विष्णुच आहे या अर्थाच्या श्रुतीवरून यज्ञाभिमानिनी यज्ञप्रवर्तक किंवा यज्ञाचें फल देणारी विष्णवाख्य देवता या शरी
राचे ठाईं मीच आहें। येणेंकरून परमेश्वराची या देहांत जसी कर्ते भोक्ते जीवस्वरूपानें स्थिति आहे तशी सर्व कर्म प्रवर्तक
सर्व कर्म फल दाता अंतर्यामि स्वरूपानें ही स्थिति आहे असें कळविलें। यास प्रमाण। या देहरूप वृक्षास जीव आणि ईश्वर एतद्रू
प दोन पक्षी अधिष्ठून राहतात आणि एक जीव कर्म करून त्याचें ईश्वरास समर्पण करून संतोषाप्रत पाववितो। एक ईश्वर जीवानें केले
ले कर्माचें फल त्यास देऊन संतोषाप्रत पाववितो। याप्रमाणें परस्परास संतोष पाववणारे ते परस्पराचे सखे म्हणजे मित्र आहेत।
त्यांतील एक जीव केलेल्या कर्माच्या फळाचा सुख दुःख रूपानुभव रूप भोग या शरीराचे ठाईं करतो। ईश्वर अंतर्यामी कर्मफळाचा उ
पभोग न करतां साक्षिभूत स्वप्रकाश स्वरूपानें राहतो अशा अर्थाची श्रुति प्रमाण आहे। देह धारण करणाऱ्यांत तूं श्रेष्ठ आहेस
असें अर्जुनास संबोधन दिल्यानें तूं श्रेष्ठ आहेस या स्तव आपली प्रवृत्ति निवृत्ति अंतर्यामीचे स्वाधीन आहे असें जाणून त्या

ची तूं अंतर्यामि रूपानें उपासना कर असें म्हणून तो अधियज्ञ कसा जाणावा आणि त्याची कशी उपासना करावी अशा-कथं या प्रश्नाचें उत्तर सांगितलें ॥ ४ ॥ याप्रमाणें सांगितलेले प्रश्नोत्तरांतील प्रथम प्रश्नोत्तरांत जीवास ब्रम्हभाव सांगितला। त्याचें अपरोक्षज्ञान ज्यांस आहे त्यांस त्याविषयीं चें चिंतन नको। त्यापुण्येंकरून त्याचे प्राण वर जात नाहींत ते येथेच लीन होतात। तो ब्रम्ह असतांच ब्रम्ह पावला असें श्रुतींत सांगितलें आहे यावरून द्वितीय प्रश्नोत्तरांत महावाक्यांतील शब्द लंपदार्थ सांगितला त्याचें ज्ञान वस्तु तत्वविषयीचें आहे यास्तव त्याविषयीही चिंतन नको। त्रितीय चतुर्थ प्रश्नोत्तरांत कर्मफल आणि फलसाधन कर्म हीं सांगितलीं त्यांचें ही चिंतन नको। कारण कर्मानेच चित्ताचा अवरोध होतो यामुळें फल किंवा त्याचें साधन कर्म यांचें अंतकाळीं स्मरण होईलच। नझालें तर उत्तमच आहे। पंचम आणि षष्ठोत्तरांत कार्योपाधि हिरण्यगर्भ कारणोपाधि मायोपाधि अंतर्यामी ईश्वर हीं दोन स्वरूपें उपास्य सांगितलीं। त्यांतून एका उपास्याचें तरी चिंतन दृढ झालें असलें तर त्या संस्कारानें अंतकाळीं-

अंतकालेच मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवर ॥ यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ५॥

त्याचा प्रत्यय किंवा स्मरण अवश्य होईल यास्तव त्या परमात्म्याचें दोन उपास्य रूपांतून एके स्वरूपानें परमेश्वरास स्मरत असतां जो कलेवर म्हणजे शरीर टाकितो तो अर्चिरादिक मार्गानें ब्रम्हलोकास जाऊन तेथें त्यास ब्रम्हात्मत्व साक्षात्कार होऊन तो माझे स्वरूपाप्रत पावतो म्हणजे मुक्त होतो असें सांगून ज्याणीं चित्त स्वाधीन केलें आहे ते तुला मरण समयीं कसे जाणवात या प्रश्नाचें उत्तर सांगतात। अंतकालीं म्हणजे मरण समयीं। मामेव स्मरन्। म्हणजे माझे पूर्वोक्त रूपाचेंच स्मरण करीत असतां -कलेवरं मुत्का- म्हणजे देह सोडून-यः प्रयाति- म्हणजे जो जातो-स मद्भाव याति- म्हणजे तो माझे स्वरूपाप्रत पावतो। नास्ति अत्र संशयः- म्हणजे यांत संशय नाहीं। ब्रम्हात्मैक्य साक्षात्कार ज्यास झाला तो याच देहांत ब्रम्ह प्राप्त होऊन मुक्त होतो त्यास कोठें गमन नाहीं। उपासकांस अर्चिरादि मार्गानें ब्रम्हलोकीं गमन होऊन तेथें ते मुक्त होतात असें सांगितलें। याप्रमाणेंच वेदांतश्रवणानें ज्यास महावाक्यांतील शब्द तत्वंपदाचे जे विवक्षित शब्द निरुपाधिक जीवेश्वर पदार्थ त्यांचें उत्तम ज्ञान निश्चय

त्मक झालें आहे ते ही ब्रम्ह जो कीं आकल्न ब्रम्हदेवाचे प्रलयकाली ब्रम्हदेवासहवर्तमान त्यांस तेथें ब्रम्हात्मापरोक्ष साक्षात्का र होऊन ते मुक्त होतात असें श्रुतींत सांगितलें आहे। यावरून शब्दत्वं पदार्थ निरुपाधिक जीवात्मस्वरूप जाणणारा जो पूर्वोक्त अध्यात्मज्ञानी त्यासही क्रममुक्ति उपासकाप्रमाणें होते। ती श्रुति - ब्रम्हात्मापरोक्ष साक्षात्कार ज्यास झाला आहे त्यास याच देहां त ब्रम्हप्राप्ति रूप मोक्ष प्राप्ति होते असें श्रुतीत सांगितले आहे यावरून त्याविषयींची नव्हे। त्या श्रुतींत उपासना सांगितली नाही आणि निरुपाधिकात्म स्वरूप मात्राचें ज्ञान ज्यास आहे त्यास पूर्वोक्त सगुणब्रम्होपासना संभवतही नाहीं। यास्तव - नहि क ल्याणकृत् कश्चित् दुर्गतिं तातगच्छति - या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें त्या अध्यात्मज्ञान्यास क्रममुक्ति ती श्रुति सांगते असें निर्विवाद सिद्ध आहे ॥ ५॥ केवल कार्योपाधिक - कारणोपाधिक - उपास्य परमेश्वराचे चिंतनानेच देहमरणानंतर त्या

यंयं वापि स्मरन्भावं त्यजत्यंते कलेवरं॥ तंतमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः॥ ६॥

परमेश्वर स्वरूपाची प्राप्ति होते असें नाहीं। लोकात एक कीट आहे तो भ्रमराचे चिंतनाने जीवंत असतां भ्रमरस्वरूपाप्रत पा वतो असें प्रसिद्ध आहे। तसेंच महादेवाचें चिंतन करीत असता नंदिकेश्वरास त्या देहांतच महादेवाचें स्वारूप्य प्राप्त झालें असें योगशास्त्रांत प्रसिद्ध आहे। मग जो ज्याचें निरंतर चिंतन करतो त्यास मरणसमयीं त्याचें स्मरण होऊन दुसरे देहांत त्या ध्येय वस्तूची प्राप्ति होते म्हणून काय सांगावयाचे आहे अशा तात्पर्यानें हा विषय दुसरे ठिकाणीं ही दाखवितात॥ हे कौंतेया कुं ती पुत्रा अर्जुना। वा म्हणजे अथवा - यंयं भावं स्मरन् - म्हणजे जो ज्या ज्या देवतेचें किंवा दुसऱ्या पदार्थाचें स्मरण करीत अ सतां - अंते कलेवरं त्यजति - म्हणजे मरणकाली शरीराचा त्याग करतो तो - सदा तद्भावभावितः - म्हणजे सर्वदा त्या स्वरूपा चे चिंतनाचे अभ्यासें करून युक्त झाल्यामुळे - तं तं एति - म्हणजे त्या त्या स्वरूपाप्रत पावतो॥ ६॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥

तस्मात् म्हणजे असे आहे याकारणास्तव –सर्वेषु कालेषु मा अनुस्मर –मरणकाळीं माझें स्मरण होण्यासाठीं सर्वकाळ माझें चिंतन तूं कर। जर अंतःकरणाच्या अशुद्धतेमुळें माझेंनिरंतर चिंतन करण्यास समर्थ नसशील तरअंतःकरणशुद्ध्यर्थ –युध्यच– म्हणजे स्वधर्मानुष्ठानरूप शास्त्रविहित युद्ध कर। च शब्दें करूनयुद्ध आणि उपासना या दोन्ही ही करण्याचाउपदेश केला। ज्ञान आणि कर्म यांचा समुच्चयजसा विरुद्धआहे तशीं कर्मआणिउपासना हीं विरुद्ध नाहींत असें ही –युध्यच– यावेंव्याख्यान करतात। मय्यर्पित मनोबुद्धिः –म्हणजे नित्यनैमित्तिक निष्काम कर्मानुष्ठानें करून चित्तशुद्धि होऊन माझेठाईं समर्पित आहे संकल्पविकल्पात्मक मनआणि निश्चयात्मकबुद्धि ज्याणें असा तूं सर्वदा माझें चिंतन करीत होत्साता अंतकाळीं मत्स्मरून –असंशय मामेवएष्यसि –म्हणजे निःसंशय मजप्रतच एशील ॥७॥ याचेंच तीनश्लोकानीं स्पष्टीकरण करतात।

तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्यच॥ मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्य संशयं ॥ ७॥ ७ ॥

अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना॥ परमंपुरुषं दिव्यं यातिपार्थानुचिंतयन्॥ ८॥ ७ ॥

हे पार्था अर्जुना॥ अभ्यासयोगयुक्तेन –म्हणजे ध्येय किंवा उपास्य वस्तूचेठाईं चित्ताची स्थिरता करण्याविषयीं जोप्रयत्न त्यास अभ्यास म्हणावें। ज्या अभ्यासानें ध्येयाशिवाय इतर पदार्थाकारवृत्ति नहोतां निरंतर ध्येयमात्राकारअंतःकरणवृत्तीचा निरंतर प्रवाह होतो तद्रूपकिंवा तत्फलभूतजो योग म्हणजे ध्येयाचेठाईं चित्तस्थैर्य रूपसमाधि तेणेंकरून युक्त आणि अनन्यगामिना –म्हणजे ध्येयवस्तु सोडून दुसरे विषयाकडे नजाणारें –असें –चेतसा –म्हणजे अंतःकरणानें –अनुचिंतयन् –म्हणजे शास्त्रआणि गुरु यांनी उपदेश केलेले परमेश्वराचे ध्येय स्वरूपाचें चिंतन करीतअसता –परमं दिव्यंपुरुषं याति –म्हणजे सर्वोत्कृष्टजोअंतर्यामी आदित्य मंडळांत वर्ती पुरुष त्याप्रत पावतो॥ ८॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

चिंतन करावयाचा आणि प्रयाण कालीं जो दिव्य पुरुष त्याचेंच पुनः वर्णन करतात। कविः म्हणजे अतीत अनागत इत्यादिक जे सर्व पदार्थ त्यांप्रत पाहणारा सर्वज्ञ। पुराण म्हणजे सर्वांस कारणभूत आहे यामुळें चिरंतन किंवा अनादि आणि अनुशासिता-म्हणजे अंतर्यामीचे स्वरूपानें सर्वांचें शासन किंवा नियमन करणारा आणि- अणोः-म्हणजे सूक्ष्मापेक्षांही अणीयांसं-म्हणजे फार सूक्ष्म दुर्ज्ञेय असें तात्पर्य। आणि सर्वस्य धातारं-म्हणजे सर्व शुभाशुभ कर्मफलांप्रत यथा योग्य विभाग करून देणारा आणि-अचिंत्य रूपं-म्हणजे अपरिमित महिमा असल्यामुळें ज्याचे रूपाचें चिंतन करण्यास शक्य नाहीं असा आणि-आदित्यवर्णं-म्हणजे सूर्याप्रमाणे निरंतर प्रकाशमान ज्याचें रूप आहे असा आणि -तमसः परस्तात्-म्हणजे अज्ञानस्वरूप किंवा मोहस्वरूप जो अंधकार त्याहून पलीकडील। स्वप्रकाश स्वरूपामुळें अज्ञान किंवा यामुळें होणार जो देहादिकांवर आत्मत्वबुध्यादिक रूप मोह तद्रहित असें तात्पर्य। अशा पुरुषाप्रत-यः अनुस्मरेत्-म्हणजे चिंतन करील तो त्याप्रत पावतो असा पुढें

कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ॥ सर्वस्य धातारमचिंत्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥ ९॥

प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ॥ भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यं ॥ १०॥

श्लोकाशीं अन्वय करावा किंवा- स तं परं पुरुषमुपैति दिव्य-या पुढील श्लोकांतील त्या दिव्य पुरुषाप्रत तो पावतो असा अन्वय करावा ॥ ९॥ मरणसमयीं त्या दिव्य पुरुषाचें चिंतन होण्या विषयीं मोठा प्रयत्न करावा असे सुचवून चिंतनाचें फल सांगतात। भक्त्या युक्तः-म्हणजे ईश्वराचे ठाईं जें प्रेम तद्रूप भक्तीनें किंवा आराध्यत्व बुद्धीनें युक्त होत्साता -योगबलेन भ्रुवोर्मध्ये सम्यक् प्राणं आवेश्य-म्हणजे हृदय कमलाचे ठाईं सर्व इंद्रियें- प्राण आणि मन यांच्या व्यापारांचा निरोध करणें असा जो योग त्याचें जें बल म्हणजे अभ्यासाचा संस्कार तेणें करून भ्रुकुटीचे मध्य भागीं उत्तम प्रकाराने प्राणाचें स्थापन करून-अंतकाले अचलेन मनसा-म्हणजे मरणकालीं एकाग्र मनाने-तं पुरुषं अनुस्मरन्-सः तं दिव्यं पुरुषं उपैति-म्हणजे त्या दिव्य पुरुषाचें चिंतन करणारा जो तो त्या दिव्य पुरुषाप्रत पावतो। तात्पर्य। मूलाधार चक्रापासून नाभि हृदय ब्रह्मरंध्रापर्यंत जी सु

नें योगशास्त्रांत सांगितली आहेत त्यांचें अर्ध्या प्राणवरवर चढवावा त्यांपासून खालीं उतरावा असा जो केलेला अभ्यास त्याचें बळ
नें मरणसमयीं हृदयाचे ठाईं प्राणास स्थापन करून नंतर सुषुम्ना नाडीचे द्वारा भ्रुकुटीचे मध्यभागीं आज्ञाचक्र आहे त्याचे
ठाईं प्राणाचें स्थापन करावें। त्याचे तेथेंच स्थापन करण्याचे प्रयोजन असें आहे कीं भ्रूमध्यापासून वर ब्रम्हरंध्रापर्यंत प्राणवायु च-
ढविला तर मनाला मूर्च्छा प्राप्त होते यामुळें मरणकालीं ईश्वर चिंतन ईश्वरस्मरणपूर्वक होणार नाहीं - यास्तव मरणसमयीं भ्रूमध्य
भागींच प्राणाचें स्थापन करावें। नंतर ईश्वरचिंतना प्रमाणें उपासक मरण पावल्या नंतर त्यास ब्रम्हलोकास जावयाचा अर्चिरादि-
मार्ग पुढें सांगितला आहे त्या मार्गांतील पर्वें म्हणजे उपासकास ब्रम्हलोकास पोंचविणाऱ्या ज्या देवता त्यांचीं स्थानें आणि त्या उ
पासकाला ब्रम्हलोकास अमानव पुरुष ज्या स्थानापासून पोंचवितो तें स्थान आणि तो पुरुष आणि पावावयाचा मुख्य ब्रम्ह-
लोक यांचें ही तेथेंच म्हणजे भ्रूमध्यदेशीं चिंतन करावें। त्या चितनाचे संस्कारानें उपासकाचें मन सद्वृत्तिक होऊन पूर्वसंस्का
र बळानें उपासकानें भ्रूमध्यापासून वर चढविलेले प्राण ब्रम्हरंध्राचा भेद करून गेल्यावर दिव्य देहादिकें करून युक्त आणि अ
र्चिरादि मार्गानी गमन करते वेळेस त्या त्या मार्गांतील देवतांनीं पूजा करून पुढील मार्गाचे ठाईं पोंचविलेला आणि अमानव पुरु
ष ब्रम्हदेवाचा सेवक ज्याच्या बरोबर आहे आणि त्यास इच्छित जें स्थळ त्याचे ठाईं त्या अमानव पुरुषानें नेऊन पोंचविला आहे
अशा उपासकाचे आत्म्याभत पाहतें। नंतर तो उपासक योगी - कविं पुराणमनुशासितारं - एणे करून सांगितलेला जो सर्व जगाची उ
त्पत्ति करणारा नारायण ज्यास म्हणतात। अशा हिरण्यगर्भाप्रत पावतो म्हणजे ब्रम्हलोकीं त्याचे समीप जातो। ब्रम्हविष्णु महेश्व
राचे लोक एकावर एक आहेत अशी कल्पना पौराणिक मतांत जशी केली आहे त्याप्रमाणें वैदिक मतांत त्या लोकांची कल्पना नाहीं
तरते सर्व लोक हिरण्यगर्भाचा जो लोक ज्यास सत्यलोक म्हणतात त्यांतच अंतर्भूत आहेत त्यांशिवाय दुसरे पृथक् नाहीं
त असें बृहदारण्यकोपनिषद् आणि त्याचें भाष्य यांत स्पष्ट सांगितलें आहे। त्यावरून एथें लिहिलें। या विषयींस रसद्विच
रनिर्मत्सर पंडितांनीं करून युक्त असेल त्याचा स्वीकार करावा ॥ १० ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीनारायणार्पण॰

भ्रुकुटीचे मध्यभागीं प्राणाचे स्थापन करून परमेश्वराचें चिंतन करावें म्हणून सांगितलें तें परमेश्वराचें प्रतिपादन करणारे अनेक मंत्र आणि अनेक नामें आहेत त्यांतून कोणता तरी एक मंत्र किंवा एक नाम मनांत धरून त्याचे द्वारानें करावें असें प्राप्त झालें म्हणून त्याविषयी नियम करतात आणि मरण समयीं भ्रुकुटीचे मध्यभागी प्राणाचें स्थापन करून परमपुरुषाची प्राप्ति होते असें पूर्वोक्त श्लोकांत सांगितलें यावरून ब्रम्हविद्येवांचून ही केवल योगमार्गानेंच ब्रम्ह प्राप्ति होईल असेंही प्राप्त झाले त्याविषयीं योग्य स ही ब्रम्हविद्येची अपेक्षा आहे असें सांगतात॥ यत् अक्षरं वेद विद: वदंति - म्हणजे ज्यास ॐ काराख्य ब्रम्ह असें वेदविदः - म्हणजे वेदार्थ जाणणारे असे जो ॐ कार हाच पर आणि अपर ब्रम्ह आहे असा त्याचे ठाईं निर्गुण किंवा सगुण ब्रम्हाची उपासना करावी असें सांगण्याचा आरंभ करून - अकार - उकार आणि मकार या तीन मात्रा रूप वर्ण त्यांत आहेत असें जें ॐ असें प्रणव रूप अक्षर एणे करून म्हणजे याचा अर्थ पर ब्रम्हच आहे असे किंवा हा परब्रम्हाचा वाचक आहे यास्तव हा ब्रम्हच आहे असें ध्यान करी

यदक्षरं वेदविदो वदंति विशंति यद्यतयो वीतरागाः॥ यदिच्छंतो ब्रम्हचर्यं चरंति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये॥ ११॥

ल तो त्या पर किंवा अपर ब्रम्हाप्रत पावतो - असा जो वेदोक्त अर्थ त्याप्रत जाणणारे - बोलतात। अथवा ज्यास ॐ कार याशब्दाचें वाच्य - अक्षर म्हणजे नाशरहित ब्रम्ह असें - जें स्थूल नव्हे - अणु नव्हे - ह्रस्व नव्हे - दीर्घ नव्हे - असें जें जगाचें कारण त्यास ब्रम्ह वेत्ते ब्राम्हण अक्षर ब्रम्ह असें म्हणतात असा जो वेदोक्त अर्थ त्याप्रत जाणणारे - बोलतात। वीतरागा. यतय: यत् विशंति - म्हणजे निस्पृह यत्न करणारे संन्यासी ज्याचा ब्रम्ह चिंतन करण्यासाठी शालिग्राम प्रतिमा इत्यादिका प्रमाणें प्रतीक रूपानें आश्रय करतात आणि शालिग्रामादिका प्रमाणें त्याचे ठाईं ब्रम्ह चिंतन करतात। म्हणजे समुद्राप्रत जशा नद्या आपली नामे आणि रूपें टाकून प्रवेश करतात - त्याप्रमाणें ते संन्यासी देहेंद्रियादिकोपाधि सोडुन त्याचे ठाईं प्रवेश करतात तद्रूपच ते होतात असा अर्थ जाणावा। यत् इच्छंतः ब्रम्हचर्यं चरंति - ज्या ॐ कार किंवा पर ब्रम्हाच्या प्राप्ती साठीं गुरुकुल वासादिक ब्रम्हचर्य व्रताचें धारण करतात। तत् पदं ते - संग्रहेण प्रवक्ष्ये - तें निर्गुण ब्रम्ह किंवा सगुण ब्रम्ह याचे प्राप्तीस साधनभूत अकार उकार मकार रूप वर्णत्रयात्मक ॐ कार-

रूपपद किंवा ब्रम्हविद्येने प्राप्त व्हावयाचे जें परब्रम्ह स्वरूप विष्णुचाख्य पद त्याप्रत तुला बोध होईल असें संक्षेपानें सांगतों। तें अक्ष
र ब्रम्ह मी कसा जाणेन असा व्याकुल होऊं नको। एणेकरून मंद किंवा मध्यम बुद्धीजे अधिकारी यांणी पूर्वोक्त श्रुतींत पर किंवा अपर ब्र-
म्ह स्वरूपाचे ॐकाराचे ठाईं जें उपासन सांगितले आहे ते योग धारणा सहित केले असता क्रमानें मुक्ति रूप फलास साधन होतें असें
सूचविले। आणि अकाराचा वासुदेव विष्णु असा अर्थ - उकाराचा ब्रम्हा असा अर्थ - मकाराचा महादेव असा अर्थ - याप्रमाणें त्रि-
मात्रात्मक ॐकाराचा ब्रम्हविष्णुमहेश्वर रूप सगुण ब्रम्हरूप अर्थ आणि ॐकारांत जी प्लुत अर्धमात्रा आहे ती सत्वरजतमोरू-
प गुणत्रयातीत तुरीय सच्चिदानंदात्मक ज्ञेय ब्रम्हाचे प्रतिपादन करते। ते ब्रम्ह महावाक्यापासून स्वात्मत्वें करून अपरोक्षता-
ने ज्याणीं जाणलें आहे त्यांस यांच देहांत ब्रम्ह प्राप्ति होते असें सूचविले॥ ११॥ योग धारणासहित पूर्वोक्त प्रणवोपासन आ-
णि त्याचें फल आणि अर्चिरादिमार्गानी ब्रम्हलोक प्राप्ति आणि त्याच्या प्रसंगाने दुसरे कांही असें एथून पुढें अध्याय सम-

सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च॥ मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणां॥ १२॥

प्ती पर्यंत सांगावयास आरंभ करतात॥ भ्रूमध्य भागीं प्राणाचे स्थापन कसे करावें ते सांगतात॥ आत्मनः म्हणजे आपलीं-
सर्वद्वाराणि संयम्य - म्हणजे बाह्य शब्दादिक विषयाचें ग्रहण करण्यास द्वारभूत जीं श्रोत्र चक्षुरादिक इंद्रियें त्यांस शब्दादिक
विषयांपासून आवरून - च - म्हणजे आणि - मनः हृदि निरुध्य - म्हणजे बाह्येंद्रियाचा निग्रह केला तरीं मनानें विषयांचें चिंतन
होईल यास्तव हृदयाचे ठाईं मनाचा निरोध करून म्हणजे मनांतही विषयांचे चिंतन न होईल असें करून - मूर्ध्नि प्राणं आधा-
य - म्हणजे मूळाधारापासून मस्तक पर्यंत जी विद्यमान सुषुम्ना नामक नाडी तिचे द्वारा गुरूपदिष्ट मार्गानें प्राणवायूस-
भ्रूमध्य भागीं स्थापन करून - योग धारणां आस्थित. - म्हणजे ज्या हृदय कमलरूप देशाचे ठाईं ध्येय वस्तूचें चिंतन करा-
वयाचें त्या देशीं मनाची निश्चलस्थिति करणे त्यास योगशास्त्रांत धारणा असें म्हणतात त्या धारणेने युक्त होत्साता आत्मनः
योगधारणां आस्थितः म्हणजे आत्मविषयक समाधिरूप धारणेने युक्त होत्साता असाही अर्थ आत्मनः यापदाचा कडेअन्व-
यकरून करतात॥ १२॥

मूर्ध्नीचे ठाई प्राणाचें स्थापन करून नंतर काय करावें तें सांगतात। ॐ इति एकाक्षरं ब्रम्ह व्याहरन्-मूर्धा सांगितल्या प्रमाणे ॐकाररूप रब्रम्हाचा वाचक आहे अथवा ज्यावर देवता बुद्धि करून उपासना करतात असें-जें शालिग्रामादिक किंवा सुवर्णादिकांच्या प्रतिमा त्यांस प्रतीक असें म्हणतात त्याअशा विष्ण्वादि स्वरूपच आहेत याप्रमाणें प्रणव हा परब्रम्हाचे उपासनेचे प्रतीकच आहे म्हणून ॐकाररूप एक अक्षर हें ब्रम्ह आहे त्याचें जपरूप उच्चारण करीत असता। एकाक्षर या विशेषणानें मरणसमयीं इतर मंत्राचे जपापेक्षा याएकेच अक्षराचा जप अनायासानें होतो आणि फल मोठें अशी स्तुति केली। आणि-मांअनुस्मरन्-म्हणजे परमेश्वर जो मी याचे स्मरण करीत असतां अथवा एक म्हणजे अद्वितीय अक्षर म्हणजे नाशरहित असें जें ॐकार यांतील अर्धमात्रेने प्रतिपाद्य तुरीय ब्रम्ह त्याप्रत त्यातले करून स्मरत असतां-यः देहं त्यजन्प्रयाति-म्हणजे मूर्धन्य नाडींतून ब्रम्हरंध्राचे मार्गाने प्राण गेला म्हणजे देहाप्रत टाकून अर्चिरादिक मार्गानी गमन करतो-सः परमां गतिं याति-म्हणजे जसे कोणी एका पुरुषानें स्मरण करून त्याचें नाम घेऊन हाक मारली तर तो ऐकून

ॐमित्येकाक्षरं ब्रम्ह व्याहरन् मामनुस्मरन्॥ यः प्रयाति त्यजन् देहं स याति परमां गतिं॥१३॥

न त्याचे सन्निध येतो त्याप्रमाणे परब्रम्हाचे स्मरण करून त्याचे प्रणवरूप नामाचे उच्चारणाने ने व्यापक आहे यामुळें तेसन्निध होऊन ब्रम्हलोकाचे प्राप्तीचे द्वारा तो त्या ब्रम्हाप्रत पावतो। त्या ब्रम्हस्वरूपाचें वर्णन करावयास आरंभ करून ज्ञान्यास किंवा उपासकास हें ब्रम्ह परमगति आहे-हें ब्रम्ह त्यास परमानंदरूप आहे-असें श्रुतींत सांगितलें आहे अशी व्याख्या केली तर पतंजलीनी चित्तवृत्ति निरोधरूप योगास अभ्यास आणि वैराग्य ही साधने आहेत-असे सांगून त्याविषयी उपाय सांगून त्यांस तीव्र वैराग्य आणि अभ्यास हीं साधने आहेत किंवा त्यांचे उपाय जे सांगितले त्याचें अनुष्ठान लौकर प्राप्त झाले आहे त्यांस योगरूप समाधि-आसन्न म्हणजे जवळ आहे असे सांगितलें। नंतर सांगितले साधनाशिवाय ही ईश्वराचा वाचक जो प्रणव त्याचा जप त्याचे अर्थाचें चिंतन करणें असे जें ईश्वर प्रणिधान तें समाधि सिद्ध होण्यास सुलभ साधन आहे असे ईश्वरप्रणिधान द्वारा-समाधिसिद्धिरीश्वरप्रणिधानात्-या सूत्राने योगशास्त्रांत सांगितलें आहे। एथें तर त्या ईश्वरप्रणिधानाने साक्षात् परमगतिच प्राप्त होते असे या पूर्वोक्त-

ग्यारवे प्रमाणे सांगितलें तर हे परस्पर विरुद्ध होईल यास्तव- ॐ इति एकाक्षर ब्रम्ह व्याहरन् - मा अनुस्मरन् - आत्मन. योग धारणां आस्थित
यः देहं त्यजन् प्रयाति सः परमांगति प्रयाति - म्हणजे प्रणव रूप एकाक्षर ब्रम्हाचा जप करीत असतां आणि माझें चिंतन करीत असतां आ
णि आत्म विषयक समाधि रूप योगाने युक्त होत्साता जो देहाप्रत टाकून जातो तो परम गती प्रत पावतो अशी योजना करावी असे कोणी व्याख्या
न करतात ॥ तस्मान् मद्भक्ति युक्तस्य योगिनो वै मदात्मनः ॥ न ज्ञानं न च वैराग्यं प्रायः श्रेयो भवेदिह ॥ यत्कर्मभिर्यत्तपसा ज्ञान वैराग्यतश्च
यत् ॥ योगेन दान धर्मेण श्रेयोभिरितरैरपि ॥ सर्वं मद्भक्ति योगेन मद्भक्तो लभतेंजसा ॥ याचा अर्थ । माझें ठाईं ज्याचें मन आहे असा जो मा
झा भक्त त्यास बहुतकरून माझें भक्ती शिवाय ज्ञान किंवा वैराग्य कल्याण कारक होणार नाही । जे फल कर्माचरणाने - तपाने - ज्ञाना
नें - वैराग्यानें - योगाने - दान धर्माने - आणिक जी श्रेयस्कर साधनें आहेत त्यांणी प्राप्त होतें तें सर्व फल माझा भक्त भक्ती करून
च अनायासे करून किंवा निश्चयें करून पावतो - असें श्रीमद्भागवतांत सांगितले आहे । आणि भगवद्गीतेंतच - तमेव शरणं गच्छ स
र्वभावेन भारत ॥ तत्प्रसादात् परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतं ॥ सर्व धर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ॥ अहं त्वां सर्व पापेभ्यो मो
क्ष यिष्यामि मा शुच - एणे करून त्या ईश्वराला च तू सर्व भावाने शरण जा त्याचे प्रसादाने तुला शाश्वत ब्रम्हपद प्राप्त होईल । सर्व
धर्मांचा परित्याग करून मलाच शरण जा तुला मी सर्व पापा पासून मुक्त करीन - असें सांगितले आहे । यावरून भगवद्भक्तांस
मोक्षा पर्यंत फल देणारी भक्तिच परम पुरुषार्थ आहे । आणि आवश्यक आहे योगाभ्यास आवश्यक नाही असें असतां योगा
हून ही अधिक जी भक्ति तिचा योग सिद्धी साठी योग साधनें जी वैराग्यादिक त्यांशीं जोप तंजलीनी विकल्प केला तो विरुद्ध दि
सतो । जी एक फला विषयी समान साधनें असतात त्यां विषयी हे करावें किंवा हें करावें असा विकल्प होतो असें शास्त्र संमत आहे अ
शी शंका होते तथापि भगवद्गीतेंत च षष्ठाध्यायीं जीवन्मुक्ति सुखास मनो जय - वासना नाश - कारण आहे यास्तव ज्यास जीवन्मुक्ति सु
खाची इच्छा आहे त्याणे त्या सुखा साठी मनो जय आणि वासना नाश यांस साधन भूत जो योग तो अवश्य करावा असें योगास ही श्रेष्ठ
त्व सांगितलें आहे । यास्तव जे मुमुक्षु आहेत त्यांस योग ही आवश्यक आहे त्यांस अतिसुलभ साधन भगवद्भक्ति आहे । कारण

नि योमानें भगवत्प्रसाद होऊन या भक्तास योग लौकर सिद्ध होवो असा ईश्वर संकल्प होतो। ईश्वरसंकल्प सत्य आहे यामुळें भक्तास लौकर
इतर साधनापेक्षां भक्तिरूप साधनानें योग सिद्ध होतो या तात्पर्यानें पतंजलीनीं भक्तीचा योग साधनाशीं विकल्प केला असें जाणावें ॥१३॥
सांगितल्या प्रमाणें प्राण निरोध करण्याचा अभ्यास नाहीं किंवा होत नाहीं त्यास भ्रुकुटीमध्ये प्राणाचें स्थापन करून मूर्धन्य सुषुम्ना नाडीचे द्वा
रा ब्रम्हरंध्रांतून प्राण घालवून स्वेच्छेनें देहत्याग करण्यास अशक्य आहे त्याची वाट काय असें म्हणेल तर त्याविषयीं सांगतात ॥ अनन्यचे
ताः सन् यः नित्यशः मां अनुस्मरति - म्हणजे मी जो परमेश्वर त्याचेच ठाईं आदर ठेवून त्याहून दुसरे विषयावर ज्याचें चित्त नाहीं अ
सा होत्साता जो निरंतर म्हणजे मरण पर्यंत माझें चिंतन करतो - तस्य नित्ययुक्तस्य योगिनः हे पार्थ अहं सुलभः अस्मि - म्हणजे कर्मव
शहोऊन किंवा योगबलानें स्वेच्छेनें प्राणत्याग करणारा जो निरंतर माझे ठायीं स्थिरचित्त झालेला किंवा योगी त्यास मी परमेश्वर-
सुलभ म्हणजे सुखेंकरून पावावयास योग्य आहें। एणेकरून यावज्जीव विक्षेपशून्य भगवंताचें चिंतनच परमगतीस साधन आ

अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ॥ तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥१४॥
मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतं ॥ नाप्नुवंति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥ १५॥

हे। योगमार्गानें स्वेच्छेकरून प्राणोत्क्रमण घडो किंवा न घडो त्याविषयी आग्रह करूं नये असें सूचविलें। सांगितले प्रमाणें निरंतर माझें चिं
तन करणारा जो नित्ययुक्त योगी म्हणजे योग्यास अवश्य कर्तव्य जे नियमित आहारादिक त्याहीं करून आणि यमनियमादिकांहीं करू
न युक्त जो योगानुष्ठान करणारा त्यास मी सुलभ आहे - एणेकरून मागितल्ली गति दुर्लभ आहे असें मानूं नये अशीही कोणी व्याख्या कर
तात ॥१४॥ मी सुलभ झालों म्हणजे काय होते तें सांगतात ॥ महात्मानः परमां संसिद्धिं गताः - म्हणजे रज आणि तम एतद्रूप मलाचा-
माझें चिंतनें करून नाश होऊन ज्याचें अंतःकरण शुद्ध झालें आहे असे शुद्ध-सत्व गुणी - ब्रम्हात्म साक्षात्कारवंत - आणि माझे
ठिकाणीं येऊन भोग समाप्ति झाल्यानंतर मोक्षाप्रत पावलेले जे पूर्वोक्त उपासक ते - मां उपेत्य - म्हणजे मी जो परमेश्वर त्याप्रत पावून-
दुःखालयं अशाश्वतं पुनः जन्म न आप्नुवंति - म्हणजे गर्भांत वास करणें योनीतून बाहेर पडणें - इत्यादिक सर्व दुःखाचें स्थान आ

णि मूढ ह ह्या किंचित् वैषयिक करावें स्थान असले तरी अशाश्वत म्हणजे नाश पावणारे आणि अति दुःख अशा पुनः दुसऱ्या जन्मास येतना-
हीत ॥१५॥ मज प्रत पावून पुनः जन्मास येत नाहीत असे सांगितल्याने जे परमेश्वरा प्रत पावले नाहीत त्यांची पुनः जन्म मरणात येणे जाणें अशी-
आवृत्ति आहे असे अर्थांत सिद्ध झालें तें सांगतात ॥ हे अर्जुन - आब्रम्हभुवनात् लोकाः पुनः आवर्तिनः संति - म्हणजे जेथे भूतें उत्पन्न होता-
त तें भुवन म्हणजे लोक। आब्रम्ह भुवनात म्हणजे ब्रम्हलोक रूप सर्व भोग भूमि स्वरूप जे भूर्लोक - भुवर्लोक - स्वर्लोक - महर्लोक - ज-
नो लोक - तपो लोक तेथें गेलेले प्राणी पुनः जन्मास येतात। याचें असे तात्पर्य आहे कीं या ब्रम्हपुरांत म्हणजे जेथे ब्रम्ह प्राप्ति होते अशा-
या शरीरांत दहर म्हणजे सूक्ष्म हृदय कमल आहे त्यांत सूक्ष्म आकाश आहे ते ब्रम्हच आहे त्याची उपासना उपनिषदांत सांगितली आहे
ती सदहरोपासना म्हणतात तशीजी ब्रम्हच आहे - अशीजी उपासना सांगितली आहे तीस अहंग्रहोपासना म्हणतात। तशीच एथें सांगित-
लेल्या ॐकाराचे ठाई ब्रम्होपासना इत्यादिक उपासना। या सर्व उपासना क्रमशुक्तिम्हणजे मरणानंतर अर्चिरादि मार्गांनी ब्रम्हलोकास जा-

आब्रम्हभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन॥ मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥१६॥ ॐ ॥

ऊन तेथें ब्रम्हात्म साक्षात्कार होऊन मोक्ष देणाऱ्या आहेत। या उपासना करून जे ब्रम्हलोकी गेले ते परत जन्मास येत नाहीत। थोषा म्हणजे
स्त्री - पुरुष - पृथ्वी - पर्जन्य - आणि द्युलोक म्हणजे स्वर्ग या पांच पदार्थांचे ठाई हे प्रत्येक अग्नि आहेत अशी उपासना करण्यास वेदांत
सांगितलें आहे। या उपासनेस पंचाग्निविद्या असें म्हणतात। या उपासनेने ब्रम्हलोक प्राप्ति होते असेंच वेदांतच सांगितलें आहे पारंतु
ते उपासक मरणानंतर ब्रम्हलोकास जातात परंतु ते ईश्वरोपासक नव्हेत या मुळे त्यास तेथे ब्रम्हसाक्षात्कार न होतां पुण्य क्षयान-
त्यानंतर परत जन्मास येतात या तात्पर्यानें ब्रम्हलोकास गेलेले ही परत जन्मास येतात असें सांगितलें। तेथे गेले ले सर्व परत ज-
न्मास एतात असें समजूं नये - हे कौंतेय - मां उपेत्य पुनर्जन्म न विद्यते - म्हणजे हे कुंतीपुत्रा अर्जुना - मज प्रत जे पावतात त्यां-
स पुनर्जन्म होत नाहीं। या श्लोकांत अर्जुन आणि कौंतेय हें दोन वेळ संबोधन आदरार्थ आहे ॥१६॥ ॥

श्री कृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्री नारायणार्पणमस्तु ॥ ॥ श्री गोविंदार्पणमस्तु ॥ ॐ श्री रामचंद्रार्पणमस्तु

ब्रम्हलोका रूरुं सर्व लोक पुनरावृत्तिशील आहेत याचें कारण ते सर्व लोक कालानें परिच्छिन्न म्हणजे इतक्या कालपर्यंत राहावयाचे पुढें नाश
पावायाचे अशा स्थितीचे आहेत असें सांगतात॥ अथवा तपस्वी- दानशील- वैराग्यसंपन्न आणि शीतोष्णादि सहन करणारे जे आहेत
ते भूर्लोक- जनोलोक- तपोलोक- आणि सत्यलोक यांचे ठाई शोकरहित स्थानाप्रत पावतात- अशा अर्थाची पुराणांत वाक्यें आहेत याव
रून भूरादिक खालचे तीन लोकांपेक्षांही त्यावरील महरादिक चार लोकांस उत्कृष्टत्व आहे असे होतें। जर ब्रम्हलोक रुरुन सर्व लोकां
चाही नाश होतो किंवा तेथें गेलेले जीव पुनः परत जन्मास येतात तर मग ह्या लोकांचा पुराणोक्त विशेष कसा संभवेल अशी शंका होईल त
र- जरी सर्व लोकांचा नाश होतो तथापि कोणाचा अल्प कालाने नाश होतो- कोणाचा त्यापेक्षां बहुत कालानें होतो असा विशेष संभ
वतो यासाठीं ब्रम्हदेव स्वभावें करून शंभर वर्षें पर्यंत आयुष्याचा आहे। ब्रम्हदेवाचे मानानें त्याचे एक दिवसांत भूरादि तीन लोकांची उत्प
त्ति आणि रात्री प्रलय होतो असे मानण्यासाठी ब्रम्हदेवाचे दिवसाचें आणि रात्रीचें मान सांगतात॥ सहस्रयुगपर्यंत ब्रम्हणः यत्अ

सहस्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रम्हणो विदुः ॥ रात्रिं युगसहस्रांतां तेऽहोरात्रविदो जनाः ॥१७॥

हः म्हणजे कृत- त्रेता- द्वापार- आणि कलि- ही चार युगें मनुष्यांचे कालमानाने सहस्र वेळ जितक्या कालमानांत जातील तितके काल
मानानें ज्याचा पर्यंत म्हणजे समाप्ति होते तितक्या कालमानाचा जो ब्रम्हदेवाचा दिवस- युगसहस्रान्तां ब्रम्हणः रात्रिं आणि दिवसाचें-
जें कालमान सांगितलें तितकेच कालमानाने जिचा अंत म्हणजे समाप्ति होते म्हणजे तितकेच कालमानाचे ब्रम्हदेवाची रात्रि अ
शा कालमानाच्या ब्रम्हदेवाचा दिवस आणि रात्र याप्रत- ये विदुः- म्हणजे जे जाणतात ते जनाः अहोरात्रविदः- म्हणजे त्यास अहो
रात्र वेत्ते असें म्हणावे। जे केवळ चंद्र आणि सूर्य यांच्या गतीने अहोरात्र मान जाणतात ते अल्पदर्शी आहेत याम्नव त्यांस अ
होरात्रवेत्ते म्हणूं नये असें अर्थांतर सिद्ध झाले। या श्लोकांतील- सहस्रयुगपर्यंत- ह्यातील युगपदानें कृतादिक चार युगें घ्यावीं या
विषयी- चतुर्युगसहस्रं तु ब्रम्हणो दिनमुच्यते- असे पुराणांतील वाक्य आहे। याविषयीं कालगणना करण्याचा प्रकार असा आ
हे। चांद्रादिमानानें तीनशे पंचावन्न ३५५ दिवसांचें जे मनुष्याचें एक वर्ष तें देवांचें एक अहोरात्र म्हणजे एक दिवस आणि रात्र होते

वी अहो रात्रें १५ झाली म्हणजे एक पक्ष होतो। दोनपक्ष झाले म्हणजे एक मास होतो। ते बारा १२ मास झाले म्हणजे एक वर्ष होतें। याप्र-
माणे देवाचीं बाराहजार वर्षे गेलीं म्हणजे कृतादिक चार युगें होतात। तीं चार युगे एक हजार वेळ गेलीं म्हणजे ब्रम्हदेवाचा एक दिव
स होतो आणि तितकेंच कालमान गेले म्हणजे ब्रम्हदेवाची एक रात्र होते। अशीं तीस अहोरात्रे गेलीं म्हणजे एक मास होतो। अ
से बारा मास गेले म्हणजे एक वर्ष होतें। यामानानें शंभर वर्षे ब्रम्हदेवाचे आयुष्य आहे। त्याची स्यसाच आहे यास्तव त्याचे लोकीं
गेलेले पुनः परत जन्मास येतात म्हणून काय सांगावयाचें आहे ॥ १७॥ ब्रम्हदेवाचे दिवसात आणि रात्रींत काय होते तें सांगता-
त ॥ अहरागमे अव्यक्तात् सर्वा. व्यक्तयः प्रभवंति- म्हणजे दिवसाचे प्रारंभीं किंवा प्रजापति जो ब्रम्हा त्याचे प्रबोधसमयीं सुषु-
प्त्यवस्थापन्न जो ब्रम्हदेव त्यापासून सर्व प्रजा व्यवहार करावया जोग्या अभिव्यक्त होतात। रात्र्यागमे तत्रैव अव्यक्त संज्ञके प्रली
यंते- म्हणजे प्रजापति जो ब्रम्हदेव त्याच्या सुषुप्ति काली अभिव्यक्त झालेल्या सर्व प्रजा त्या सुषुप्त्यवस्थ अव्यक्ता पासून अ

अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवंत्यहरागमे॥ रात्र्यागमे प्रलीयंते तत्रैवाव्यक्तसंज्ञके॥ १८॥

भिव्यक्त झाल्या त्याचेच ठायीं लय पावतात म्हणजे व्यवहार नहोण्याजोग्या तिरोहित होतात। नामरूपात्मक आकाशादिक प्रपंचा-
चीज्या अवस्थेंत अभिव्यक्ति नाहीं अशी जी आकाशादिकाचे उत्पत्तीस किंवा अभिव्यक्तीस कारणभूत अव्याकृतावस्था तद्युक्त
माया किंवा मूल प्रकृतिच अव्यक्त शब्दाचा मुख्य अर्थ आहे। तथापि एथें ब्रम्हदेवाचे प्रतिदिवशीं आणि प्रतिरात्रीस होणारे जे सृष्टि
प्रलय त्यांस दैनंदिन सृष्टि प्रलय म्हणतात ते सांगावयाचा आरंभ केला आहे। त्यांत नामरूपात्मक आकाशादिक भूतें आहेत य-
ास्तव अव्यक्त शब्दानें एथें ब्रम्हदेवाची सुषुप्त्यवस्था घेतली। दृष्ट सृष्टि पक्षीं अस्मदादिक जीवानीं अज्ञान कल्पित हा प्रपंच अ
स्मदादिकांचे सुषुप्ति कालीं जसा अज्ञानांत लीन होतो आणि प्रबोध म्हणजे जागृदवस्थेंत पूर्वीप्रमाणेंच अभिव्यक्त होतो त्याप्र
माणें सर्वजीवसमष्टिरूप प्रजापतीचे अज्ञानानें कल्पिलेला सर्व प्रपंच त्याचे सुषुप्तींत म्हणजे अज्ञानांत लीन होतो। आणि प्रबोधां
त यथापूर्व आविर्भूत होतो याच तात्पर्यानें धाता म्हणजे ब्रम्हदेव यथापूर्व प्रपंचास उत्पन्न करिता झाला असें न म्हणून कल्पित

उत्पत्तीच्चे पूर्वी कार्य अत्यंत असत् म्हणजे अगदीं नसतें आणि नाशानंतर अगदीं नाहीसें होतें असें कोणी मानितात त्यांचे पक्षीं कृत
नाश म्हणजे ज्या देहेंद्रिय मनोबुद्धि रूप उपाधि युक्त जीवानीं कर्म केलें त्या कर्मांच्या प्रलयकाळीं त्या उपाधियुक्त जीवाच्या उपाधीचे
प्रलयानें प्रलय झाल्यामुळें नाश होईल आणि सृष्टि समयीं ज्या देहेंद्रियाची उत्पत्ति झाली तदुपाधिक जीवांस न केलेले कर्मांचें
फलोपभोग होईल यास अकृताभ्यागम म्हणतात हे दोष येतील त्यांचे परिहारासाठीं आणि हा संसार लौकर नाश पावणारा
असला तरीं अविद्या-काम-आणि कर्म-यांचे पारतंत्र्यामुळें अत्यंत निवृत्ति न होऊन पुनः पुनः त्याचा प्रादुर्भाव होतो आणि
लय होतो असें जाणून याविषयीं वैराग्य व्हावें यासाठीं सांगतात॥ हे पार्थ अर्जुना-स एव अयं भूतग्रामः-म्हणजे पूर्वकल्पीं
लीन झालेला तो चर स्थावर जंगमात्मक सर्व भूतांचा समुदाय-अहरागमे-म्हणजे ब्रम्हदेवाच्या दिवसाचे आरंभीं-भूत्वा

भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते॥ रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे॥ १९॥ ७ ॥

भूत्वा-म्हणजे पुनः पुनः उत्पन्न होऊन म्हणजे अभिव्यक्त होऊन-रात्र्यागमे प्रलीयते-म्हणजे ब्रम्हदेवाचे रात्रीचे आरं-
भीं लीन होतो-पुनः अहरागमे स एव प्रभवति-म्हणजे पुनरपि तो त्याच दिवसाचे आरंभीं अभिव्यक्त होतो। पूर्वकल्पींचा भूत-
समुदाय अगदीं नाहींसा होऊन दुसरे कल्पीं अभिनव दुसराच भूतग्राम उत्पन्न होतो आणि उत्पन्न झालेला प्रलयकालीं अ-
गदीं नाहींसा होतो असें नाहीं तर त्यासच पुनः पुनः आविर्भाव आणि तिरोभाव होतात। ते होण्यास कारण सांगतात। यतः
अवशः-म्हणजे ज्या कारणास्तव तो अविद्या-काम-आणि कर्म यांचे जे संस्कार त्यांचे स्वाधीन आहे स्वतंत्र नाहीं। यासाठीं
सर्वानर्थास बीजभूत जी अविद्या तिचा नाश होऊन जन्ममरण प्रवाहाचा उच्छेद व्हावा यासाठीं आत्मतत्त्व ज्ञान होण्याचा प्र-
यत्न करावा असें तात्पर्य॥ १९॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ७ ॥ श्री नारायणार्पणमस्तु॥ ८ ॥

याप्रमाणें-आब्रम्हभुवना ल्लोका. पुनरावर्तिन - याची उपपत्ति रूप व्याख्या करून - आता मा उपेत्य पुनर्जन्म न विद्यते- याची तीनश्लोकानी व्याख्या करतात॥ तस्मात् अव्यक्तात् -म्हणजे चराचर स्थूल सर्व प्रपंचाचा कारण भूत जो मधुस्य वस्थापन्न हिरण्य गर्भ त्याहूनपरः अन्यः अव्यक्त य.भाव. अस्ति- म्हणजे व्यतिरिक्त किंवाश्रेष्ठ हिरण्यगर्भाचा ही कारणभूता हूनअन्यत विलक्षण आणिरूपादिक नसल्यामुळे जो चक्षुरादिकांस गोचर नाही असा आणि अविद्येने कल्पिलेली जी ब्रम्हदेवादि स्तंब पर्यंत चेतना चेतन कार्यें त्यांचेठाई-अस्ति -म्हणजे आहे अशाव्यवहारागम कारण भूत जें सद्रूप तेणे करून एकरूपाने राहिलेला आणि याचकारणानेनाम रूपाचा नाश झाला तरी नाश न पावणारा म्हणजे याचे उत्पत्तीने उत्पन्न होणारा असाजो नित्य परमात्मा आहे-सः सर्वेषुभूतेषु नश्यत्सु न नश्यति- म्हणजे तो हिरण्य गर्भादिक सर्वभूते नाश पावली तरी नाश पावत नाही। हिरण्यगर्भसूक्ष्म शरीरसमष्टि रूप जो कार्योपाधि तदभिमानी आहे यामुळे उपाधीचे नाशाने त्याचा नाश होतो। परमात्मा निरुपाधिक आहे यामुळे त्याचा

परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः॥ यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति॥ २०॥

अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम्॥ यं प्राप्य न निवर्तंते तद्धाम परमं मम॥ २१॥ ॥

नाश होत नाही। तो नित्यत्वआहे असे तात्पर्य॥ २०॥ तो रूपादिके करून रहित आहे यामुळे इंद्रियगोचर नाही यास्तव- अव्यक्तअक्षरः इति उक्तः- त्यास अव्यक्त असें म्हणतात आणि नाशरहित आहे यामुळे त्यास अक्षरब्रम्ह असे म्हणतात। तं परमां गतिमाहुः -हिरण्य गर्भपर्यंतच्या गति म्हणजे पावावयाची स्थाने आहेत ती उत्पन्न नाशपावणारी आहेत यास्तव त्या गति उत्कृष्ट नाहींत। परमात्मस्वरूप जे पावावयाचे स्थान तें नित्य आहे। ते प्राप्त झालें म्हणजे पुनर्जन्म नाही यास्तव त्या परमात्म्यास परमगति असें श्रुतिस्मृती सांगतात- यं प्राप्य न निवर्तंते -ज्या स्थानाप्रत जाऊन पुनः संसारांत जन्म होत नाही - तद् परमं मम धाम -म्हणजे ते उत्कृष्ट माझें स्वरूप म्हणजे तें मीच आहे। राहुशिरोरूपच आहे। शिराहून भिन्न नाही। तथापि राहूचें शिर असा लोकांत भेदाचे व्यवहार गौणकिंवा लाक्षणिक करतात तसाहा माझें धाम असाव्यवहार लाक्षणिक आहे॥ २१॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

याप्रमाणे निरुपाधिक अद्वितीय ज्ञेय ब्रम्हात्मतत्व सांगून त्याचे ज्ञान द्वारा मुक्तीसाठीं ज्ञान साधन भूतजें सर्व जगत्कारण सगुणब्रम्होपासन तें सांगण्या साठी आता– अनन्य चेता सततं योमां स्मरति नित्यशः॥ तस्याहं सुलभः पार्थ– एणे करून परमेश्वराविषयींचा जो भक्ति योग सांगितला तोच अद्वितीय ब्रम्हात्म तत्व ज्ञान द्वारा पर ब्रम्ह प्राप्तीस उपाय आहे असे सांगतात॥ हे पार्थ– सः परः पुरुषः अनन्यया भक्त्या लभ्यः– म्हणजे तो सर्व शरीराचे ठाई अंतर्यामि स्वरूपानें स्थित परमात्मा– ज्यांत उपास्य उपासक लक्षण भेद ही भासत नाहीं असें जें– मी ब्रम्हच आहें– असें जें उपासन तद्रूप भक्ती करून च प्राप्त होण्यास योग्य आहे। तु– शब्दाने दुसरे साधनांनी लभ्य नव्हे असें सूचविले। अनन्य भक्ती म्हणजे परमेश्वराचे ठाईं जी अव्यभिचरित प्रेम लक्षण भक्ति —— ती असे ही कोणी व्याख्यान करतात। तो परमात्मा कोण हें सांगतात। सर्वाणि यस्य अतःस्थानि– म्हणजे आकाशादिक सर्व भूते आणि त्यांचीं स्थावर जंगमात्मक सर्व भौतिक कार्यें बीजांत जसे वृक्ष राहतात त्याप्रमा

पुरुषः सपरः पार्थ भक्त्यालभ्यस्त्वनन्यया॥ यस्यांतस्थानि भूतानि येन सर्व मिदं ततं॥ २२॥

णें अंतस्थ आहेत म्हणजे ज्याच्या स्वरूपाचे ठाईं कारण रूपानें स्थित आहेत आणि– येन सर्वं इदं ततं अस्ति– म्हणजे ज्याणें हें सर्व जग उपादान कारणभूत सद्रूपानें व्यापिलें आहे म्हणजे त्याचे तादात्म्या ध्यासानें आहे –अज्ञासत्तेनें व्यवहारास योग्य झाले आहे॥ एणे करून त्या परमात्म्यास जगाचें कारणत्व सांगितले। हाच अर्थ– त्या परमात्म्याहून पर म्हणजे कारण अपर म्हणजे कार्य कोणी भिन्न नाही। ज्याहून फार अणु किंवा मोठा कोणी नाही। आपले प्रकाश मान स्वरूपाचे ठाईं वृक्षाप्रमाणे निश्चल जो एकच राहतो। त्या पुरुषाने सर्व हे विश्व व्यापिलें आहे। या जगाचे ठाईं जें काहीं पाहण्यात येते ऐकण्यात येतें त्या सर्वांचे आंत बाहेर व्यापून नारायण स्थित आहे– या अर्थाच्या श्रुतीनें प्रतिपादिला आहे॥ २२॥ ❀ ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ❀ ॥ श्रीनारायणार्पणमस्तु ॥ ❀ ॥ श्रीगोविंदार्पणमस्तु ॥ ❀ ॥

पूर्वोक्त सगुण ब्रम्होपासक ब्रम्हलोकाप्रत जाऊन पुनः परत येत नाहींत ते तेथेंच ब्रम्हात्म साक्षात्कार होऊन क्रमाने मुक्त होतात त्यांस ब्रम्हसाक्षात्कारापूर्वी ब्रम्हलोकीं जाण्यास मार्ग सांगितला पाहिजे यास्तव त्या उपासकास ब्रम्हलोक प्राप्ती साठी त्यांस देव यान मार्ग किंवा आर्चिरादि मार्ग म्हणतात त्याचा उपदेश करतात ॥ आसपितृयान मार्ग म्हणतात किंवा धूमादि मार्ग म्हणतात त्याचा उपदेश ही येथे देवयान मार्ग त्याहून श्रेष्ठ आहे अशी त्याची स्तुति करण्या साठी करतात। हे भरतर्षभ – यत्र काले प्रयाताः योगिनः – अनावृत्तिं आवृत्तिंच याति – तं कालं वक्ष्यामि – म्हणजे हे भरत कुलांतील श्रेष्ठा अर्जुना – ज्याकाली मरण पावलेले ध्यानयोगी पुनः परत येत नाहीत आणि कर्मयोगी पुनः परत येतात तो काल तुला सांगतों। असा या श्लोकाचा उत्तानार्थ दिसतो आणि यावरून उत्तरायणांत मरण पावलेले परत येत नाहींत आणि दक्षिणायनांत मरण पावलेले परत येतात अशी लोकांची समजूत आहे परंतु तो अर्थ वास्तविक नव्हे आणि येथेंही भगवंतानीं तसें सांगितले नाहीं। कारण ज्याकाली मरण पाव-

यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः ॥ प्रयाता यांति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥ २३ ॥

लेले असा – यत्र काले – याचा अर्थ विवक्षित आहे तर – अग्निः ज्योतिः धूमः – या पदांचा त्या अर्थीं अन्वय होत नाहीं आणि – नैते सृती पार्थ जानन् – एणेकरून दोन मार्गाप्रत जाणणारा असे पुढें सांगतात अशा या अर्थाचा आणि – शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वती मते ॥ एकया यात्यनावृत्तिमन्ययावर्तते पुनः – एणेकरून हे शुक्ल आणि कृष्ण असे दोन मार्ग आहेत। शुक्ल मार्गाने गेलेला पुनः परत येत नाहीं आणि कृष्ण मार्गाने गेलेला पुनः परत येतो असें पुढें सांगतात या अर्थाचा अन्वय होत नाही। यास्तव कालशब्दाची लक्षणा करून प्राणोत्क्रमणानंतर असा अर्थ करावा। यत्र काले म्हणजे शुक्ल कृष्ण पक्ष उत्तरायण दक्षिणायनादि कालांच्या आणि अग्नि ज्योति धूमादिकांच्या अभिमानी देवतानीं उपलक्षित म्हणजे त्या देवता ज्या मार्गाचे पर्वांत आहेत त्या मार्गानीं गेलेला ध्यानयोगी परत येत नाही आणि कर्मयोगी परत येतो असा जो देवयान मार्ग आणि पितृयान मार्ग त्याप्रत सांगतों। त्या मार्गांत कालाभिमानी देवता प्रमाणें अग्नि धूम यांच्या अभिमानी देवता असल्या तरीं कालाभि

मानी देवतापुष्कळ आहेत यास्तव काल शब्दानेच लक्षणेंकरून कालाभिमानी देवता आणि अग्नि धूमाच्या देवता यांनीं उपलक्षित मार्ग स्चविला। यास उदाहरण। ज्यावनांत आंब्याचे वृक्ष पुष्कळ आहेत। दुसरे ही वृक्ष आहेत परंतु थोडे आहेत। तेथें आंब्याचें वन किंवा आंब्याची बाग असा लाक्षणिक प्रयोग लोकांत करतात अथवा प्रातःकाळीं अग्निदेवता नसली तरी अग्नि- आणि सूर्य यांचे उद्देशाने हवीचा प्रक्षेप ज्यांत करतात अशा होमावर अग्नि आणि सूर्य यांतील एक देवतेचा वाचक जो अग्नि- शब्द त द्घटित अग्निहोत्र शब्दाचा वैदिक प्रयोग जसा आहे त्याप्रमाणे। जरी देवयानमार्गानें पंचाग्निविद्योपासक ब्रम्हलोकास जाऊनही परत येतात तथापि पितृयानमार्गाने गेलेले सर्वही पुनः परत येतात व ते कोणीही क्रमानें मुक्तिस जात नाहीत। देवयान मार्गानें जे ब्रम्हलोकास गेले त्यांतील जे परमेश्वराचे उपासक नव्हेत ते परत आले तरी जे परमेश्वरोपासक त्या मार्गानें ब्रम्हलोकास जातात ते क्रमानें मुक्त होतातच परत येत नाहीत। असा या श्लोकाचा विवक्षित अर्थ आहे आणि श्रीवेदव्यासानीं ब्रम्हसूत्रांत चतुर्थाध्यायीं सगुणब्रम्होपासक ब्रम्हलोकास कसे जातात त्यांस ब्रम्हलोकास जाण्याविषयीं उत्तरायणांतच मरण झाले पाहिजे असा नियम आहे कीं काय इत्यादिक विचार करून या श्लोकाचा जो अर्थ हा लिहिला त्याप्रमाणें सिद्धांत केला आहे। तो विचार त्यांचे टीकेंत म्हणजे भाष्यांत पुष्कळच विस्तृत आहे तथापि या प्रसंगानें त्याविषयीं संक्षेपाने लिहितों। सगुणब्रम्होपासकानी परमेश्वराचे निरंतर चिंतनरूप उपासन करावे असा विधि सांगून हृदयाचे ठायीं १०१ एकोत्तरशत नाडी आहेत त्यांतील एक नाडी मूर्ध्यापर्यंत म्हणजे तालुदेश पर्यंत गेली आहे ता स्थ सत्व ब्रम्हांड असें म्हणतात आणि ती नाभिचक्रास लागून आहे हृत्कमल अधोमुख आहे ते नाभिचक्रापर्यंत आहे आणि नाभिचक्रास संलग्न असून जी मूर्ध्यापर्यंत नाडी गेली आहे ती उर्ध्वमुख आहे तीस मूर्धन्य नाडी किंवा ब्रम्हनाडी म्हणतात। मरणकाली हृदयकमळांत जीव प्रविष्ट होऊन त्या नाडीचे द्वारा मूर्ध्यांतून बाहेर जातो आणि तेथून ब्रम्हलोकास जाण्याचा मार्ग पुढील श्लोकांत सांगावयाचा- आहे त्यांतील देवता आपल्यास नेतात इत्यादिक प्रतिदिवशी चिंतन करावें असें ईश्वरोपासनेचें अंगभूत चिंतन सांगितलें-

आणि त्याचिंतनाचे अभ्यासाने आणि ईश्वराचे जेचिंतनात्मक उपासनकेले त्यामुळे सर्व पापक्षय होऊन ईश्वराचे प्रसादाने मरण समयी त्या
मूर्धन्य नाडीतून मूर्ध्यावाहेर जीवाचें गमन होऊन प्रथम अर्चि म्हणजे सूर्य रश्मीत प्रवेश होतो नंतर पुढील श्लोकांत सांगितले मार्गानें तो ब्र-
म्हलोकास जातो असे सांगून जर परमेश्वरोपासक रात्री मरण पावेल तर रात्री सूर्य रश्मी नाहीत यामुळें तो देवयान मार्गाने जाणार नाही किं-
वा त्याणे दिवसाची प्रतीक्षा करावी अशी शंका करून जसा दोन ग्रामांस एक मार्ग मोठा संलग्न असतो तसे सूर्याचे रश्मि म्हणजे किरण-
या लोकास आणि परलोकास संलग्न झालेले आहेत ते हृदयांतील नाडी पासून सूर्या पर्यंत आणि सूर्या पासून हृदयांतील नाडी पर्यंत निरंत-
र व्याप्त आहेत याच कारणाने ग्रीष्मकालीं रात्रीही उष्मा होतो इत्यादिक अर्था च्या श्रुति आहेत यावरून रात्रीही हृदयातील नाडींचा आणि
सूर्य रश्मींचा संबंध आहे या कारणानें उपासक रात्री मरण पावला तरी मूर्धन्य नाडीचे द्वारा सूर्य रश्मीचे ठायीं जाऊन देवयान मार्गानें ब्रम्ह-
लोकास जातो। आणि रात्रीं मरण पावलेल्या उपासकास सूर्य रश्मींचा संबंध होत नाही असे म्हटलें तर उपासक मरण पावल्या नंतर सूर्य
रश्मीचे द्वाराच गमन करतो असा श्रुतीत नियम केला आहे तो विरुद्ध होईल। जर दिवसाची अपेक्षा केली तर मरणानंतर तत्काळ आदि-
त्य रश्मी प्रत जातो असे श्रुतीत सांगितलें आहे तेही विरुद्ध होईल आणि रात्री मरण पावणाऱ्या उपासकास सूर्य रश्मीचा संबंध
नाही या मुळें त्याला उपासनेचें फल देवयान मार्गाने ब्रम्ह लोक प्राप्ति होत नाही तर उपासनेचें फल संदिग्ध किंवा पाक्षिक म्हणजे दि-
वसास मरण होईल तर होईल रात्री मरण होईल तर होणार नाहीं असे झाले आणि अमुक वेळेस मरण होईल असा निर्णय तर को-
णास नाही या कारणाने कोणाचीही उपासनेविषयी प्रवृत्ति होणार नाही। उपासकांस तर मरणानंतर ब्रम्हलोक प्राप्ति निःसंशय होते
असें श्रुति सांगते या स्तव उपासक रात्री जरी मरण पावला तरीं सूर्य रश्मी द्वारा देवयान मार्गाने ब्रम्हलोकास जातो असा निर्णय-
करून - अतश्चायनेपि हि दक्षिणायने - या सूत्रानें रात्री मरणाचा न्याय दक्षिणायनांत मरण्याविषयीं योजावा असे श्री वेदव्यासा-
नी सांगितलें। त्याचें तात्पर्य भाष्यादिकांत लिहिलेलें संक्षेपाने लिहितो। दक्षिणायनात मरण पावलेला विद्वान म्हणजे दहरविद्यो-
पासक किंवा अहंग्रहोपासक पूर्वोक्त रीतीने मूर्धन्य नाडीचे द्वारा प्राणोत्क्रमण होऊन मरणानंतर सूर्य रश्मीशीं संलग्न होऊ-

न देवयानमार्गानें ब्रम्हलोकास जातोच। कारण पूर्वोक्त रीतीनें नाडी आणि सूर्यरश्मी यांचा संबंध जों पर्यंत देहांत प्राणआहे किंवा देह आहे तों पर्यंत अवश्य आहेच या कारणानें दक्षणायनांत मरण झालें यामुळे तो नाहीसा होत नाही आणि दक्षणायनांत मरण पावणारास अर्चिरादि मार्गानें ब्रम्हलोकास जाण्या विषयीं उत्तरायणाची प्रतिक्षा आहे असें ही संभवत नाहीं। तसें म्हटलें तर देहपाता नंतर तत्काल सूर्यरश्मीत जाऊन त्या द्वारा देवयान मार्गानें जातो असी फार त्वरा श्रुतीत सांगितली आहे तिचा विरोध येईल। दक्षणायनांत मरण पावला इतक्याच अपराधानें त्यास अर्चिरादि मार्ग प्राप्त होत नाहीं असी कल्पना केली तर उपासनांनें ब्रम्हलोक प्राप्तिरूप फल उत्तरायणांत मरण झालें तरच होतें दक्षणायनांत जर झालें तर होत नाहीं असें पाक्षिक होईल आणि अमुक वेळेस मरण होईल असा निश्चय तर कोणास नाहीं यामुळें त्या उपासने विषयीं कोणाची प्रवृत्ति होणार नाही। उपासनेचें फल ब्रम्हलोक प्राप्ति तर अवश्य होतें असें श्रुतीनें निःसंशय सांगितलें आहे। या सर्व कारणावरून दहराद्युपासक अहंग्रहोपासक इत्यादिक दक्षणायनांत मरण पावले तरीं देवयान मार्गानें ब्रम्हलोकास जाऊन क्रमानें मुक्त होतात — दिवा च शुक्लपक्षश्च उत्तरायणमेव च॥ मुमूर्षूणां प्रशस्तानि विपरीतं तु गर्हितं — या पुराणवचनानें दिवस शुक्लपक्ष उत्तरायण हे काल मरणारास प्रशस्त आहेत याहून विपरीत म्हणजे रात्र कृष्णपक्ष दक्षणायन हे काल मरणारास निंदित आहेत असे जे दिवा शुक्लपक्ष उत्तरायण या कालांत मरणाचें प्राशस्त्य सांगितलें आहे तें जे अविद्वान म्हणजे ब्रम्हात्म तत्व ज्ञानी नाहीत आणि जे पूर्वोक्त उपासक नव्हेत — असे जे अविद्वान आहेत त्याविषयींचें आहे। ज्ञान्याची किंवा उपासकाची सर्व पापादिक प्रतिबंधकाची निवृत्ति होते यामुळें त्यास उपासनेच्या फलाची प्राप्ति अवश्य होते यामुळें त्याविषयींचें नाही। आणि भारतांत भीष्म शरपंजरांत पडल्या नंतर मरणासाठीं उत्तरायण कालाची प्रतीक्षा त्याणें केली असें सांगितले आहे तेंही अविद्वानास उत्तरायणांत मरण अतिप्रशस्त आहे हें प्रसिद्ध करण्यासाठीच भीष्म स्वेच्छामरणी होता यामुळें लोकानुग्रह करण्यासाठी त्याणें उत्तरायणाची अपेक्षा केली याविषयींचेंच आहे। विद्वानाविषयींचें किंवा उपासका विषयींचें नाहीं॥२३॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥ श्रीनारायणार्पणमस्तु॥

उपासकास मरणानंतर ब्रम्हलोकास जाण्याचा देवयान मार्ग सांगतात। अग्निः ज्योतिः—या दोन पदांनी अर्चि म्हणजे सूर्यरश्मि त्याची अभिमानी देवता लक्षणेने घ्यावी। याप्रमाणें पुढेंही पदांची देवतावर लक्षणा आहे। अहः—म्हणजे दिवसाची अभिमानी देवता। शुक्लः—म्हणजे शुक्लपक्षाची देवता। षण्मासा उत्तरायण—म्हणजे षण्मासात्मक उत्तरायणकालाची देवता। हे उपलक्षण करून देवयान मार्गाचे प्रतिपादन करणाऱ्या श्रुतींत याशिवाय दुसऱ्या ज्या देवता सांगितल्या आहेत त्याही घ्याव्या। या सर्व देवता अतिवाहक देवता म्हणजे उपासकास ब्रम्हलोकास पोंचविणाऱ्या आहेत। त्या श्रुतीचा अर्थ लिहितों। उपासक मरण पावल्यानंतर प्रथम अर्चीची अभिमानी देवता जेथें आहे तेथें जातो। नंतर ती देवता जेथें दिवसाची देवता आहे तेथें त्यास पोंचविते। दिवसाची देवता जेथें आपूर्यमाणपक्ष म्हणजे ज्यात चंद्राच्या कळा वाढतात अशा शुक्लपक्षाची देवता आहे तेथे त्यास पोंचविते। शुक्लपक्षाची देवता उत्तरायण कालाची देवता जेथें आहे तेथे त्यास पोंचविते। उत्तरायण कालाची देवता जेथे संवत्सराची देवता आहे तेथें त्यास पोंचविते।

अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम्॥ तत्र प्रयाता गच्छंति ब्रम्ह ब्रम्हविदो जनाः॥ २४॥

संवत्सराची देवता जेथें देवलोकाची देवता आहे तेथे त्यास पोंचविते। देवलोकाची देवता जेथे वायुदेवता आहे तेथे पोंचविते। वायुदेवता आदित्यदेवता जेथें आहे तेथे पोंचविते। आदित्यदेवता जेथे चंद्रमादेवता आहे तेथें पोंचविते। आदित्य चंद्रमा—या शब्दाने त्यांची मंडले घ्यावी। चंद्रमादेवता विद्युत्‌देवता जेथें आहे तेथे त्यास पोंचविते। नंतर ब्रम्हदेवाचा जो मनुष्य नव्हे असा अमानवपुरुष तेथें येतो तो तेथून जेथें वरुण आहे तेथे त्यास घेऊन जातो। नंतर जेथें इंद्र आहे तेथें घेऊन जातो। नंतर जेथे प्रजापति आहे तेथें घेऊन जातो। विद्युदादि देवता तो अमानवपुरुष आला म्हणजे त्यास वाहत नाहींत परंतु तो पुरुष त्यास नेत असतां प्रतिबंध करीत नाहींत। प्रजापतिपर्यंत मार्गपर्वाची पूर्ती झाली। पर्वे म्हणजे मुक्कामाच्या जागा। यांस देवपथ किंवा ब्रम्हपथ असें म्हणतात। या मार्गानी गेलेले उपासक पुनः या मानव आवर्तांत म्हणजे जन्ममरण प्रवाहाचे भोंवऱ्यांत परत येत नाहींत असें श्रुतींत सांगितलें आहे। तेंच येथें सांगतात। तत्र प्रयाता ब्रम्हविद जना ब्रम्ह गच्छंति—म्हणजे त्या मार्गानें गेलेले परब्रम्हवेत्ते किंवा उपासक जीव कार्यब्रम्ह जो हिरण्यगर्भ त्याप्रत जातात॥ २४॥

सांगितलेले देवयान मार्गाचे स्तुतीसाठीं पितृयान मार्ग सांगतात। धूमः म्हणजे धूमाभिमानिनी देवता। रात्रिः म्हणजे रात्र्याभिमानी देवता। कृष्णः म्हणजे कृष्णपक्षाभिमानिनी देवता। षण्मासा दक्षिणा यनम्हणजे षण्मासात्मक दक्षिणायनाची देवता- हें उपलक्षण करून पितृयान मार्गांतील या देवतांशिवाय आणखी ज्या देवता आहेत त्या घ्याव्या। या सर्व देवता आतिवाहिक म्हणजे कर्मयोग्याला स्वर्ग लोकास पोचविणाऱ्याच आहेत। त्या श्रुतीचा अर्थ लिहितो। कर्मयोगी मरण पावल्यानंतर प्रथम धूमाभिमानिनी देवता जेथें आहे तेथें जातात। नंतर धूमाभिमानिनी देवता त्यांस जेथें रात्रीची देवता आहे तेथें पोचविते। रात्रीची देवता जेथें कृष्णपक्षाची देवता आहे तेथे पोचविते। कृष्णपक्षाची देवता षण्मासात्मक दक्षिणायनाची देवता जेथें आहे तेथें पोचविते। दक्षिणायनाची देवता जेथे पितृलोकाची देवता आहे तेथे पोचविते। पितृलोकाची देवता जेथें आकाशाची देवता आहे तेथें पोचविते।

धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनं ॥ तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५॥

आकाशाची देवता जेथें चंद्राचे ज्योति आहे अशा स्वर्ग लोकास पोचविते। तो चंद्र देवांचें अन्न आहे म्हणजे चंद्र अमृतमय आहे त्या अमृताचें भक्षण करून किंवा त्याला पाहून देव तृप्त होतात त्या स्वर्गलोकास गेल्यावर तेथें कर्मक्षय होई तों पर्यंत वास करून कर्मयोगी पुनः त्याच मार्गानें परत जन्मास येतो असें श्रुतींत सांगितले आहे तेंच इथे सांगतात। तत्र योगी चांद्रमसज्योतिः प्राप्य निवर्तते - म्हणजे सांगितलेल्या देवता ज्या मार्गांत आहेत त्या मार्गाने मरणानंतर गेलेले [illegible] पूर्तादिक कर्मे करणारा योगी म्हणजे श्रौत स्मार्त कर्म करणारा तसाच तळी-विहिरी-बागा-देवालयें-धर्मशाळा-ब्राम्हणभोजन इत्यादिक धर्मार्थ करणारा स्वर्गप्राप्त पाऊन कर्म क्षय झाल्यावर परत जन्मास येतो। यास्तव आवृत्ति मार्गापेक्षां अनावृत्ति मार्ग श्रेष्ठ आहे ॥ २५॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीनारायणार्पणमस्तु ॥ ॥ श्रीगोविंदार्पणमस्तु ॥ ॥

सांगितलेले दोन मार्गांचा उपसंव्हार करतात-म्हणजे सांगणें समाप्त करतात। एते शुक्ल कृष्ण गती-म्हणजे ब्रम्हलोकाचे प्राप्तीचे द्वारा ब्रम्हात्मतत्व ज्ञानाचा देवयानमार्ग साधन आहे म्हणून तो शुक्ल आणि पितृयानमार्ग ज्ञानाससाधन नाही म्हणून तो कृष्ण-असे हे शुक्ल कृष्णमार्ग-जगतः शाश्वती मते-म्हणजे जगातील उपासक आणि कर्मयोगी यांस ब्रम्हलोकास आणि स्वर्ग लोकास जाण्याचे-जगाचे अनादित्वामुळे अनादिसिद्ध आहेत। एकया अनावृत्ति याति-म्हणजे देवयानरूप जो मार्ग त्या मार्गाने ब्रम्हलोकास गेलेला उपासक पुनः परत येत नाही-अन्ययापुनः आवर्तते-म्हणजे दुसऱ्या पितृयान मार्गाने स्वर्गास गेलेला योगी पुनः परत येतो॥ २६॥ दहरोपासक-अहंग्रहोपासक इत्यादिकांनी पूर्वी सांगितल्याप्रमाणे ब्रम्होपासनांगत्वाने देवयानमार्गाने जसें गमन होईल असें त्यांचेही उपासन करावे यासाठीं त्यामार्गाचे ज्ञानाची स्तुतिकरतात। हे पार्थ एते सृती जानन् कश्चन योगी न मुह्यति-म्हणजे हे अ

शुक्लकृष्णेगतीह्येते जगतः शाश्वती मते॥ एकयायात्यनावृत्तिमन्ययावर्ततेपुनः॥ २६॥
नैते सृती पार्थ जानन् योगी मुह्यति कश्चन॥ तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन॥ २७॥

र्जुना या दोन मार्गांमध्ये एक क्रमसुक्तीसाठी आहे आणि एक पुनरावृत्तीसाठीं आहे असे जाणणारा कोणीही योगी उपासक धूमादि मार्ग फल देणाऱ्या कर्म मार्गाचे ठाई आसक्त होऊन योगभ्रष्ट किंवा योगा विषयींचा प्रयत्न अल्प करीत नाहीं। तस्मात् सर्वेषु कालेषु हे अर्जुन त्वं योगयुक्तो भव-म्हणजे याकारणास्तव सर्वकाल तूं पुनः जन्म न व्हावें यासाठी ध्यान योग निष्ठ हो॥ २७॥ ध्यानयोगावर फारश्रद्धा होण्यासाठीं त्याचे फल सांगून त्याची स्तुती करतात। वेदेषु-म्हणजे दर्भपवित्र हस्त आणि मान्धुरस अशी सुरूची सेवा करीत असता उत्तमप्रकारें करून वेदांचे अध्ययन केल्याने-यज्ञेषु म्हणजे अंग उपांगा सकट उत्तमप्रकारानें श्रद्धे करून यज्ञादिकांचे शास्त्रविध्युक्त अनुष्ठानाने-तपःसु म्हणजे मनोबुद्धीचे एकाग्रत्वें करून श्रद्धेने कृच्छ्र चांद्रायण मासोपवासादिक रूप तप केल्यानें-दानेषु म्हणजे पुण्यदेशीं पुण्यकाली सत्पात्रीं श्रद्धें करून केलेले तुलादिक मोठेमोठे दानानें-यत्फलं

म्हणजे त्याचें फल जें शोक मोह निवृत्ति होणे त्यासाठीं। परमंगुह्यअध्यात्मसंज्ञित-म्हणजे ज्यापासून निरतिशय पुरुषार्थ व अवस्था याचा असें आणि य-कश्चित् सामान्य मनुष्यासजे बोलावयाजोगे नाही असें आणि आत्मानात्मविवेक जापासूनउत्पन्न होतो असे-अशोच्यानन्वशोचस्त्वं-इत्यादिक सहाव्या अध्याय पर्यंत महावाक्यातील त्वंपदाचा अर्थ ज्यांत मुख्यत्वें करून प्रतिपाद्य आहे असें। यत् त्वया वचः उक्तं-म्हणजे जें परम कारुणिक आणि सर्वज्ञ तूं वचन बोललास। तेन मम अयं मोहः गतः-म्हणजे त्या वाक्याने हे भीष्म द्रोणादिक माझे हातून मरण पावतील मी यास मारीन इत्यादिक जो नानाविध मला मोह झाला होता तो आत्मा निष्क्रिय-नित्य-अकर्ता आहे असे जाणून सर्व नि:शेष गेला॥१॥ आणि महावाक्यातील तत्पदाचा अर्थ ज्यांत मुख्यत्वें करून प्रतिपाद्य आहे अशा सप्तमाध्यायापासून दशमाध्यायापर्यंत-हे कमलपत्राक्ष भूतानाम् भवाप्ययौ त्वत्तः विस्तरशः मया श्रुतौ-म्हणजे कमलपत्राप्रमाणें दीर्घ आणि ज्याचे प्रांत भाग आरक्त आहेत अशा महापुरुषाचे लक्षणानें युक्त आणि परम सुंदर आहेत नेत्र ज्याचे अशा कमलपत्राक्षा कृष्णा-सर्वभूतांचे उत्पत्ति आणि प्रलय तुजपासूनच होणारे आहेत असे सविस्तर तुजपासून मी ऐकिले। केवल तुजपासून होणारे भूतांचे उत्पत्ति प्रलय च ऐकिले असें नाही तर-अव्ययमाहात्म्यं अपि श्रुतं-म्हणजे विश्वसृष्ट्यादिक करीत असतांही तुला विकार नाहीं। जीवांपासून शुभाशुभ कर्मे करवीत असतांही तुला वैषम्य म्हणजे विषमभाव किंवा निर्दयत्वादिक तुला नाहीं। जीवास बंधमोक्षादिक विचित्र फल देत असतांही तूं असंग आणि उदासीनाप्रमाणें आहेस आणि तूं सर्वात्मा असतांही निरुपाधिक आहेस असें वाणीने वर्णावयाचे नाही आणि निरंतर राहणारे तुझें माहात्म्य ही ऐकिलें॥२॥

भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया॥ त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययं॥२॥

हे परमेश्वर त्वं आत्मानं यथा आत्थ एतत् एवमेव - म्हणजे ज्ञान ऐश्वर्य शक्ति बल वीर्य तेज या गुणांनीं युक्ता कृष्णा - तूं आपणास जगदाधारत्वादिक जें पूर्वी सांगितलें स तें तुझें निरतिशय ऐश्वर्य खरें आहे असें मी मानतो तुझे वचनावर माझा कोठें ही अविश्वास नाहीं तथापि । हे पुरुषोत्तम ते ऐश्वरं रूपं द्रष्टुं इच्छामि - म्हणजे क्षराक्षरातीता हे पुरुषोत्तमा कृष्णा - मायोपाधिक जो तूं ईश्वर तत्संबंधी जे सर्व विश्वात्मक मायामय रूप त्याप्रत पाहण्यास मी इच्छितो। सर्वभूतगुणांनी युक्त असें जें मला पाहतोस ही माया च आहे हे नारदा या प्रमाणे मला तूं जाणावयास योग्य नाहींस तरं हें मायामय रूप मिथ्या आहे असें जाणून शुद्ध सच्चिदानंद अद्वितीय स्वरूप मी आहे असें जाणावयास तूं योग्य आहेस असें विश्वरूप धारण करून नारदास दाखविणाऱ्या भगवंताचें वाक्य विश्वात्मक भगवंताचें रूप मायेनें कल्पिलेलें मायामय आहे याविषयीं प्रमाण आहे आणि एथें च पुरुषोत्तम आणि ऐश्वर या दोन पदांनीं सर्वभूतांस क्षर अशी संज्ञा आहे त्याहून अतीत जो पुरुष तो उत्तम पुरुष परमात्मा असें पंधरावे अध्यायांत सांगितलें आहे यावरून वि

एवमेतद्यथाऽत्थत्व मात्मानं परमेश्वर ॥ द्रष्टुमिच्छामि ते रूप मैश्वरं पुरुषोत्तम ॥ ३॥

मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ॥ योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययं ॥ ४॥

श्वातीत असतां ही ज्यास मायेनें विश्वरूप असें भासविलें आहे असा अर्थ सूचविला आहे । यावरून विश्वरूप मायामय च आहे ते ध्येय मात्र आहे। ज्ञेय रूप तर निरुपाधिक माया आणि मायेचें कार्यांचा ज्यास कालत्रयीं ही स्पर्श नाहीं असें अखंड सच्चिदानंदात्मक अद्वितीय रूप आहे असें जाणावें ॥ ३॥ मी पाहण्यास इच्छितो इतक्या करून च तें रूप मला दाखवूं नये। हे प्रभो योगेश्वर सृष्टिस्थिति संहार आणि तदुपयोगी आज्ञा करणाऱ्या सर्वांच्या ईश्वरा आणि योग्यांच्या ईश्वरा कृष्णा - तत् मया द्रष्टुं शक्यं यदि मन्यसे - म्हणजे या अर्जुनानें तें तुझें विश्वात्मक रूप पाहण्यास शक्य आहे असें जर तूं मानशील। ततः अव्ययं आत्मानं दर्शय - म्हणजे तर आपल्या अव्यय विश्वरूपा प्रत मला दाखीव। योगेश्वर या पदानें अणिमादिक आठ सिद्धि ज्यास आहेत असे जे योगी - त्यांचा तूं ईश्वर आहेस यामुळे तसें ही रूप मला डोळ्यांनी पाहण्यास मी योग्य होईन असें करण्यास तुला सामर्थ्य आहे असें सूचविलें ॥ ४॥

या प्रमाणें अत्यंतभक्त अर्जुनानें प्रार्थिलेला भगवान् आपले रूप पाहण्यास अर्जुनाला सावधान करीत हो त्साता बोलतो। हे पार्थ मे
नानाविधानि-म्हणजे हे अर्जुना अनेक प्रकारची। दिव्यानि म्हणजे लोकांत कधींही पाहिली नाहींत अशीं अति अद्भुत। नानावर्णाकृ
तीनि-म्हणजे शुक्ल कृष्ण पीतादिक अनेक वर्ण ज्यांचे आहेत आणि नानाप्रकारच्या आकृति ज्यांस आहेत अशीं। शतशः सहस्रशः
-म्हणजे अनंत माझीं रूपें पाहा॥ ५॥ दिव्य रूपें कोणतीं तीं सांगतात॥ हे भारता अर्जुना द्वादशादित्य-अष्टवसु-एकादशरुद्र-दे
वांचे वैद्य दोन अश्विनीकुमार-एकुणपंन्नास मरुद्गण-तसे याशिवाय दुसरे ही जे देव आहेत त्यांप्रत पाहा॥ अनंत नाना विध
रूपें सांगतात॥ बहून्यदृष्टपूर्वाणि-म्हणजे या मनुष्य लोकांचे ठाईं तूं किंवा दुसऱ्यानें कोणीं पाहिली नाहींत अशीं बहुत रूपें
पाहा। नानावर्णाकृति रूपें सांगतात। आश्चर्याणि-म्हणजे कोणास चार मुखें-कोणास पांच मुखें-कोणास सहा मुखें अशीं आश्च

श्री भगवानुवाच॥ पश्य मे पार्थ रूपाणि शतशोथ सहस्रशः॥ नाना विधानि दिव्यानि नाना वर्णाकृती
नि च॥ ५॥ पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा॥ बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत
॥ ६॥ इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरं॥ मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि॥ ७ ॥

र्य कारक अद्भुत रूपें पाहा॥ ६॥ केवळ इतकेच नाहींत तर माझे देहांत राहिलेलें सर्व जग ही पाहण्यास तूं योग्य आहेस असें सां
गतात। हे गुडाकेश मम इह देहे-म्हणजे हे निद्राजय करणाऱ्या अर्जुना-माझ्या या देहाचे ठायीं। कृत्स्न चराचर जगत्-म्हणजे स
र्व स्थावर जंगमात्मक विश्व। त्यात्याच्छली कोट्यावधि वर्षे भ्रमण केलें तरीं जें पाहण्यास शक्य नाही तें आता च। एकस्थं-म्हणजे ए
के अवयवरूपानें राहिलेलें म्हणजे माझे नखाग्रीं राहिलेलें असें पाहा आणि याशिवाय जें दुसरें जय कोणास होईल पराजय को
णास होईल अशा संशयाचे निरासासाठीं जे पाहण्यास इच्छिशील तें ही पाहा। अथवा कृत्स्नं-म्हणजे वर्तमान काल चे सर्व जग
पाहा आणि दुसरें अतीत म्हणजे गेलेलें आणि पुढे होणारे जग आणि हरी समोरचें जें नव्हे फार लांबचें स्थूल सूक्ष्म इत्यादिक जें पाह
ण्यास इच्छिशील तें सर्व पाहा॥ ७ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्री नारायणार्पणमस्तु ॥

जर तुझें विश्वरूप मी पाहण्यास समर्थ होईन तर मला दाखीव असें जें अर्जुन बोलला त्याविषयी सांगतात ॥ अनेनस्वचक्षुषा मां द्रष्टुं न शक्य

से - म्हणजे या स्वाभाविक सर्व साधारण चर्म चक्षूनें दिव्यरूपी जो मी यास तूं पाहावयास समर्थ नाहीस। यास्तव - ते दिव्य चक्षु ददा-

मि - म्हणजे तुला माझें दिव्यरूप पाहण्या जोगें अप्राकृत किंवा ज्ञानरूप चक्षु मी देतो। तेणे करून - मे ऐश्वरं योगं पश्य - म्हणजे मा

झें ईश्वर संबंधी सर्व जगदाधारत्वरूप अघटित घटना करणारें अशा सामर्थ्या प्रत पाहा ॥ ८ ॥ असें बोलून भगवंतानी आपलें दिव्य

प अर्जुनास दाखविलें। ते दिव्य रूप पाहून अर्जुनानें विस्मययुक्त होऊन भगवंताची प्रार्थना केली असें संजय माहाराज धृतराष्ट्रास

बोलतो ॥ हे राजन् एवं उक्त्वा ततः महायोगेश्वर हरि - म्हणजे हे राजा धृतराष्ट्रा तुला दिव्य चक्षु देतो असें बोलून नंतर त्यास दिव्य चक्षु

देऊन मोठे श्रेष्ठ जे योगी त्यांचा ईश्वर किंवा मोठे योगाचार्य ईश्वर भक्तांचा कुं शङ्कर करणारा भगवान हरी। पाहण्यास अशक्य असें आप

नतु मां शक्यसे द्रष्टु मनेनैव स्वचक्षुषा ॥ दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरं ॥ ८ ॥ संजय उवाच ॥

एवमुक्त्वा ततो राजन् महायोगेश्वरो हरिः ॥ दर्शयामास पार्थाय परमं रूप मैश्वरं ॥ ९ ॥ अनेकवक्त्र

नयन मनेकाद्भुतदर्शन ॥ अनेक दिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुध ॥ १० ॥ दिव्यमाल्याम्बरधर दिव्य

गंधानुलेपनं ॥ सर्वाश्चर्यमयं देव मनंतं विश्वतो मुखं ॥ ११ ॥ ॥ श्री कृष्णार्पणमस्तु ॥ ॥

लें - परम ऐश्वररूपं पार्थाय दर्शयामास - म्हणजे उत्कृष्ट आपलें ईश्वर संबंधी मायामय विश्वरूपाप्रत एकांत भक्त जो अर्जुन त्यास

दाखविता झाला ॥ ९ ॥ त्याच रूपाचें वर्णन करतो। अनेक म्हणजे अनंत आहेत मुखें आणि नेत्र त्या रूपाचे ठायीं आणि विस्मय करणारे अन

लौकिक पदार्थ अनंत ज्याचे ठायी दिसत आहेत असें आणि अनंत आहेत दिव्य भूषणे ज्याचे ठायी असे आणि दिव्य अनंत चक्रादि

क उचललेलीं आहेत आयुधे ज्याचे ठायीं असें ॥ १० ॥ आणि दिव्य पुष्पांच्या माळा हें उपलक्षण करून तशाच दिव्य रत्नांच्या माळा आणि

दिव्य वस्त्रें यांचें धारण ज्याणे केलें आहे आणि दिव्य चंदन केशरादिकांची उटी ज्यास केली आहे आणि आश्चर्यकारक सर्व पदार्थ

ज्यांत भरले आहेत असें आणि प्रकाशमान आणि ज्यास या देशीं या कालीं आहे या देशी या कालीं नाही असा देशकालाचा परि

ह नाहीं असें आणि सर्वत्र म्हणजे दशदिशेकडे आहेत मुखें ज्यास अशारूपानें दाखविता झाला असा पूर्वीचा अन्वय करावा॥
॥ ११ ॥ दिव्यं - एणे करून जे प्रकाशमय रूप सांगितलें त्याचें स्पष्टीकरण करतात ॥ दिवि सूर्यसहस्रस्य युगपत् उत्थिता यदि भाः
भवेत् - म्हणजे आकाशाचे गर्भी एककालीच अनंत सूर्यांचा समुदाय उदयास पाऊन त्यांची कांति जर एककालींच पसरपावे
ल। तर्हि सा तस्य महात्मनः भासः सदृशी स्यात् - म्हणजे तरती कांति महात्मा जो विश्वरूप परमेश्वर त्याचे कांतीशीं तुल्य हो
ईल। तशी जर कांति एककाळीं उत्पन्न होणार नाही तर मग भगवंताचे कांतीस उपमाच नाहीं असें निरुपम त्याविषयींच तात्प
र्य एथें ध्वनित होतें। अशा वर्णनास अभूतोपमारूप अतिशयोक्ति असें आलंकारिक म्हणतात। जें कधी झालें नाहीं त्याची
उपमा देऊन कोणाचें अतिशयोक्तीनें वर्णन करतात त्यास अभूतोपमारूप अतिशयोक्ति म्हणावें। त्या वर्णनाचें फळ वर्णन
करावयाचे वस्तूस उपमा नाही असें दाखविणें हेंच आहे॥ १२॥ या माझे देहाचे ठायीं सर्व जग एका अवयवरूपानें राहिलेले

दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता॥ यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः॥ १२॥
तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ॥ अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तदा ॥ १३॥ ॥

आहे ते पाहा असें भगवंतानीं अर्जुनास सांगितले त्याप्रमाणे अर्जुनानें पाहिलें असें संजय सांगतो॥ तदा पांडवः देवदेवस्य
तत्र शरीरे - म्हणजे त्याकाळीं पंडूचा पुत्र अर्जुन देवाचाही आराध्य देव जो भगवान त्याचे त्या विश्वात्मक शरीराचे ठायीं। अनेक
धा प्रविभक्तं - म्हणजे देव पितर मनुष्यादिक अनेक रूपानीं युक्त। कृत्स्नं जगत् एकस्थं अपश्यत् - म्हणजे अशा सर्व जगा मत
तें एके नखाचे अग्राचेच ठायी स्थित आहे असें पाहता झाला। एणे करून भगवत्स्वरूपाचे चिंतनाचा जो प्रकार भागवतांत सां
गितला आहे तो सूचविला। तो असा - प्रथमतः भगवताचे चतुर्भुज - पंचमुख - चतुर्मुख - कोणतेही मूर्तीचें चिंतन करण्या
चे अभ्यासानें त्या मूर्तीवर मन स्थिर झाले म्हणजे त्या मूर्तीचे दुसऱ्या अवयवांचें चिंतन न करतां सुंदर हास्ययुक्त जें भगवंताचें
मुख त्याचेंच चिंतन करावें। तेथें चित्त स्थिर झाले म्हणजे तेथून चित्त काढून अव्यक्त जें भगवताचें शरीर ज्यास अव्याकृता

काश म्हणतात त्यापासून हें सर्व जग उत्पन्न होतें यास्तव तें विश्वस्वरूपच आहे त्याचें चिंतन करावें। तेथें मन स्थिर झालें म्हणजे निर्वि कल्पस्वरूप जो मी सच्चिदानंदाद्वय परमात्मा त्याचे स्वरूपाचे ठायीं स्थित होऊन दुसरे कोणाचें ही चिंतन करूं नये। याप्रकारानें नाना विध भेदानीं विभागाप्रत पावलेल्या परमेश्वराचे स्थूल स्थूल विभूतीचे चिंतनानें तेथें मन स्थिर झाल्यानंतर त्या सर्व विभूतीप रस्पर विभक्त पणास्तोडून सूक्ष्म रूपानें जेथें ऐक्य पावतात असें जें परमेश्वराचें अव्यक्त विश्वात्मक एकच रूप त्याचें चिंतन करणें झालें। तुला दिव्य चक्षु देतों असें जें भगवंतानी सांगितलें तें स्थूल रूपाचें चिंतनानें अव्यक्त किंवा सूक्ष्म जें एकरूप त्याचे चिंतन करण्या जोगें मन तुला देतों म्हणजे तुझें मन तसें मी करतो असें तात्पर्य ठेवून सांगितलें। जसें सगुण ब्रम्होपासना प्रकरणीं त्या सगुण ब्रम्होपासकानें मन हेंच दिव्य चक्षु आहे त्या मनोरूप दिव्य चक्षूनें हा दोंकारांत म्हणजे अव्याकृत ब्रम्ह स्वरूपांतराद्वाणाऱ्या सर्व विषयाप्रत तो पाहतो असें श्रुतीत सांगितलें आहे। तसेंच एथें विवक्षित आहे। कथापक्षीं स्थूल दृष्टीनें उत्तानार्थ तर लिहिलाच आ

ततःसविस्मयाविष्टोहृष्टरोमाधनंजय ॥ प्रणम्यशिरसादेवंकृतांजलिरभाषत॥ १४॥

हे आणखी पुढें ही लिहूं॥ १३॥ ततः स. विस्मयाविष्ट. धनंजय –म्हणजे तें परमेश्वराचें रूप पाहिल्यानंतर अत्यद्भुत रूप पाहिल्या मुळें झालेला जो अलौकिक चमत्कार तेणें करून व्याप्त झालेला महादेवा बरोबर युद्ध करून महादेवास ज्याणें संतोषाप्रत पावविलें अशा प्रभावानें जो प्रसिद्ध तो धनंजय म्हणजे युधिष्ठिराचे राजसूय यज्ञांत उत्तर गांवीं ग्रहणांत सर्वांस जिंकून ज्याणें धन आणिलें अशा प्रख्यात प्रतापाचा धीर अर्जुन अथवा अतितेजस्वित्वामुळें केवळ अग्नि स्वरूपच तो अर्जुन भगवद्दर्शनानें झालेले सात्विक भावानें ज्याचे सर्व अंगा वर रोमांच उभे राहिले आहेत असा हो त्या तात्काळ देवं शिरसा प्रणम्य–म्हणजे तो विश्वरूपी जो नारायण त्याप्रत भक्ति आणि श्रद्धा यांचे अ तिशयानें नमस्कार करून कृतांजलिः–म्हणजे हात जोडून–अभाषत–म्हणजे बोलता झाला॥ १४॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीगोविंदार्पणमस्तु ॥ ॥ श्रीनारायणार्पणमस्तु ॥ ॥ श्रीवासुदेवार्पणमस्तु ॥

जें भगवंतानीं मला विश्वरूप दाखविलें तें सर्व लोकांस पाहावयास अशक्य जरीं आहे तथापि भगवंतानीं मला दिलेले दिव्य चक्षूने
तें मी पाहिले असा आपला अनुभव प्रगट करीत असता अर्जुन बोलतो॥ हे देव तव देहे देवान् पश्यामि- म्हणजे हे देवा तुझ्या या वि
श्वरूप देहाचे ठायी आदित्य वसु रुद्र अश्विनी कुमार या देवांप्रत मी नेत्रानी पाहतो। तथा भूत विशेष संघान् पश्यामि- म्हणजे
आणि जरायुज-अंडज-स्वेदज-उद्भिज-असे प्राणी किंवा जंगमा जंगम सर्व भूतें त्यांच्या समुदायाप्रत पाहतों आणि कमलास
नस्थं ब्रम्हाण- म्हणजे पृथिवी रूप कमळाचीजी मेरुरूप कर्णिका किंवा भोंवरा तिचे ठायीं स्थित किंवा भगवंताचे नाभिकमला
चे ठायीं स्थित आणि ईश म्हणजे जगाचा नियंता जो चतुर्मुख ब्रम्हदेव त्याप्रत नेत्रानी पाहतों आणि सर्व ब्रम्हपुत्रादिक ऋषीत
से दिव्य म्हणजे अप्राकृत कैलासादि स्थित वासुकी प्रभृति सर्प। च शब्दानें पातालस्थ प्राकृत अनंतादि सर्पाप्रत पाहतों॥१५
पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूत विशेषसंघान्॥ ब्रम्हाणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान्॥१५॥
अनेक बाहूदर वक्त्र नेत्रं पश्यामि त्वां सर्वतोनंतरूपं॥ नांतं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूपं॥१६॥
किरीटिनं गदिनं चक्रिणंच तेजोराशिं सर्वतो दीप्तिमंतं॥ पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समंतात् दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयं॥ १७॥
अनंत आहेत बाहू-उदरे- मस्तके-आणि नेत्रे ज्यास आणि सर्वत्र आहेत अनंत रूपे ज्याची असा जो तूं याप्रत मी पाहतों। प
रंतु हे विश्वाचे ईश्वरा- हे विश्वस्वरूपा- व्यापकस्वरूपामुळे दीर्घ रज्जुप्रमाणे तुझा शेवट आणि मध्य आणि आरंभ यांप्रत पा
हत नाहीं॥१६॥ त्याच परमेश्वराचे पुनः प्रकारांतरानें वर्णन करतो। किरीट-गदा-आणि सुदर्शन ही जाणे धारण केलीं आहे
त आणि तेजाचा पुंज आणि सर्वत्र ज्याची कांति पडली आहे आणि दिव्य चक्षूवांचून पाहण्यास जो शक्य नाहीं आणि प्रदी
प्त जो अग्नि आणि सूर्य यांच्या कांती प्रमाणे ज्याची कांति आहे आणि अगा आहे अशी ज्याची इयत्ता होत नाहीं। अशा पु
रुषाप्रत पाहतो। एणेकरून पूर्वोक्त शारवादिक नटस्थ लक्षण जसें चंद्राचे वास्तविक स्वरूप ज्ञानाला प्रयोजक होतें तसें सगुण ब्रम्ह
ज्ञान निर्गुण ब्रम्ह ज्ञानाला प्रयोजक होतें असें सूचविले॥१७॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥

या तुझ्या मोठ्या ऐश्वर्यावरून असें मी अनुमान करतो। वेदितव्यं परमं अक्षरं त्वं-म्हणजे अक्षरं ब्रह्मपरम-एणे करून जें मुमुक्षूनीं ज्ञे
य निरुपाधिक अक्षर परब्रम्ह सांगितलें ते तूंच आहेस। आता सगुण उपास्य ब्रम्हही तूंच आहेस असे सगुणरूपाचे वर्णन करून
बोलतो॥ त्वं अस्यविश्वस्य परं निधान-म्हणजे या सर्व विश्वाचा स्थितिकाली उत्कृष्ट आश्रय किंवा प्रलयकाली विश्रांतिस्थान तूंच
आहेस। याचकारणास्तव - त्व अव्यय.-म्हणजे नाशारहित आहेस। आणि- शाश्वत धर्म गोप्ता - म्हणजे वेदप्रतिपाद्य त्या स्वध
र्मनित्यजो धर्म त्याचें पालन करणारा अथवा-हे शाश्वत-म्हणजे नित्यस्वरूप तू धर्माचें पालन करणारा आहेस आणि -सनातन-
म्हणजे चिरतन जो पुरुष-म्हणजे जीव किंवा परमात्मा तो तूंच आहेस असें मी मानतो॥ १८॥ अनादिमध्यांत-म्हणजे उत्पत्ति
स्थिति नाश ज्यास नाहींत असा। आणि- अनंत वीर्य-म्हणजे अनंत आहे प्रभाव ज्याचा असा। आणि-अनंत बाहु-म्हणजे अनंत

त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानं॥ त्वमव्ययः शाश्वत धर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे॥ १८॥

अनादिमध्यांत मनंतवीर्य मनंतबाहुं शशिसूर्यनेत्रं॥ पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपंतं॥ १९॥

द्यावापृथिव्यो रिदमंतरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः॥ दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन्॥ २०॥

आहेत हस्त ज्यास असा आणि - शशिसूर्य नेत्र-म्हणजे चंद्र आणि सूर्य आहेत नेत्र ज्याचे असा आणि -दीप्तहुताशवक्त्रं-म्ह
णजे प्रदीप्त अग्नीच आहे मुख ज्याचे किंवा प्रदीप्त अग्नि आहे मुखाचे ठायीं ज्याच्या असा आणि- स्वतेजसा इदं विश्वं तपंतं-म्ह
णजे आपले तेजाने या विश्वास ताप देणारा जो तू या प्रत मी पाहतों॥ १९॥ हे महात्मन्-म्हणजे विश्वरूप देवा। इदं द्यावापृ
थिव्योः अंतरं सर्वाः दिशश्च एकेन त्वया व्याप्ताः - म्हणजे पृथिवी आणि स्वर्ग यांचे हें अंतर म्हणजे मध्यभाग आणि सर्व दि
शा तू एकट्याने व्यापिल्या आहेत। इदम् अद्भुत उग्रं तव रूप दृष्ट्वा लोकत्रय प्रव्यथित-म्हणजे हें अद्भुत आणि उग्र भयंकर
तुझे रूप पाहून स्वर्ग मृत्यु पाताल हे तीन्ही लोक व्यथे प्रत पावले आहेत॥ २०॥ ॥ श्रीनारायणार्पण मस्तु॥ ॥
॥ श्री कृष्णार्पण मस्तु॥ ॥ श्री वासुदेवार्पणमस्तु॥ ॥ श्री गोविंदार्पण मस्तु॥ ॥ श्री गोपाल कृष्णार्पण॥

भूभारसंहारकारि परमेश्वराचें रूप पाहून त्रैलोक्याला जी व्यथा झाली ती मागतो ॥ अमी सुरसंघाः त्वां विशंति- म्हणजे मनुष्य लोकीं भूभारहरणार्थ अवतरलेले हे आदित्य वसु आदिक देवांचे समुदाय युद्ध करीत असतां तुझ्यांठायीं प्रवेश करतात- अथवा- असुरसंघाः- असा पदच्छेद करून भूभारभूत जे दुर्योधनादिक असुरांचे अंश त्यांचे समुदाय तुजप्रत प्रवेश करतात। आणि दोन्ही सैन्यामध्ये पलायन करण्यास असमर्थ असून जे कोणी भीताः- म्हणजे भ्याले ते- त्वां प्रांजलयः गृणंति- म्हणजे दूरच उभे राहून अंजलिपुट जोडून- तुझा जय असो आम्हांचें रक्षण कर- अशी तुझी प्रार्थना करतात किंवा तुझी स्तुति करतात॥ आणि युद्ध उपस्थित झाल्यावर उत्पातादिक वाईट निमित्तें पाहून- स्वस्ति इति उक्त्वा- म्हणजे या जगास कल्याण असो असें बोलून। महर्षिसिद्धसंघाः- म्हणजे युद्ध पाहण्यास आलेले नारदादिक महर्षि आणि सिद्ध म्हणजे देवजातींतील भेद ते पुष्कलाभिः स्तुतिभिः त्वां स्तुवंति- म्हणजे ज्यांत परिपूर्ण अर्थ आहे अशा ज्या तुझ्या गुणवर्णनात्मक स्तुतिरूप वाणी त्यांहींकरून तुज

अमी हि त्वां सुरसंघा विशंति केचिद्भीताः प्रांजलयो गृणंति। स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः स्तुवंति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः॥२१॥

रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च॥ गंधर्वयक्षासुरसिद्धसंघा वीक्षंते त्वां विस्मिताश्चैव सर्वे॥२२॥

प्रत स्तवितात॥२१॥ आणि तुझा ज्यावर अनुग्रह आहे ते रुद्र-११ आदित्य-१२ वसु-८ साध्य या नावाचे देव- आणि विश्वेदेव आणि देवांचे वैद्य अश्विनीकुमार ज्यांस नासत्य दस्र असे म्हणतात आणि ४९ मरुद्गण- म्हणजे एकूणपन्नास मरुत् या नावाचे देव आणि ऊष्मप म्हणजे उष्ण —— भक्षण करणारे पितर। या सप्रमाण पितर ऊष्मप पितर आहेत या अर्थाची श्रुति आणि जोंपर्यंत अन्न उष्ण आहे आणि भाडीं बसलेले ब्राम्हण वाग्यत म्हणजे भाषण न करीत होत्साते त्या अन्नाचें भक्षण करतात आणि शाकपाकादिक अन्नें फार उत्तम रुचिकर स्वादिष्ट झालीं आहेत अशी जोंपर्यंत त्या रूपविरूप अन्नाची स्तुति भाडीं बसलेले ब्राम्हणांनी केली नाही तोंपर्यंत तें अन्न पितर भक्षितात अशा अर्थाची स्मृति आहे। आणि देवांचे गायक जे गंधर्व- यक्ष- असुर आणि सिद्ध यांचे समुदाय ते अलौकिक चमत्कार पाहून विस्मयानें युक्त होत्साते तुला पाहतात॥२२॥ ॥

हे महाबाहो-ते महत बहुवक्त्रनेत्रं बहुबाहूरुपादं-म्हणजे तुझे मोठ्या परिमाणाचे आणि अनंत आहेत मुखें आणि नेत्रें ज्यास आणि अनंत आहेत हस्त मांड्या पाद ज्यास आणि-बहूदरं बहुदंष्ट्राकराल-म्हणजे बहुत आहेत उदरें ज्यास आणि बहुत ज्या दाढा त्यांहींकरून भयंकर असें तुझें-रूप दृष्ट्वा-म्हणजे रूपाप्रत पाहून। लोका तथाअहं प्रव्यथित.-म्हणजे सर्व लोक भयानें व्यथेप्रत पावले आहेत आणि तसा मीही भयानें व्यथेप्रत पावलो आहें ॥ २३॥ रूपाला भयानकत्व कसें त्याचें वर्णन करून त्याचे पाहण्यानें झालेली आपली व्यथा सांगतो ॥ नभस्पृशं-म्हणजे स्वर्ग आणि पृथिवी यांचे जें अंतर त्यास व्यापून राहिलेलें आणि दीप्त-म्हणजे प्रज्वलित आणि अनेक वर्ण-म्हणजे रक्तपीतादिक अनेक वर्ण त्याचे आहेत आणि व्यात्तानन-म्हणजे पसरलेली आहेत मुखें ज्याची आणि-दीप्तविशालनेत्रं-म्हणजे अग्नीप्रमाणें प्रज्वलित आणि विशाल आहेत नेत्र ज्याचे अशा

रूपंमहत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादं॥बहूदरंबहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वालोकाःप्रव्यथितास्तथाहं ॥ २३॥

नभस्पृशंदीप्तमनेकवर्णं व्यात्ताननंदीप्तविशालनेत्रं॥दृष्ट्वा हित्वा प्रव्यथितान्तरात्माधृतिंनविंदामिशमंचविष्णो॥२४॥

दंष्ट्राकरालानिचतेमुखानिदृष्ट्वैवकालानलसन्निभानि॥दिशोन जानेनलभेचशर्म प्रसीददेवेशजगन्निवास॥ २५॥ ॥

-त्वां दृष्ट्वा-म्हणजे तुजप्रत पाहून। हे विष्णो-विश्वव्यापका देवा। प्रव्यथितान्तरात्मा-म्हणजे मोठ्या व्यथेनें युक्त झालें आहे अंतःकरण ज्याचें असा मी-धृतिं शमं च न विंदे-म्हणजे धैर्य आणि चित्ताची स्वस्थता याप्रत पावत नाहीं। विष्णो येणें करून तूं व्यापक आहेस यामुळें तुझे भयानक रूपानें युक्त देशासोडून पळून जाणें होत भवत नाही असें सूचविलें॥ २४॥ ते दंष्ट्राकरालानि कालानलसन्निभानि मुखानि दृष्ट्वा-म्हणजे अक्राळविक्राळ दाढांहीकरून जी भयंकर आणि प्रलयकाळचे अग्नीसारखी तुझी मुखें त्यांप्रत पाहूनच-दिशः नजाने-म्हणजे दिशाप्रत ही पूर्व ही दक्षिण ही उत्तर ही पश्चिम अशा भेदानें मी जाणत नाहीं मला दिक्भूल ——— झाली आहे। आणि शर्म नलभे-म्हणजे तुझे रूपाचें दर्शन झालें तरी सुख पावत नाही। यास्तव हे देवेश-हे जगन्निवास-मी जसा सुख पावेन असा प्रसन्न हो॥ २५॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥

आतां– यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि– एणेकरून यासंग्रामांत पुढें होणारे जे जयपराजय त्यांप्रत माझ्ये देहाचे ठायीं पाहा असें जें भगवंतानीं सांगितलें त्याप्रत पाहत होत्साता पांच श्लोकांनीं बोलतो॥ अमी धृतराष्ट्रस्य पुत्राः– म्हणजे हे धृतराष्ट्राचे पुत्र युयुत्सु शिवाय सर्व शंभर सोदर बंधु। अवनिपालसंघैः सहैव– म्हणजे पृथिवीचें पालन करणारे जे शल्यप्रभृति राजे त्यांचे समुदायासह वर्तमान। तुजप्रत त्वरेनें प्रवेश करतात असा पुढील श्लोकांतील क्रियेशीं अन्वय करावा। आणि ज्याविषयीं हे अजेय आहेत अशी सर्वांस संभावना आहे असे– भीष्म द्रोण– तसाच हा सूतपुत्र म्हणजे माझा विद्वेष्टा कर्ण– हे– आमचे कडील युद्ध करणाऱ्या मध्यें श्रेष्ठ धृष्टद्युम्नप्रभृति राजासुद्धा –दंष्ट्राकरालानि ते मुखानि त्वरमाणा विशन्ति– म्हणजे दाढांहीं करून भ-

अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसंघैः॥ भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ सहा-
स्मदीयैरपि योधमुख्यैः॥२६॥ वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति दंष्ट्राकरालानि भयानकानि
॥ केचिद्विलग्ना दशनान्तरेषु संदृश्यन्ते चूर्णितैरुत्तमाङ्गैः॥२७॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥

यंकर असणाऱ्या तुझ्या मुखाप्रत त्वरेनें युक्त होत्साते प्रवेश करताहेत। पापिष्ट धृतराष्ट्राचे पुत्र तुजप्रत प्रवेश करतात असें सांगितल्यावरून त्रैलोक्य शरीर भगवंताचे शरीरात प्रवेश करून त्यांतील त्यांस योग्य जें नरकस्थान त्याप्रत च जातात आणि भीष्मादिक जे भगवद्भक्त ते भगवंताचे मुखांत प्रवेश करतात असें सांगितल्यावरून दुर्योधनादिक आणि भीष्मादिक यांचे गतीचें वैलक्षण्य सूचविलें। चूर्णितैः उत्तमाङ्गैः केचित् दशनान्तरेषु संलग्नाः दृश्यन्ते– म्हणजे त्यांतील चूर्ण झाले ल्या मस्तकांनीं युक्त कोणी दांतांचे संधींत संलग्न झालेले दिसतात– म्हणजे ते थेंब लों बनात॥ २६॥ २७॥ ७ ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥श्रीगोविंदार्पणमस्तु॥ ॥श्रीनारायणार्पणमस्तु॥ ॥श्रीराधाकृष्णाभ्यां नमः

प्रवेशकसे करतात त्याविषयी दृष्टांत सांगतात ॥ यथानदीनां बहवः अंबुवेगा -म्हणजे अनेक मार्गांनी वाहणाऱ्या नद्यांचे उदकाचे समुदायज
से। समुद्रमेव अभिमुखा द्रवंति- म्हणजे समुद्राप्रत अभिमुख होत्साते प्रवेश करतात। तथा अमी नरलोकवीरा -म्हणजे तसेहे मनुष्य
लोकांतील युद्ध करणारे राजे। अभिविज्वलंति तेवक्त्राणि विशंति- म्हणजे आसमंतात् जाज्वल्यमान तुझ्या वक्त्राप्रत म्हणजे मुखाप्रत प्रवे
श करतात ॥ २८॥ अबुद्धिपूर्वक प्रवेशाविषयी दृष्टान्त सांगून बुद्धिपूर्वक प्रवेशाविषयी दृष्टांत सांगतात॥ यथा पतंगाः समृद्धवेगा संत.
नाशाय प्रदीप्तं ज्वलनं प्रविशंति -म्हणजे जसे पतंग मोठ्या वेगाने युक्त होत्साते आपल्या मरणासाठी बुद्धिपूर्वक प्रदीप्त अग्नीत प्रवेश करतात। त
थैव लोका समृद्धवेगा. संत. तवापि अभिविज्वलंति मुखानि विशंति- तसेच हे सर्व दुर्योधन प्रभृति राजे मोठ्या वेगेने युक्त होत्साते जाज्वल्यमा
न तुझ्या मुखात आपले मरणासाठी प्रवेश करताहेत॥ २९॥ भगवन्मुखात युद्धस्थ राजांच्या प्रवेशाचा प्रकार सांगून त्वळचे भगवत्स्वरूपानाज

यथा नदीनां बहवो ऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति। तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति ॥ २८॥

यथा प्रदीप्तं ज्वलनं पतंगा विशन्ति नाशाय समृद्धवेगाः ।तथैव नाशाय विशन्ति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः॥ २९॥

लेलिह्यसे ग्रसमानः समन्ताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः। तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो॥ ३०॥

आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद ॥ विज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम्॥ ३१॥

णि त्याच्या कांतीचा प्रकार सांगतात ॥ समग्रान् लोकान् ग्रसमान सन् ज्वलद्भि व . . . लेलिह्यसे - म्हणजे याप्रमाणे सर्व प्रवेश करणारे दु
र्योधनादिक जे लोक त्यांचा ग्रास करित असता जाज्वल्यमान मुखाही करून त्याप्रत चाटितोस। हे विष्णो ते उग्रा. भासः तेजोभिः सर्वं जगत् आ
पूर्य प्रतपंति- म्हणजे हे व्यापक विश्वरूप परमेश्वरा तुझ्या या दीप्ति आपल्या तेजाही करून सर्व जगाला व्यापून तापविताहेत॥ ३०॥ भवान् उग्र
रूपः कः तत् मे आख्याहि- म्हणजे उग्ररूप तू कोण आहेस ते मला सांग। ते नमः अस्तु- म्हणजे सर्व गुरू जो तू त्याला नमस्कार असो। हे दे
ववर प्रसीद- म्हणजे हे देवांत श्रेष्ठा प्रसन्न हो। आद्यं भवंतं विज्ञातुं इच्छामि- म्हणजे जगास आद्य कारण जो तू त्याप्रत विशेषरूपाने जाणा
वयास मी इच्छितो। मी तुझा सखा जरी आहे तथापि तू याप्रमाणे कशासाठी प्रवृत्त झाला आहेस हे मी जाणत नाही ॥ ३१॥ ॥

याप्रमाणें अर्जुनानें प्रार्थिलेले श्रीभगवान् सांगतात॥ अहंप्रवृद्ध लोकक्षयकृत् कालोस्मि-म्हणजे मी क्रिया शक्तीकरून उपहित म्ह-
णजे त्याउपाधीनीं युक्त सर्व संहार कर्ता काल रूपी परमेश्वर आहे। इह लोकान् समाहर्तुं प्रवृत्त.-म्हणजे यासंग्रामाचे ठायीं दुर्योध-
नादिक सर्व योध्यांचा संहार करण्यासाठीं प्रवृत्त झालो आहें। ऋतेपि सर्वे नभविष्यंति-म्हणजे युद्ध करणाऱ्या तुझ्या युद्ध रूपव्या-
पारा वांचूनही हे सर्व भीष्मादिक आणि शत्रु सैन्याचे ठायी जे युद्धार्थ उभे राहिले आहेत ते सर्वही काल रूपी जो मी याणे मारल्याप्र-
माणेंच आहेत ते मरण पावतील। यांच्या मारण्याविषयी तुझा व्यापार निरर्थकच आहे॥ ३२॥ तस्मात् त्वं उत्तिष्ठ यशः लभस्व-म्ह-
णजे याकारणास्तव तूं युद्धार्थ उठून देवानींही जिंकण्यास अशक्य असे जे भीष्म द्रोणादिक अतिरथी यांस अर्जुनाने जिंकलें असें
यश संपादन कर। आणि-शत्रून जित्वा समृद्धं राज्यं भुंक्ष्व-म्हणजे दुर्योधनादिकांस जिंकून ज्यांत शत्रु नाहींत असे किंवा धन धा-

श्रीभग॰॥ कालोस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः॥ ऋतेपि त्वां नभविष्यंति सर्वे येवस्थिताः प्रत्यनीकेषु यो
धाः॥ ३२॥ तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून् भुंक्ष्व राज्यं समृद्धं॥ मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाची
न्॥ ३३॥ द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधमुख्यान्॥ मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युध्यस्व जेतासि रणे सपत्नान्॥ ३४

न्य समृद्ध अशा राज्याचा उपभोग कर। एते मयैव निहता हे सव्यसाचिन् त्वं निमित्तमात्रं भव-म्हणजे काल रूपी जो मी ईश्वर या-
णे युद्धा पूर्वीच हे सर्व तुमचे शत्रु मारले आहेत। वाम आणि दक्षिण या दोन्हीं हातांनी बाण संधान किंवा लक्ष्यवेध करण्याचा ज्याचा
स्वभाव आहे अशा हे अर्जुना या युद्धांत या शत्रूंचे नाशाविषयीं तूं निमित्तमात्र हो॥ ३३॥ भीष्म-द्रोण-जयद्रथं-कर्णं-तथा अन्या-
नपि योधमुख्यान् मया हतान् त्वं जहि-म्हणजे तुला ज्याविषयी शंका आहे ते हे भीष्म आणि द्रोण आणि जयद्रथ तसाच कर्ण
आणि दुसरे युद्ध करणाऱ्यांत मोठे मोठे आहेत ते काल रूपी जो मी याणें मारलेच आहेत त्यांप्रत तूं जिंक। मा व्यथिष्ठाः-म्हणज-
जे मारलेल्यास मारण्याचा श्रमच नाहीं यास्तव मी यांस मारण्यास कसा समर्थ होईन अशा भीती मुळे व्यथेप्रत पाऊं नको-युध्य
स्व-म्हणजे युद्ध कर। रणे सपत्नान् जेतासि-म्हणजे संग्रामाचे ठायी सर्व शत्रूंस तूं जिंकणारा आहेस किंवा होशील। द्रोणच

भीष्मं च जयद्रथं च- या तीन चकारांनीं पूर्वोक्त अर्जुनाच्या शंकेचा अनुवाद केला आणि पुढील तथा शब्दानें आणि अपि शब्दाने- त्या शंकेचा अनुवाद केला ॥ ३४॥ तदनंतर काय झालें ते संजय धृतराष्ट्रास सांगतो ॥ एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य- म्हणजे याप्रमाणें पूर्वोक्त कृष्णाचे वचन ऐकून । वेपमान किरीटी- म्हणजे दैत्यांचे शत्रु जे निवातकवचादिक त्यास स्वर्गलोकीं गेल्यावर अर्जुनानें मारल्यावर इंद्र प्रसन्न होऊन त्याचे मस्तकावर इंद्राने किरीट घातला तो अर्जुन कंपायमान होत्साता । कृतांजलिः कृष्णं नमस्कृत्वा- म्हणजे हस्तांचा अंजलिपुट करून भक्तांचे पापांचें आकर्षण करणाऱ्या कृष्णाप्रत नमस्कार करून । भीतभीतः प्रणम्य सगद्गदं भूय एवाह- म्हणजे भयभीत होत्साता पुनः दीनत्वभावानें नमस्कार करून गद्गदस्वर ज्यांत आहे अशा वाक्यानें पुनः कृष्णाप्रत बोलता झाला । भयानें किंवा हर्षानें नेत्रास अश्रु येऊन कफानें कंठ अवरुद्ध झाला म्हणजे वाणीला जो मंदत्व आणि कंपयुक्तत्वविकार होतो त्यास गद्गदस्वर म्हणतात ॥ ३५॥ अर्जुन अकरा श्लोकांनी बोलतो ॥ हे हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत् प्रहृष्यति तत् स्थाने- म्हणजे हे सर्वेंद्रियप्रेरका कृष्णा तूं अत्यंत अद्भुतप्रभावाचा आहेस आणि भक्तवत्सल आहेस अशा तुझ्या उत्कृष्ट कीर्तीनें जग हर्ष पावतें ते युक्तच आहे । आणि- अनुरज्यते च- म्हणजे तुझ्या नामसंकीर्तनेंकरून जग तुझ्याठायीं निरतिशय प्रेम करते ते ही युक्तच आहे । आणि- रक्षांसि भीतानि दिशो द्रवंति तत् स्थाने- म्हणजे तुझ्या नामसंकीर्तनेंकरून राक्षस भयभीत होत्साते दशदिशांकडे पळतात ते ही युक्तच आहे । आणि- सर्वे सिद्धसंघा नमस्यंति तत् स्थाने- म्हणजे सर्व कपिल मुन्यादिक सिद्धांचे समुदाय तुला नमस्कार करतात तें युक्तच आहे । ह्या श्लोकरक्षोघ्नमंत्र म्हणून मंत्रशास्त्रांत जो प्रसिद्ध आहे तो नारायणाष्टाक्षर मंत्र आणि सुदर्शनास्त्रमंत्र यांहींकरून युक्त करून जपावा म्हणजे राक्षसादिकांचा नाश होतो । नारायणाष्टाक्षरमंत्र प्रसिद्ध

संजय उवाच ॥ एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृतांजलिर्वेपमानः किरीटी ॥ नमस्कृत्वा भूय
एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥ ३५॥ स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्र
हृष्यत्यनुरज्यते च ॥ रक्षांसि भीतानि दिशो द्रवंति सर्वे नमस्यंति च सिद्धसंघाः ॥ ३६॥

त्व आहे। सदस्याक्षर ॐ फट् स्वाहा हा सद्दुर्दाना स्त्र मंत्र ॥ ३६॥ ते सिद्ध समुदाय माझे प्रमाणें हजारो ब्रम्हांडें उत्पन्न करण्यास सम र्थ असतां ते मला कां नमस्कार करतात त्याविषयीं बोलतो॥ हे महात्मन् गरीयसे ब्रम्हणोपि आदिकर्त्रे ते कस्मान्न नमेरन् - म्हणजे हे परमोदारचित्त सर्वांचा स्रष्टा जो ब्रम्हदेव त्याचा जो आदिकर्ता सर्वाहून मोठा तू या प्रत ते सिद्ध कां नमस्कार करणार नाहींत। तात्पर्य। तूं नित्य सिद्ध आहेस ब्रम्हदेवादिक तुझ्या उपासनेने सिद्ध होऊन तुझ्या आज्ञे करून जगाचे निर्माण कर्ते होतात या कारणा स्तव - हे अनंत हे देवेश हे जगन्निवास - म्हणजे देशकालांचा परिच्छेद ज्यांस नाही सर्व देवांचाही जो नियंता सर्व जगाचें राहण्या चे जें स्थान अशा परमेश्वरा तूं। सत् असत् - म्हणजे आहे असे विधिमुखाने जें भासतें आणि नाहीं असें जें निषेधमुखानें भासतें तें तूं। अथवा सत - म्हणजे व्यक्त झालेलें कार्य आणि अव्यक्त - म्हणजे प्रलयकाली कारणभूत सूक्ष्म रूपाने राहिलेले कार

कस्माच्च ते न नमेरन् महात्मन् गरीयसे ब्रम्हणोप्यादिकर्त्रे ॥ अनंत देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥ ३७॥

त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानं ॥ वेत्तासि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनंतरूप ॥ ३८॥

ण तें तूं। आणि तत्परं - म्हणजे त्या सताहून आणि असताहून ही सूक्ष्म म्हणजे मूलकारण ते तू म्हणजे कार्य आणि कारण याहून निराळें - अक्षर म्हणजे अक्षर ब्रम्ह तू आहेस। तुझे सत्तेने सर्व आहे - अशा व्यवहारास आलें आहे तुझे सत्तेवांचून दुसरी सत्ता नाहीं असें तात्पर्य ॥ ३७॥ पुनः स्तव करतो ॥ त्व आदिदेवः - म्हणजे सर्वांची सृष्टी करणारा तूं आदिदेव आहेस। पुराणः पुरुष म्हणजे सर्व जीवांचे शरीरात शयन करणारा आणि त्या शरीरांच्या नाशाने ज्याचा नाश नाही असा तू नित्य पुरुष आहेस। त्वं अस्य विश्वस्य परं निधानं - म्हणजे तूं या विश्वाचे प्रलयकालीं विश्रांति स्थान आहेस। हे विश्व तुझे ठायी प्रलय पावते या प्रमाणें उत्पत्ति आणि लय यांचें कारणत्व सांगून ब्रम्हाला जगाचें उपादानकारणत्व सांगितले। आता घटादिकांस उपादानकारण मृत्तिकेपेक्षां निमित्तकारण चेतन कर्ता कुलाल जसा आहे त्याप्रमाणें या जगास उपादानकारण ब्रम्हापेक्षां निमित्तकारण दुसरा कर्ता आहे किंकाय अशी शंका होऊं नये या साठी कर्तृत्वरूप निमित्तकारणत्वही ब्रम्हालाच सर्वज्ञेश्वर रूपानें सांगतात।

त्वं वेत्तासि - म्हणजे सर्वजगाचा ज्ञाता तूंच आहेस। जो ज्ञाता तोच कर्ता असतो तर जग निराळें त्याचा जाणणारा निराळा असें द्वैत आहे कीं काय अशा शंकेचें वारण करतात। वेद्यंच - म्हणजे जाणावयाचें जग तूंच आहेस। वेदनरूप जो तूं अधिष्ठान त्याचे ठायीं सर्व कल्पिलें आहे यामुळे अधिष्ठानभूत तुझे सत्ते शिवाय निराळी सत्ता नाहीं। तुझे सत्तेनेंच हें - अस्ति - अशा व्यवहारास पात्र आहे। आणि परंच - धाम - म्हणजे वेद्य आणि वेत्ता याहून निराळें शुद्ध अद्वितीय चैतन्यात्मक मुक्त प्राप्य ब्रम्ह तूं आहेस। हे अनंत रूप - म्हणजे त्रिविधपरिच्छेदरहित स्वरूपा देवा। त्वया इदं विश्वं ततं - म्हणजे तूं आपले सत आणि चित् रूपाचे योगानें हें सर्व जग - अस्ति - भासते अशा व्यवहारास योग्य केलें आहेस॥ ३८॥ आतां सर्व देवता स्वरूपानें भगवंताची स्तुति करितो। वायु - यम - अग्नि - वरुण - शशांक म्हणजे चंद्र - हे उपलक्षण करून सूर्यादिक आणि प्रजापति म्हणजे विराट् आणि हिरण्यगर्भ आणि हिरण्यगर्भाचाही पिता सर्वांचा पिता महत्तूं आहेस यास्तव सर्वात्मक ही तूं नमस्कार करण्यास योग्य सर्वात्मक आहेस

वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च। नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते॥ ३९॥

नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व। अनंतवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः॥ ४०॥

यास्तव तुला हजार वेळ मी नमस्कार करतो आणि पुन पुन नमस्कार करतों। नमस्काराच्या आवृत्तीनी अत्यातिशय सूचविला॥ ३९॥ हे अनंतवीर्य अमितविक्रमः त्वं यतः सर्वं समाप्नोषि ततः सर्वः, असि - म्हणजे अनंत आहे शरीरबल ज्याचें अशा परमेश्वरा अपरिमित आहे युद्ध शिक्षा शास्त्र कौशल्यादिक ज्याचें असा तूं एक सद्रूप स्फूर्तिरूपानें या सर्व जगास सत्ता स्फूर्ति व्यवहारास्पद करतोस यास्तव तूं सर्व स्वरूपच आहेस। तुझेवाचून दुसरी सत्ता नाहीं यास्तव कर्मांचे आरंभीं आणि त्यांचे समाप्तीचे ठायीं अथवा सर्वांचे आरंभीं आणि अंतीं राहणारा जो तूं यास नमस्कार असो। अथवा तुला पूर्वभागीं आणि पृष्ठभागीं नमस्कार असो। हे सर्वस्वरूप सर्वत एव म्हणजे तुला सर्वदेशीं नमस्कार असो। अथवा सर्वदिशांचे ठायीं राहणारा जो तूं यास नमस्कार असो। एकंप्राणाधिकं मन्ये अपरं शिक्षयाधिकं - यावत सांगितल्याप्रमाणें भीम बलेंकरून अधिक दुर्योधन युद्धशिक्षा शास्त्रकौशल्यानें अ-

धिक असें वीर्य किंवा पराक्रमादिक एकेक कास जसें आहे त्याप्रमाणें परमेश्वर नाहीं तर अनंतवीर्य अनंत पराक्रम आहे असें अनंतवीर्या मित विक्रम—या पदानीं सूचविलें ॥ ४०॥ अशी स्तुति करून आपण केलेले अपराधांची क्षमा मागतो ॥ तव इमं महिमानं अजानता—म्हणजे तुझ्या या विश्वरूपात्मक महिम्याप्रत न जाणणारा जो मी याणें। तूं माझा समान वयस्क सखाच आहेस असें मानून प्रसभ—म्हणजे आपला उत्कर्ष दाखवून तुझा पराभव केल्याप्रमाणें। हे कृष्ण यादव हे सखेति—म्हणजे अरे कृष्णा अरे यादवा अरे माझ्या सख्या असे जे मी तुला—प्रमादात् प्रणयेन वा यत् उक्त—म्हणजे गैरसावधपणानें किंवा चित्ताचे विक्षेपानें अथवा स्नेह करून जे काय तुला बोललों ॥ ४१॥ आणि विहारशय्यासनभोजनेषु—म्हणजे क्रीडा करतांना किंवा फिरतांना एके शय्येवर निजतानां किंवा सिंहासनावर बसतानां किंवा पंक्तीत भोजन करताना। एकः अथवा तत्समक्षं—म्हणजे स-

सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ॥ अजानता महिमानं तवेमं मया प्रमादात् प्रणयेन वापि ॥ ४१॥
यच्चावहासार्थमसत्कृतोसि विहारशय्यासनभोजनेषु ॥ एकोथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयं ॥ ४२॥
पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ॥ न त्वत्समोस्त्यभ्यधिकः कुतोन्यो लोकत्रयेप्यप्रतिमप्रभावः ॥ ४३॥

ख्यांवाचून एकांत स्थळीं तू आणि मीच असतानां अथवा सख्यासमक्ष सखे हसत असतानां। अवहासार्थं—म्हणजे थट्टा मस्करीनें। यत् असत्कृतोसि—म्हणजे जो काय तुझा मी असत्कार—म्हणजे अपमान केला असेल किंवा असत्काराप्रमाणें भाषण बोललो असें न त्या सर्वापराधांची। अप्रमेयं त्वां क्षमापये—म्हणजे अचिन्त्यप्रभाव जो तू त्यापाशीं मी क्षमा मागतो। अचिंत्यप्रभाव तूं निर्विकार आणि करुणासमुद्र आहेस यास्तव तुझ्या माहात्म्याप्रत न जाणणारा जो मी याच्या सर्वापराधाची क्षमा करण्यास तूं योग्य आहेस ॥ ४२॥ भगवंताच्या अचिंत्य प्रभावाचें वर्णन करतो ॥ अस्य चराचरस्य लोकस्य त्व पिता असि—म्हणजे सर्व चराचर विश्वाचा तू पिता आहेस। यास्तव आमच्या शिशूचा अपराध क्षमा करावा हें तुला योग्यच आहे। पूज्यः गरीयान् गुरुश्च—म्हणजे आणि सर्वेश्वरत्वास्तव तूं पूज्य आहेस आणि ब्रम्हदेवास ही वेदोपदेश तू केला सयासुळें अतिशयित श्रे

ष्ठ सर्वांचा तूं गुरू च आहेस। यास्तव अप्रतिमप्रभाव न त्वत्समः अन्यः कोपि-म्हणजे तुझ्यासारखा अचिंत्यप्रभाव कोणी दुसरा नाही। मग-कुतः अभ्यधिकः-म्हणजे तुझ्याहून अधिक कोठून असेल॥ ४३॥ तस्मात् काय प्रणिधाय प्रणम्य-म्हणजे याकारणास्तव शरीर भूमीवर दंडाप्रमाणें ठेवून आणि नमस्कार करून। ईड्यं ईश त्वा प्रसादये-म्हणजे सर्वांस स्तुति करण्यास योग्य जो तू ईश्वर त्या प्रत मी अपराधी प्रसाद मागतों। पिता पुत्रस्येव-म्हणजे पुत्राचा अपराध पिता जसा पोटांत घालतो। सख्युः सखेव-म्हणजे सख्याचा अपराध जसा सखा पोटांत घालतो। प्रियायाः प्रियइव-म्हणजे पतिव्रता जी आपली प्रिय पत्नी तिचा अपराध जसा पति पोटांत घालतो। त्याप्रमाणें देवा माझ्या अपराधाची क्षमा करून माझा अपराध आपले पोटांत घालण्यास तूं योग्य आहेस॥ ४४॥ याप्रमाणे भगवताची स्तुति करून आपल्या मनांत जे इष्ट आहे त्याविषयी प्रार्थना करतो॥

तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यं॥ पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुं॥ ४४

अदृष्टपूर्वं हृषितोस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे॥ तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास॥ ४५॥

किरीटिनं गदिनं चक्रहस्त मिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव॥ तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते॥ ४६॥

अदृष्टपूर्वं रूपं दृष्ट्वा हृषितोस्मि-म्हणजे कधींही न पाहिलेले असें हें विश्वरूप पाहून मी हृष्ट म्हणजे संतोषी किंवा हर्षित झालों। आणि-भयेन मे मनः प्रव्यथितं-म्हणजे विकृत भयंकर रूप पाहिल्यानें जें भय झालें तेणें करून माझें मन व्यथेप्रत पावलें आहे। हे देव तदेव रूपं मे दर्शय-म्हणजे देवा तुझें प्राणापेक्षां ही मला प्रिय असे जें तुझें पूर्वींचे चतुर्भुज श्रीकृष्णरूप तें मला दाखीव। हे देवेशा प्रसन्न हो। हे जगन्निवासा प्रसन्न हो॥ ४५॥ त्या पूर्वींचे रूपाचें वर्णन करतो॥ किरीटिन-म्हणजे ज्याचे मस्तकावर किरीट आहे। गदिनं चक्रिणं-म्हणजे ज्याच्या हातांत कौमोदकी गदा आणि सुदर्शन चक्र आहे आणि-तेजोराशिं सर्वतो दीप्तिमंत-म्हणजे जो तेजाचा केवळ पुंजच आहे आणि सर्वत्र ज्याची दीप्ति म्हणजे कांति पसरली आहे। अशा त्वां-म्हणजे तुज प्रत। तेनैव-म्हणजे चतुर्भुजेन रूपेण द्रष्टुं इच्छामि-म्हणजे पूर्वींच्या चतुर्भुज रूपानें मी पाह

ण्यास इच्छितों। हे सहस्रबाहो विश्वमूर्ते तेनैव रूपेण युक्तो भव - म्हणजे हे अनंत हस्त हे विश्वरूप त्या चतुर्भुजादिकांनीं
म्य पूर्वीच्या रूपानें युक्त हो। एणें करून भगवंताचें चतुर्भुज रूप अर्जुनास सदा गोचर होतें असें होतें॥ ४६॥ याप्रमाणें अर्जुनानें
नें प्रार्थिलेले भगवान प्रसन्न होऊन अर्जुन भय पावला आहे असें पाहून त्या कालीं उचित वचनानें त्याचें आश्वासन करीत
त्याते बोलतात॥ हे अर्जुन प्रसन्नेन मया आत्मयोगात् - म्हणजे हे अर्जुना तुजविषयीं अतिशय कृपा ज्यास उत्पन्न झाली आहे
असा जो मी याणें आपले असाधारण सामर्थ्यानें। तव इदं रूपं दर्शितं - म्हणजे तुला हे मीं आपलें विश्वरूप दाखविलें। तें रूप
कसें तें सांगतात। तेजोमयं चिन्मयं - विश्वं - अनंत - म्हणजे आदि अंत रहित। आणि - त्वदन्येन न दृष्टपूर्वं - म्हणजे तुजवांचून

श्रीभगवानुवाच॥ मयाप्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात्॥ तेजोमयं
विश्वमनंतमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वं॥ ४७॥ न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रिया
भिर्न तपोभिरुग्रैः॥ एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर॥ ४८॥ ॥

न दुसऱ्यानीं कधीं पूर्वीं पाहिलें नाहीं॥ ४७॥ हें रूप उपासनात्मक योगानेंच जाणण्यास योग्य आहे। जे कर्मी आहेत त्यांस
दुर्मिळ आहे असें सांगतात॥ वेदयज्ञाध्ययनैः - म्हणजे चारही वेदांच्या गुरुपासून अक्षय ग्रहणात्मक जें अध्ययन आणि मी
मांसा कल्पसूत्राचे द्वारा वेदबोधित - म्हणजे वेदांनीं प्रतिपादन केलेले जे यज्ञ म्हणजे कर्में त्यांचा जो विचार तद्रूप जें यज्ञाध्य
यन तें एक करून। आणि - दानैः - तुलापुरुषादिक जीं महादानें तीं ही करून। आणि तपोभिः उग्रैः - म्हणजे कृच्छ्र चांद्रायणादिक
जीं उग्र - म्हणजे शरीर शुष्क करणारीं दुष्कर तपें तीं ही करून। एवंरूपः अहं - म्हणजे तूं जसा पाहिलास तसा विश्वरूप मी
नृलोके हे कुरुप्रवीर त्वदन्येन द्रष्टुं न शक्यः - म्हणजे या मनुष्य लोकाचे ठायीं हे कुरूंत श्रेष्ठ वीरा अर्जुना तुजवांचून दुसऱ्यानीं
पाहण्यास मी शक्य नाहीं॥ ४८॥

तुजवर अनुग्रह करण्यासाठी तुला प्रगट केलेलें रूप पाहून जर तुला व्यथा होत असेल तर त्याचा उपसंहार मी करतों असे सांगतात। इ
दं मम घोर रूप दृष्ट्वा - म्हणजे याप्रकारचें माझें उग्ररूप पाहून - ते व्यथा मा विमूढ भावश्च मा भवतु - म्हणजे या रूपदर्शनानें झालेल्या भया
मुळे तुला व्यथा नसो आणि व्याकुळचित्तत्व किंवा असंतोष तुला नसो। व्यपेतभीः प्रीतमनाः त्वं - म्हणजे ज्याची भीति गेली आहे आ
णि ज्याचें मन प्रीतीनें युक्त आहे असा होत्साता तूं। तदेव मे रूपं इदं प्रपश्य - म्हणजे तेंच माझें हें चतुर्भुजादियुक्त रूप मनोशानें पाहा
॥ ४९॥ संजय धृतराष्ट्रा प्रत बोलता॥ वासुदेव इति अर्जुनं उक्त्वा - म्हणजे वसुदेव पुत्र भगवान कृष्ण अर्जुनाप्रत याप्रमाणें बोलून
। तथा स्वकं रूपं भूयः दर्शयामास - म्हणजे पूर्वी जसें होतें तसें आपलें स्वकीय किरीट मकर कुंडल गदा चक्रादियुक्त चतुर्भुज
आणि श्रीवत्स कौस्तुभ वनमाला पीतांबर यांहीं शोभायमान असें रूप पुन दाखविता झाला। महात्मा पुनः सौम्यवपुः भूत्वा - म्ह
मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदं॥ व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य॥ ४९॥ संजय०
॥ इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः॥ आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा॥ ५०॥
अर्जु०॥ दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन॥ इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः॥ ५१॥ श्रीभगवानुवाच॥
सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम॥ देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः॥ ५२॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥
णजे आणि भयंकर विश्वरूपी पुनः सौम्यवपु होऊन। भीतं एनं आश्वासयामास - म्हणजे भयभीत झालेल्या अर्जुनाप्रत आ
श्वासन देता झाला॥ ५०॥ नंतर अर्जुन निर्भय होत्साता बोलतो॥ हे जनार्दन इदं सौम्यं मानुषं तव रूपं दृष्ट्वा - म्हणजे तुझ्या या
मनुष्याकृतीच्या सौम्य रूपाप्रत पाहून। इदानीं प्रकृतिं गतः सचेताः संवृत्तः अस्मि - म्हणजे आतां भयामुळें झालेल्या व्यथेनें र
हित स्वस्थ आणि भयानें झालेला व्यामोह जाऊन अव्याकुळचित्त मी झालों आहें॥ ५१॥ आपण केलेला अनुग्रह फार दु
र्लभ आहे असें च्यार श्लोकांनीं सांगत असतां भगवान् बोलतात। यत् मम रूपं त्वं दृष्टवान् - म्हणजे जें माझें विश्वरूप तूं पाह
ता झालास। इदं सुदुर्दर्शं - म्हणजे हें पाहण्यास फार अशक्य आहे। कारण देवा अपि अस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः संति-

म्हणजे या रूपाचें दर्शन व्हावें अशी देवही निरंतर इच्छा करतात। नित्यं-एणेकरून त्याणीं पूर्वी कधींही हें रूप पाहिलें नाहीं आणि माझे अनुग्रहाशिवाय पुढें ही पाहणार नाहींत असें सूचविले॥५२॥ ज्याप्रमाणें मला विश्वरूपानें तूं पाहतां झालास त्या प्रमाणें मी वेदाध्ययनानें-तपानें-दानानें-यज्ञानें पाहण्यास अशक्य आहें। नवेदयज्ञाध्ययनैः-या श्लोकानेंच हा गतार्थ आहे तथापि तोच अर्थ पुनः माझें विश्वरूपदर्शन परम दुर्लभ आहे याचें दृढीकरणासाठीं सांगितला॥५३॥ तर कोणत्या उपायानें तूं पहाण्यास शक्य आहेस तें सांगतात। हे अर्जुन हे परंतप-शत्रूस ताप देणाऱ्या अर्जुना- अनन्यया भक्त्या-म्हणजे अव्यभिचारी माझेठायीं निरतिशय प्रीतिरूप जी भक्ति तिणेकरून। एवंविध- अहं-म्हणजे या प्रकारचें दिव्य रूप धारण करणारा मी। ज्ञातुं-

नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया॥ शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा॥५३॥ भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन॥ ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप॥५४॥ मत्कर्मकृन्मत्परमः मद्भक्तः संगवर्जितः॥ निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव॥५५॥ ओं तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रम्हविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विश्वरूपदर्शनो नाम एकादशोध्यायः समाप्तः॥११॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥

म्हणजे परोक्षत्वेंकरून शास्त्रेंकरून जाणावयास आणि द्रष्टुं तत्त्वेन शक्य -म्हणजे वेदांतवाक्य श्रवण मनन निदिध्यासनाचे परिपाकानें ब्रम्हात्मत्वें करून जें साक्षात्कारात्मक ज्ञान तेणेंकरून पाहण्यास योग्य आहें। आणि प्रवेष्टुं च-म्हणजे ब्रम्हात्मत्व साक्षात्कारानंतर अज्ञान आणि त्याचें कार्य याचा नाश झाला असतां मद्रूपत्वेंकरून माझे ठायीं प्रवेश करण्यास शक्य आहे॥५४॥ आतां सर्व गीताशास्त्राचा सारभूत आणि ज्याचें अनुष्ठान कल्याणार्थ्यानें करावयाचें असा जो अर्थ तो एकत्र गोळा करून सांगतात॥ मत्कर्मकृत्-म्हणजे माझे परमेश्वराचे उद्देशानें विहित कर्म करणारा। स्वर्गादिक कामना असेल तर हें घडणार नाहीं यास्तव सांगतात। मत्परमः-म्हणजे मीच आहें परम म्हणजे प्राप्य त्वेंकरून निश्चित ज्यास। स्वर्गादिकास जावें अ-

त्री इच्छा नाही। याचकारणाने मद्भक्त-म्हणजे सर्वप्रकारेंनी मद्भक्तजनपरायण। स्त्रीपुत्रादिकावर स्नेह असल्यास असे कसे घडेल-
याविषयी सांगतात। संगवर्जित-म्हणजे बाह्य अनात्मवस्तुविषयक स्नेह ज्यास नाही। आणि-सर्वभूतेषु निर्वैर-म्हणजे आपणा-
वर ज्याणे अपकार केला आहे त्याचे ठायींही द्वेषरहित असा जो तो-हे पांडवा-म्हणजे पंडुपुत्रा अर्जुना। मांएति-म्हणजे अभेदाने
मजप्रत येतो-म्हणजे मद्रूपच होतो॥ ५५॥ इतिश्रीमद्भगवद्गीतायां रघुनाथशास्त्रिकृत भाषाविवृतौ एकादशोऽध्याय समाप्त.११
॥ श्रीगणेशायनम.॥ सप्तमाध्यायापासून एथावत पर्यंत महावाक्यातील तत्पदाचा वाच्यार्थ जो जगदुत्पत्तिस्थितिलय कारण मायोपा-
धिक परमेश्वर त्याचे निरूपण केले। आता तत्पदार्थ शोधनरूप उपासनाकांडाची समाप्ति या अध्यायांत करीत असता अर्थात विव-
क्षित प्रधानभूत जो निरुपाधिक परब्रम्ह स्वरूप लक्ष्यार्थ अर्थात त्यास जाणणारे जे ब्रम्हवेत्ते त्याची लक्षणे दोहा रविवितात। मच्छ
द्दे करून लोक बुध्य नुसरण करून तत्पदवाच्यार्थ सगुण परमेश्वराचे द्वारा उपासना दाखवितात। पूर्वाध्यायाती-मत्कर्मकृत् मत्पर
अर्जुन उवाच॥ एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते॥ येचाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमा.॥१॥ ७ ॥
म.-एणे करून माझे भजन करणारा मजप्रत एतो असे सांगितले तथे मच्छब्द करून निराकार निरुपाधिक निर्गुण ब्रम्ह समजा-
वे किंवा साकार सगुण ब्रम्ह समजावे। बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते-या श्लोकांत निराकार निर्गुण ब्रम्हावर मच्छब्दा-
चा प्रयोग केला आहे। आणि विश्वरूप दाखविल्यानंतर-नाहं वेदैर्न तपसा-या श्लोकांत साकार सगुण ब्रम्हांवरही मच्छब्द प्रयो-
ग केला आहे या स्तव संशय होतो। उभयविध ब्रम्हाचा उपदेश जो तू केला असतो अधिकारिभेदानेच केला असे म्हटले पाहिजे
। नाहींतर विरोध येईल। तेव्हा मुमुक्षु जो मी याणे निराकार वस्तूचेंच चिंतन करावे किंवा साकार सगुण वस्तूचे चिंतन करावे
यांतून आपणास कोणता अधिकार आहे असा आपले अधिकाराचा निर्णय होण्यासाठी अर्जुन प्रश्न करतो॥ एवं सततयुक्ता
ये भक्ता त्वां पर्युपासते-म्हणजे मत्कर्मकृन्मत्परमः-एणे करून पूर्वाध्यायांत अती सांगितले प्रकारांनी निरंतर भगवताचे क-
र्मादिका विषयीं सावधान मनस्क होऊन प्रवृत्त झालेले भक्त साकार भगवत वस्तूस च शरण झाले होत्साते साकार सगुण-

जो तूं परमेश्वर याची निरंतर चिंतनात्मक उपासना करतात। आणि- ये चापि अक्षरं अव्यक्तं पर्युपासते- म्हणजे जे सर्वत्र विरक्त हो
ऊन सर्व कर्मांचा त्याग करून- हे गार्गि- जें स्थूल नव्हे- जें अणु नव्हे- जें दीर्घ नव्हे- जें ह्रस्व नव्हे- त्यास ब्रम्हवेत्ते ब्राम्हण अक्षर ब्र
म्ह म्हणतात अशा अर्थाच्या श्रुतीत सांगितलेले सर्वोपाधि रहित निर्गुण अतएव सर्व इंद्रियादिकांस अगोचर निराकार तद्रूप ब्रम्ह
त्याची उपासना करतात। तेषां- म्हणजे हे दोघेही योग म्हणजे भगवच्चिंतन रूप समाधीमत जाणणारे आहेत परंतु त्या दोहोंम
ध्यें। के योगवित्तमा. - म्हणजे श्रेष्ठयोगी कोण आहेत। या द्विविध योग्यांच्या किंवा उपासकांच्या उपासनेतील कोणते उपासनेचें
मी अनुष्ठान करावें असे तात्पर्य॥ १॥ निर्गुण वस्तु दुष्प्राप्य आहे असें मानतात यावरून त्यास श्रेष्ठत्व आहे असें कल्पवून अर्जुना
स सगुण ब्रम्होपासनेविषयींच अधिकार आहे असें पाहून त्याणे किंवा त्यासारखे दुसऱ्या अधिकाऱ्याने सगुण ब्रम्होपासनच कर
वें असें भगवंतास सांगावयाचे आहे आणि अधिकारि भेदाने द्विविध उपासनेची साधने ही सांगावयाची आहेत त्यात प्रथम सगुण

श्रीभगवानुवाच॥ मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते॥ श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः॥ २॥

ब्रम्हविद्येवर म्हणजे उपासनेवर अभिरुचि ज्याची या स्तव सगुण ब्रम्होपासनेची स्तुति करीत असता पूर्वोक्त दोन्ही उपासकाम
ध्यें सगुण ब्रम्होपासक श्रेष्ठ आहेत असे श्रीभगवान उत्तर सांगतात॥ मयि मनः आवेश्य- म्हणजे मी जो सगुण ब्रम्ह परमेश्वर
सर्वात्मा वासुदेव त्याचे ठायीं आत्मस्वरूपत्वास्तव आणि प्रियतमत्वास्तव अनन्यभावाने मन प्रविष्ट करून। म्हणजे हिंगुल
दिक रंग लाखेंत मिसळले म्हणजे जसे लाक्षामयच होतात त्याप्रमाणें मन सर्वदा मदाकार करून। नित्ययुक्ताः- म्हणजे निर
तर उद्युक्त। परया श्रद्धया उपेता - म्हणजे हा परमात्मा उपासनेनें आम्हास संसार सागरापासून तारील च अशी निश्चयात्मक जी
सात्विकी श्रद्धा जीस आस्तिक्य बुद्धि ही म्हणतात तीणे करून युक्त होत्साते सर्व योगेश्वराचा ही ईश्वर आणि सकल कल्याण
गुणाचे स्थान आणि साकार असा जो मी याची उपासना करतात। ते मे युक्ततमा मता. - म्हणजे - ज्ञानी त्वात्मैव मे मतः - हणेक रू
न जो अद्वितीय ब्रम्ह स्वात्मत्वे करून जाणतो तो माझा आत्माच आहे असें भगवतानीं सांगितले आहे यावरून आत्म्यासार

रवा निरतिशयित प्रीतीसपात्र दुसरा पदार्थ कोणी नाही हैं अर्थसिद्धच आहे यामुळे ज्ञान्यास तरमी आपलें स्वरूपच आहे असें पाहतो। तेव्हां त्यावर जसा माझा पक्षपात आहे तसा दुसऱ्यावर नाहींच परंतु जे अज्ञानी असून आपणास शरण आले आहेत आणि निरंतर सगुण स्वरूपानेंही जरी उपासना करतात तथापि तेश्रेष्ठ योगी आहेत असे मी त्यास मानितों॥ २॥ सगुण ब्रम्होपासक हे जर श्रेष्ठ असे तुला मान्य आहेत तर निर्गुण ब्रम्ह वेत्ते श्रेष्ठ नाहीत असें मम जाये कां काय असें जर म्हणेल तर ते तर फारच दुर्लभ आहेत असे तीन श्लोकांनी सांगतात। अथवा निर्गुण ब्रम्होपासकापेक्षा सगुण ब्रम्होपासकांत कोणता विशेष आहे जेणेकरून ते तुला युक्ततम असे मान्य आहेत असे म्हणेल तर सगुण ब्रम्होपासकाचे ठायी विशेष दाखविण्या साठी निर्गुणोपासकाची स्तुति करतात। येतु अक्षरं पर्युपासते — म्हणजे जे स्थूल नव्हे- अणु नव्हे — ऱ्हस्व नव्हे- दीर्घ नव्हे- अशा अर्थाच्या श्रुतींनी सर्व धर्म शून्य अक्षर ब्रम्ह सांगितलं त्याचे ध्यान करतात। ते ब्रम्ह कसें आहे ते विशेषणांनी सांगतात। अनिर्देश्य — म्हणजे गुण किंवा जाति किंवा क्रिया यांचा कोणाएकाचाही संबंध

येत्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते॥ सर्वत्रगमचिंत्यं च कूटस्थमचलं ध्रुवं॥ ३॥

ध ज्याचे ठायीं आहे त्याचा हा बगवाईट। नळा पिवळा मूर्ख विद्वान ब्राम्हण शूद्र जातो येतो इत्यादिक शब्दांची प्रवृत्ति होते ब्रम्हावर धर्म कोणताही नाही यास्तव ते असे किंवा अमुक प्रकारचे अशा शब्दांनें निरूपण करण्यास अशक्य। आणि याच कारणास्तव -अव्यक्तं- म्हणजे मनास ही चिंतन करण्यास अविषय। याविषयी सर्व वाणी मनासह हा जाप्रत न पाऊन परतात म्हणजे सर्वही शब्द त्याचें प्रतिपादन करण्यास समर्थ होत नाही आणि ज्याचे चिंतन करण्यास मनही समर्थ होत नाहीं अशा अर्थाची श्रुति प्रमाण आहे। अद्वितीय निर्गुण ब्रम्ह वेदांत प्रतिपाद्य आहे त्याविषयी वेदांतील महावाक्ये प्रमाण आहेत असें जे श्रुतीनें सांगितलें आहे तें निर्गुण निष्क्रिय निर्धर्मक ब्रम्हावर अविद्याकल्पित लक्ष्यत्व ब्रम्हत्वादिक धर्म मानून त्या कल्पित धर्मांनी ब्रम्ह असें आहे असा वेदांत वाक्यापासून लक्षणावृत्तीनें त्या वाक्यापासून नाहं शब्रम्हाकार अंतःकरण वृत्त्यात्मक बोध होऊन त्या अंतकरण वृत्त्यात्मक बोधाने सर्व कल्पनास मूलभूत जी अविद्या आणि तिचें कार्य जें देहेंद्रिय मन बुद्धि आदिक सर्व द्वैत प्रपंच

त्याची त्यावृत्ती म्हणजे निवृत्ति होऊन आपले अद्वितीय सच्चिदानंदात्मक स्वरूपाने जशी स्थिति होते अशा भावाने सांगितलें
मानाने चिंतन करण्यास अशक्य म्हणून जे सांगितलें तें अशब्द मनाविषयीं सांगितलें। शुद्धांतःकरणानें निर्गुणब्रम्होपासन किं
वा पूर्वोक्त वृत्त्यात्मक बोध होतो असें श्रुतिस्मृति आणि पुराण यांहीं सिद्ध आहे। जसा या गुहेंत शब्द नाहीं असा कोणी बाहेर उ
च्चारला शब्द ऐकणाराम आपले म्हणजे कोणताही शब्द गुहेंत नाहीं असा बोध उत्पन्न करून आपण शांत होतो आणि गुहा
नि शब्द आहे असा ऐकणाराम बोध झाला यामुळे त्याम गुहेतील शब्दाविषयींचे अज्ञान राहत नाहीं तशी वेदांत वाक्यापासू
न कल्पित अंतःकरणापासून झालेली कल्पित वृत्ति नी ब्रम्ह निर्धर्मक अद्वितीय आहे अशा स्वात्मक बोधानें ब्रम्ह स्वरूपावि
षयींचें जें अज्ञान आणि त्यापासून झालेले देहेंद्रियमन आणि आपणा म्हणजे सर्व द्वैत याची निवृत्ति करून परमात्मावशेष हो
ऊन आपण शांत होते। एथे निवृत्ति शब्दाने मिथ्यात्व ज्ञान घ्यावे। देहेंद्रियमन आदिकाची प्रतीति म्हणजे प्रतीत न होणें

संनियम्येंद्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः॥ ते प्राप्नुवंति मामेव सर्वभूतहिते रताः॥ ४॥

असें समजूं नये। कारण तसा महावाक्यापासून बोध झाला तरी देहपात होई तो पावेतो बाधितानुवृत्तीनीं ज्ञान्यास देहादिकद्वैता
ची प्रतीति असतेच आणि परमात्मावशेषही परमात्माच मन्य असें समजणे एतद्रूपच समजावा। नाहींतर सुषुप्तींत आणि
मूर्च्छावस्थेंत ही देहादिकाची प्रतीति होत नाहीं यावरून तत्वज्ञानाचे यत्नाशिवाय ही सर्वलोक मुक्त होतील तसें झाले तर
मग ज्ञानशास्त्र सर्वही व्यर्थ होईल आणि ज्ञान्यासही देहादिकाची प्रतीति होतच आहे यामुळे जीवन्मुक्ति प्रतिपादन कर-
णारें शास्त्रही व्यर्थच होईल। जर शब्दानी ही बोलता येत नाहीं आणि मनाने ही चिंतन करतां येत नाहीं तर असे ब्रम्ह नाही
च कीं काय असें म्हणेल तर त्याविषयीं सांगतात। सर्वत्रगं-म्हणजे सद्रूप आणि स्फूर्तिरूप जी सत्ता तीणे करून जें सर्वत्रगत
तें। सर्व जग ज्याचे सद्रूपाने-अस्ति-या व्यवहारास आस्पद होतें आणि स्फुरणरूपाने-भासतें-अशा व्यवहारास आस्पद हो
तें ते शून्यासारखें नाहीं कसें म्हणता येईल। नरनारिकादिकांनी सत्ताजाति जी मानली आहे तीच ब्रम्ह काय सर्वत्र अनुग-

त असें म्हणेल तर तसेंही नाहीं असें सांगतात। अचिन्त्य-म्हणजे तार्किकांनीं जी सत्ताजाती मानली आहे ती प्रत्यक्ष मान
ली आहे ब्रम्ह तर इंद्रियास प्रत्यक्ष नाहीं आणि जातीला म्हणजे सामान्याला सत्ता म्हणजे- अस्ति- अशा व्यवहाराची योग्यता
ब्रम्हसत्तेनेंच येते। नाहीं तर सामान्यावर सत्ता तार्किक मानीत नाहींत यामुळें सामान्याला असत्वच येईल। सामान्य अस्ति-म्ह
णजे सामान्य आहे अशा व्यवहारांत आश्रयावरची सत्ताच परंपरा संबंधानें सामान्यावर भासते असें म्हटलें तर ते म्हणणें सा
मान्यावर सत्ता नाहीं अशा पर्यायानेंच झालें आणि- अस्ति- हा व्यवहार सर्वत्र सारखा असतां त्यांत कोठें सत्ता साक्षात् संबं
धानें भासते कोठें परंपरा संबंधानें भासते अशी कल्पना करण्यापेक्षां सर्वत्र-अस्ति- या व्यवहारामध्यें ब्रम्हसत्ताच भासते-
असें मानणेंच उत्तम आहे। वास्तव सद्रूपानें सर्व जगाचें कल्पनेस अधिष्ठानभूत ब्रम्ह रूपादिक नसल्यामुळें तें इंद्रियादिकां
स गोचर नाहीं। सर्व जगाची कल्पना होण्यास त्याचे ठायीं कल्पित अविद्येचा संबंध सांगतात। कूटस्थ-म्हणजे वाटेंत चांगले
गुणांनीं दिसावें परंतु आंत दोष असावे असें जें मिथ्या असतां सत्यत्वेंकरून भासतें त्यास कूट असें लोक म्हणतात। ज
से कूटपण- कूटसाक्षी॥ त्याप्रमाणें मिथ्या असतांही आपलें कार्यासह हा सत्यत्वेंकरून जें प्रतीतीस येतें असें जें अज्ञान तें
कूट त्याचे ठायीं कल्पित संबंधानें अधिष्ठानत्वेंकरून राहिलेलें तें कूटस्थ म्हणजे अज्ञान आणि त्याचें कार्याचें अधिष्ठान
याचकारणास्तव सर्व जगाचा संबंध अविद्येनेंच कल्पिला आहे। यामुळें सर्व विकारास साक्षिभूत असून स्वतः निर्विकार अ
सें सांगतात। अचलं-म्हणजे सर्व विकाररहित। याचकारणास्तव- ध्रुवं-म्हणजे नित्य। प्रारब्ध कर्मबलानें विषयभोग साधन
विषयेंद्रिय संबंध होत असतां अशा ब्रम्हाचे इतर पदार्थाविषयीची वृत्ति मनांत न उठतां निरंतर तन्मात्र विषयक वृत्तिप्र
वाहरूप उपासन कसें घडेल असें म्हणाल तर त्याविषयीं आस्थेचा अतिशय करून विषयाचे ठायीं दोषदृष्टी स्वरूप वैरा
ग्याचा अभ्यास करून त्या साधनानें तें उपासन करावें असें सांगतात। इंद्रियग्राम सन्नियम्य-म्हणजे विषयापासून इंद्रियसमुदाया
चा निग्रह करून। सर्वत्र समबुद्धय-म्हणजे इष्टविषय प्राप्तीनें हर्ष नाहीं अनिष्टविषय प्राप्तीनीं द्वेष नाहीं आणि विषयाचे दोषद

हीने त्याविषयी चीस्पृहा गेल्यामुळें सर्वत्रसमानच बुद्धिज्याची आहे असेवैराग्य शील याच कारणानीं हिंसादि कारण रागद्वेषर
हित त्यास्तव - अभयं सर्वभूतेभ्यो दत्वा संन्यासमाचरेत - यास्मृतींत सांगितल्या प्रमाणें सर्वभूतांस ज्यांपासून कोणतीही पीडाना
हीं असे सकल साधनसंपन्न होत्साते जसी परपुरुषाचे जीस व्यसन लागले आहे ती आपले गृहकर्म करण्यांत व्यग्र असताही
निरंतर परसंगाचेंच निरंतर चिंतन करीत असतां त्यापरसंगाचाच मनानेआस्वाद घेत असते त्याप्रमाणें प्रारब्धकर्मवशेंकरू
न विषयभोगानुभव करीत असतां ही गृहकृत्याकडे ज्या स्त्रीस व्यसन आहे ती जशी गृहकृत्य उत्तमप्रकारानें करते त्याप्रमाणें
परव्यसनी स्त्री गृहकृत्य करीत नाही त्याप्रमाणे प्रारब्धाने विषयानुभव करीत असतां ही त्यांचे चिंतन उत्तमप्रकारानें न करतां प
रब्रम्ह चिंतनाचे आस्थेच्या अतिशयाने विषयभोगकाळीं ही परब्रम्ह चिंतनच करीत हो साते। तेमामेव प्राप्नुवंति - म्हणजे ते
निर्गुणब्रम्होपासक ब्रम्हात्मत्व साक्षात्कारानंतर मद्रूपत्व प्राप्त होतात। पूर्वीं ब्रम्हरूपच ते ज्ञानेकरून अज्ञान निवृत्ति होऊन

क्लेशोधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसां॥ अव्यक्ताहिगतिर्दुःखंदेहवद्भिरवाप्यते॥ ५॥

मद्रूपच राहतात। ब्रम्ह असताच ब्रम्हाप्रत एतो ब्रम्हवेनाब्रम्हच होतो अशा अर्थाच्या श्रुति आणि - ज्ञानी तरमाझा आत्मा
आहे - असें गीतेंतील भगवद्वाक्य ही याविषयीं प्रमाण आहे। यास्तव भगवद्रूपच जे आहेत त्या निर्गुणोपासका विषयीं हे युक्त
किंवा युक्ततम हें काय सांगावयाचें आहे॥ ३॥ ४॥ परंतु त्या उपासनेच्या अनुष्ठानाविषयीं क्लेश फार आहेत इतकेंच सांगतात
। सगुणोपासना करण्याविषयीं सगुणोपासकांस ही मन इंद्रियाचे द्वारा विषयांकडे न नेतां विषयांपासून मनाचा निग्रह करू
न दुसरे विषयांचें चिंतन न करतां सगुण परमेश्वराचे ठायींच निरंतर त्याचें स्थापन करणें - मत्कर्मकृत् मत्परमः - या श्लोकां
त सांगितलें प्रमाणे भगवत्कर्म परभगवत्पर निरंतर होणें परमश्रद्धेने युक्त असणें यांत क्लेश आहेच तथापि त्यास चिंतन क
रण्यास सगुणपरमेश्वरादिकांचे स्वरूपाचा अवलंब आहे त्या अवलंबामुळें त्या चिंतनाचा अभ्यास होऊन मनाचें एकाग्रते-
चा अभ्यास होऊन पायरीवरून पायरी चढावी यास सोपानारोहण न्याय म्हणतात या न्यायाने पुढे ते क्रमानें निर्गुण चिंतन करण्यास

मनसमर्थ झाल्यामुळे निर्गुणोपासना करनात आणि त्याने ब्रम्ह साक्षात्कारवंत होतात। जे पश्चात्प्रमाणे अकस्मात् उर्ध्वपदावर चढावें अशी
इच्छा करून चित्तास स्थिर करण्यास अवलंब नसल्यामुळें चित्तविक्षेप होऊन चिंतनापासून भ्रष्ट होतात आणि पुनः चिंतन करण्यास लाग
तात असे अव्यक्तचिंतनाविषयी आसक्त झालेले त्यास- क्लेशः तेषाधिकतरः- म्हणजे फारच मोठा क्लेश आहे। याविषयी भगवंत अ
पणच हेतु सांगतात। देहवद्भि अव्यक्ता गतिः दुःखमवाप्यते- म्हणजे देहधारी जे आहेत त्यांस निरालंब गति दुःखें करून प्राप्य आहे-
कष्टाने प्राप्य नाही हे प्रसिद्ध च आहे। असे आहे तर निर्गुण ब्रम्होपासनेचा असंभवच आहे अशी शंका करूं नये। सगुण ब्रम्हावि
षयी प्रत्ययावृत्ति म्हणजे वारंवार तदाकार मनाची वृत्ति करणे एतद्रूप उपासन संभवते तसें निर्गुण ब्रम्हाकार निरंतर मनाची वृत्ति
करणें एतद्रूप निर्गुण ब्रम्हाचें उपासनही संभवतें। ते चतुर्भुज किंवा पंचभुज पदस्थ लक्ष्मीयुक्त आर्धांगस्थ पार्वतीयुक्त गरुडवाह
न अशा विष्णवादि मूर्ती आहेत असें शास्त्रापासून परोक्षत्वें करून जाणून उपासनाकालीं त्याचीही मूर्ती असे प्रत्यक्ष नसलें तरी
त्याची तदाकारवृत्ति प्रवाहरूप उपासना करतात त्याप्रमाणें वेदांतवाक्यापासून ब्रम्ह सच्चिदानंदाद्वय आहे असें गुरूपासून परोक्षत्वें क
रून जाणून विज्ञान-नित्य-शुद्ध बुद्ध-सत्य-मुक्त-निरंजन-विभु-अद्वय-आनंद-पर-प्रत्यगेकरस इत्यादिक विधेयगुणानीं आणि अ
स्थूल-अनणु-अह्रस्व-अदृश्य-अग्राह्य-अशब्द-अस्पर्श-अरूप-अव्यय-इत्यादिक निषेध्यगुणानीं उपलक्षित तें पर ब्रम्ह मी
आहें असें गुरूपासून निर्गुणोपासनेचें स्वरूप ऐकून त्याप्रमाणे प्रत्ययावृत्तिरूप निर्गुणोपासन करावें ब्रम्ह जरीं शास्त्रांत प्रत्य
गात्म स्वरूपानेच वर्णिलें आहे तथापि विचाराशिवाय तें प्रत्यगात्मत्वें करून ब्रम्हज्ञान दुर्घट आहे यास्तव बुद्धीचे मंदत्वामुळें
किंवा तत्वोपदेष्टा जो गुरु त्याचे निरंतर सान्निध्य नसल्यामुळें किंवा देशकालाची संपत्ति नसल्यामुळें जो विचार करण्यास अस
मर्थ आहे आणि गुरूपासून श्रद्धेने परोक्षत्वें करून ब्रम्हस्वरूप जाणून उपासनाप्रकार हा पूर्वोक्त जाणून निरंतर त्या ब्रम्हाचें
प्रत्ययावृत्तिरूप उपासन करावें अपरोक्ष द्वैतबुद्धि असली तरी श्रद्धालुस परोक्षत्वें करून अद्वैत ब्रम्हज्ञानास ती विरोधी
होत नाही जशी शालिग्रामादिक किंवा प्रतिमादिकावर शिलात्व बुद्धि अपरोक्ष असली तरी ती हा विष्णूच आहे अशा श

स्त्रीय परोक्ष ज्ञानासती विरोधी होत नाही कारण शालिग्राम प्रतिमादिकावरील शास्त्रीय विष्णुत्वाविषयीं कोणाचा विवाद नाहीं
जे श्रद्धालु आस्तिक असतील तेच याउपासनाविषयींचे अधिकारी आहेत यास्तव अश्रद्धालु नास्तिकास त्या प्रतिमादिका
वर विष्णुत्वाविषयीं विश्वास नसला तरी त्याचे उदाहरण येथें घेऊं नये। यास्तव उपासनोपयोगी अद्वैतब्रम्हतत्वविषयक परो
क्ष ज्ञान श्रद्धालु आस्तिकास गुरुरूपापासून वेदांतवाक्याच्या एकवार उपदेशानेही होते त्यावरून त्याविषयींचें उपासन विचारापा
सून ही होतें। वाणि मनाला अगोचर अशा निर्गुण ब्रम्हाचें उपासन संभवत नाही असें म्हणाल तर तशा ब्रम्हाचें ज्ञान तरी कसें
संभवेल। वाणीला आणि मनाला अगोचर याप्रमाणे च त्याचे ज्ञान संभवतें तर त्याप्रकारचेंच उपासन ही संभवतें। उपास्यत्व
मानले तर त्याच गुणाने सगुणत्व एईल असें म्हणाल तर वेद्यत्व मानल्यानें त्याच गुणानें सगुणत्व एणार नाहीं कीं काय। लक्षणावृ
त्तीने वेद्यत्व मानितो म्हणजे सगुणत्व एणार नाही असें म्हणाल तर उपास्यत्व ही लक्षणावृत्तीनें मानितो मग सगुणत्व कोठून येई

येतु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः॥ अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते॥ ६॥

ल। जें मनानें चिंतितां एत नाही ज्याचे योगाने मनास सत्ता आली आहे तेंच तूं ब्रम्ह जाण। ज्याचा असे आहे- अशीउपासना कर
ता येत नाहीं या अर्थाच्या श्रुतीवरून ब्रम्होपासन निषिद्ध आहे असे म्हणाल तर तें ब्रम्ह विदिताहून अन्य आहे अवेद्य आहे अ
शा श्रुतीने वेद्यत्व ही निषिद्ध आहे। जर वेद्यत्वनिषेधक रणाऱ्या श्रुति अ शब्द मनाने वेद्यत्व निषेधपर आहेत तर उपास्यत्व निषेध
पर श्रुति ही अशब्द मनानें उपास्यत्व निषेधपर आहेत। यास्तव अद्वैत सर्व धर्मशून्य ब्रम्ह असतां ही अविद्येनें कल्पित लक्ष्य
त्व सत्य ज्ञानानंदात्मक धर्माचे योगाने मनोवृत्तिरूप वेद्यता ब्रम्हास आहे त्याप्रमाणें पूर्वोक्त गुणाही उपलक्षित ब्रम्हाकार
मनोवृत्तिरूप उपास्यत्व आहे। याविषयी तापनीयोपनिषत् शांड्य प्रश्न मांडुक्योपनिषदांत निर्गुणोपासन प्रकार लिहिला आहे
तो प्रमाणभूत आहे असें जाणावें। ५॥ सगुण ब्रम्होपासक आणि निर्गुण ब्रम्होपासक यांस एकच मोक्षरूप सारखें फल असे
ल तर क्लेशाच्या न्यूनत्वामुळें सगुणोपासनेचा उत्कर्ष आणि क्लेशाच्या आधिक्यामुळे निर्गुणोपासनेचा अपकर्ष होईल तसे तर

नाहीं। निर्गुण ब्रम्होपासनेचे साह्यानें महावाक्यापासून ब्रम्हात्मापरोक्ष ज्ञान होऊन अविद्या आणि तत्कार्य यांचा नाश होऊन निर्वि-
शेष आनंद बोधात्मक ब्रम्ह स्वरूपानें अवस्थानरूप मोक्ष सद्य प्राप्त होतो। सगुण ब्रम्होपासकास अविद्या निवर्तक अधिष्ठानभूत ब्र-
म्हापरोक्ष ज्ञान नसल्यामुळें अविद्या निवृत्ति न होतां कार्य ब्रम्हलोक प्राप्तिस्वरूप ऐश्वर्य विशेषरूप फल होतें ते ब्रम्हां निर्गुणोपासकां-
स आयासाधिक्य असलें तरी सगुण ब्रम्होपासकापेक्षा फल मोठें आहे यास्तव ते आयासाधिक्य निर्गुणोपासनेस अपकर्ष संपादन
करणारें नव्हे अशी शंका करूं नये। सगुणोपासनेचे योगानें ईश्वर प्रसाद पुण्य विशेष होऊन त्यायोगानें तत्व बोधार्थ जे प्रतिबंध ते
सर्व नाश पाऊन सगुणोपासकास गुरूपदेश किंवा वेदांतश्रवण मनन निदिध्यासन रूप क्लेशावांचून ही भगवत्प्रसादानें वेदांतांतील
महावाक्याची स्फूर्ति होऊन तत्वसाक्षात्कार होऊन अज्ञानाचा कार्यासह नाश होऊन सगुणोपासनाचे पुण्य करून प्राप्त झाले-
ल्या ब्रम्हलोकांतील भोगाच्या अंतीं निर्गुण ब्रम्हविद्येचें जें फल विदेह कैवल्य तें प्राप्त होतें असें दोन श्लोकांनीं सांगतात॥ येतु

तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसार सागरात्॥ भवामि नचिरात्पार्थ मय्यावेशित चेतसां॥७॥

सर्वाणि कर्माणि मयिसन्यस्य- म्हणजे जे नर सगुण ब्रम्होपासक सर्व नित्य नैमित्तिक स्वाभाविक जीं कर्में तीं मी जो सगुण ईश्वर वासु-
देव याचेठायीं अर्पून। मत्पराः- म्हणजे मीवासुदेवच आहे पर म्हणजे उत्कृष्ट प्रीतिकरण्यास पात्र ज्यांस असे होत्साते। अनन्येनै-
व योगेन- म्हणजे मजवांचून ज्यास आलंबन दुसरें नाहीं अशा एकांतभक्तियोगानें। माध्यायतः- म्हणजे मी जो भगवान वासुदे-
व- सकल सौंदर्य निधान- आनंदघन- द्विभुज किंवा चतुर्भुज- सर्वमनोहर- मोहनकरणारी मुरली सप्तस्वरानें
वाजविणारा- कमंडुकौमोदकी गदा रथांगचक्र शंखयुक्त पाणिपल्लव- अथवा नरसिंह राघवरूप अथवा पूर्वी दाखविलेल्ये
रूपानें युक्त परमेश्वर याचें चिंतन निरंतर ध्यान करीत असता। उपासते- म्हणजे त्याच उपास्य ध्येय स्वरूपाचे ठायीं मनाच्या निरंत-
र दृढस्थितीप्रत पावतात॥ ६॥ मय्यावेशित चेतसा- म्हणजे पूर्वोक्त स्वरूप जो मी त्याचे ठायीं एकाग्रतेनें ज्याणीं मनाचें स्थापन केलें
आहे। तेषां- म्हणजे असे जे उपासक त्यांचा। मृत्युसंसार सागरात् समुद्धर्ता- म्हणजे मृत्युयुक्त जो मिथ्याज्ञान कार्यभूत प्रपंच-

तो व दुस्तर त्या स्तव समुद्रापासून अनायासाने उत्तम म्हणजे सर्व बाधा वर्जित शुद्ध जी ब्रम्हरूप उर्ध्वदेशी त्याचे ठायी ज्ञा-
नाचा अवष्टंभ देऊन धारण कर्ता। हे पार्थ नचिरात् भवामि-म्हणजे हे अर्जुना लोकरच होतों ॥७॥ याप्रमाणे एतावत् पर्यंत स-
गुण ब्रम्होपासनेची स्तुति करून ती करावी असा विधि सांगतात॥ मय्येव मन आधत्स्व-विश्वरूप जो मी याचे ठायीच संकल्प
विकल्पात्मक मनाचें स्थापन कर-म्हणजे सर्व मनाच्या वृत्ति मदाकार कर। मयि बुद्धिं निवेशय-म्हणजे निश्चयात्मक बुद्धीचें
ही माझेच ठायी स्थापन कर-म्हणजे विषयांतराचें बुद्धीनें चिंतन न करतां माझेच चिंतन कर। असें करण्याचे फल सांगतात। अ-
त ऊर्ध्वं मय्येव निवसिष्यसि न संशय.-म्हणजे शरीर पातानंतर शुद्ध ब्रम्हरूप जो मी याचे ठायीं मद्रूपानेंच राहशील॥८
॥ विश्वरूप चिंतना विषयीं जो असमर्थ त्याविषयीं सांगतात॥ अथ मयि स्थिरं चित्तं समाधातुं न शक्नोषि चेत्-म्हणजे विश्वरूप-

मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय॥ निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः॥ ८॥

अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरं॥ अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय॥ ९॥

अभ्यासेप्यसमर्थोसि मत्कर्मपरमो भव॥ मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिमवाप्स्यसि॥ १०॥

जो मी याचे ठायी एकाग्रतेनें उत्तम प्रकारे करून चित्ताचे स्थापन करण्यास तू जर समर्थ न होशील तर। ततः अभ्यासयोगेन-
म्हणजे आंतर किंवा बाह्य प्रतिमादिकालंबना चे ठायी सर्वत्र गेलेलें चित्त आवरून पुन: पुन स्थापन करणें असा जो अभ्या-
स तत्पूर्वक जो चित्ताचा स्थिरता करणे रूप उपयोग तेणे करून। हे धनंजय मां आप्तुं इच्छ-म्हणजे हे धनंजया अर्जुना मी जो
विश्वस्वरूप ईश्वर त्याची प्राप्ति होण्या विषयीं इच्छा कर॥ ९॥ अभ्यासेपि असमर्थ: असि चेत् तर्हि-म्हणजे जर सांगितलेले अ-
भ्यासा विषयीं ही तू असमर्थ असशील तर। मत्कर्मपरमः भव-म्हणजे श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनं॥ अर्चनं वंदनं
दास्यं सख्यमात्म निवेदनं-याप्रकारचें जे नवविध भजन तें मत्कर्म तेच आहे आवश्यक ज्यास असा तू हो। मदर्थं कर्माणि कु-
र्वन्नपि-म्हणजे नवविध पूर्वोक्त भागवतधर्म भजनात्मक कर्मे करीत असतांही अंतःकरण शुद्धी आणि ज्ञानोत्पत्ति यांचे

द्वाराने। सिद्धि अवाप्स्यसि –म्हणजे ब्रम्हरूपाने स्थितिरूप मोक्षाप्रत पावशील॥ १०॥ बाह्य विषयाकडे चित्त व्यग्र झाल्याने किंवा बाह्यवि
षयानी चित्त आकृष्ट केल्यामुळे पूर्वोक्त मत्कर्मपरम होण्यास समर्थ नसशील तर। मद्योग आश्रित –म्हणजे मदेकशरणते चा आश्रय
केलेला। आणि यतात्मवान –म्हणजे इंद्रियनिग्रहाने युक्त विवेकी होत्साता। सर्व कर्मफल त्यागं कुरु –म्हणजे सर्व कर्मांच्या फलांच्या इच्छे
चा त्याग कर ॥ ११॥ कर्मफल त्यागाबरच सर्व साधनाचे पर्यवसान करून त्याची स्तुति करतात। अभ्यासात् ज्ञान श्रेय –म्हणजे ज्ञानार्थ
केलेला जो श्रवणमननाभ्यास त्यापेक्षा शब्द आणि युक्ति यापासून झालेले आत्मनिश्चय रूप ज्ञान प्रशस्त आहे। ज्ञानात् ध्यान वि
शिष्यते –म्हणजे पूर्वोक्त श्रवण मननापासून निष्पन्न झालेले ज्ञानापेक्षा निदिध्यासनात्मक ध्यान अपरोक्षात्म ज्ञानास साधन त्यामु
ळे प्रशस्त आहे। ध्यानात्कर्मफलत्याग विशिष्यते –म्हणजे निदिध्यासनात्मक ध्यानापेक्षा कर्मफलाचा त्याग प्रशस्त आहे त्याप्रमा
णें सर्व साधनापेक्षा निदिध्यासनात्मक ध्यान श्रेष्ठ आहे त्यापेक्षाही अज्ञान्याने केलेला कर्मफलत्याग प्रशस्त आहे अशी त्याची स्तु

अथैतदप्यशक्तोसि कर्तुं मद्योग माश्रित.॥ सर्व कर्मफलत्याग ततः कुरु यतात्मवान्॥ ११॥ ॥

श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते॥ ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरं॥ १२॥

ति केली। त्यागात् अनंतरं शांति –म्हणजे नियतचित्त पुरुषाने केलेले सर्व कर्मफलत्यागापासून कारणासह संसाराचा उपशम
तत्काल होतो। एथे जेव्हा मनुष्याचे चिद चिद्ग्रंथिरूप मनस्थित काम निवृत्त होतात तत्काल हे देहादि मरणाने मरणभाव जीव अमृ
त म्हणजे देहाभिमान गेल्यामुळे तत्कृत मरणाने रहित होतो आणि याच देहात ब्रम्हस्वरूपाने मोक्षाप्रत पावतो या अर्थाच्या श्रु
तींत आणि –प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान् –या श्लोकांत स्थितप्रज्ञलक्षणामध्ये गीतेत सांगितलेला जो चिदचिद्ग्रं
थिरूप कामत्याग त्यास मोक्षसाधनत्व निश्चित आहे यामुळें आणि कर्मफलत्याग ही त्याग आहे यास्तव त्यागत्व सामान्यरूपा
नें त्याची स्तुति केली। जशी अगस्ति ब्राम्हणाने समुद्रपान केले जामदग्न्य ब्राम्हणाने पृथिवी निःक्षत्रिय केली यामुळे ब्राम्हण
त्व सामान्याने आताचे ब्राम्हणही अनंत पराक्रमाचे आहेत अशी त्याची स्तुति करतात त्याप्रमाणे॥ १२॥ ॥

त्याप्रमाणें जे मंदाधिकारी आहेत त्यांस अति दुष्कर जें अक्षर निर्गुण ब्रम्होपासन त्यांत फार क्लेश आहे अशी निंदा करून त्यांचे उद्देशानें
म करस गुणोपासनाचा विधी सांगून शक्ति तारतम्याचे अनुवादानें दुसऱ्याही साधनाचा विधी भगवान् वासुदेवानें सांगितला या सां-
मण्याचा हेतु इतकाच आहे कीं त्या साधनाचे अनुष्ठानानें आणि सगुण ब्रम्होपासनेनें सर्व दुरितादिक प्रतिबंधकांचा नाश होऊन चि-
त्तशुद्ध होऊन अक्षर निर्गुण ब्रम्ह विद्येचे अनुष्ठानास उत्तमाधिकार प्राप्त होऊन अक्षर निर्गुण विद्येचें अनुष्ठान मुमुक्षूंस प्राप्त
व्हावें। यास प्रमाण निर्विशेष निर्गुण ब्रम्हाचा साक्षात्कार होण्यामध्यें समर्थ नाहींत असे जे मंदाधिकारी त्यांस सविशेष ब्रम्हाचें
निरूपण करून त्यावर अनुग्रह करतात। सगुण ब्रम्ह चिंतनेकरून ज्याचें मन स्वाधीन झालें आहे त्याचे मनांत सर्व उपाधीनीं निर्मुक्त
निर्गुण ब्रम्ह अभिव्यक्त होतें अशीं वाक्यें आणि निर्विकल्पक समाधीची सिद्धि ईश्वर प्रणिधानें करून होते ईश्वर प्रणिधानापासू-
न प्रत्यगात्मा जो चैतन्यरूप त्याची प्राप्ति होते आणि सर्व जें अंतराय म्हणजे निर्विकल्पक समाधीस प्रतिबंधक त्यांचा नाश हो

अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च॥ निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी॥ १३॥

तो अशा अर्थाचीं योग सूत्रें आहेत॥ यावरून अक्षर निर्गुण ब्रम्होपासनेची निंदा मंदाधिकाऱ्यांस सगुण ब्रम्होपासनेचे स्तु-
ती विषयीं आहे निर्गुणोपासना करूं नये या विषयींची नाहीं। जशी उदित होमाची निंदा म्हणजे सूर्य उदय पावल्यानंतर होमाची निंदा
अनुदित होमाचे म्हणजे सूर्योदयापूर्वींचे होमाचे स्तुतीसाठीं आहे तशीच अनुदित होमाची निंदा उदित होमाचे स्तुती विषयीं
आहे परस्पर दोघांचीं निंदा परस्पर स्तुत्यर्थच आहेत। त्याचा त्याचा त्याग करण्याविषयीं नाहीत। निंदा करण्याविषयीं प्रवृत्त हो-
त नाहीं तर त्याविषयीं विधी सांगावयाचा असतो त्याचे स्तुतीसाठीं प्रवृत्त होते असा न्याय ही यास प्रमाण आहे। या स्तव-मि-
थो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः॥ उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम्:- इत्यादिकें करून पुनःपुनः फार उत्कृष्टत्वें करू-
न प्रियतमत्वें करून स्वात्मत्वें करून भगवंतानीं सांगितलेले निर्गुण अक्षर ब्रम्होपासकच परमार्थतः योगवित्तम आहेत
त्याचेच धर्मांचा आणि ज्ञानाचा तूं आश्रय कर असे अर्जुनास समजावें या इच्छेनें परमहित इच्छिणारा भगवान ब्रम्हात्मा

भेद दर्शी जे अक्षरोपासक त्यांची सात श्लोकानीं स्तुती करतात ॥ सर्वभूतानां अद्वेष्टा—म्हणजे सर्वभूतांस स्वात्मत्वें करून जाण
त्यामुळें दुःखास जो हेतू त्याविषयीं प्रातिकूल्य बुद्धि नाहीं यास्तव कोणाचा द्वेष जो करीत नाहीं। तर-मैत्रः—म्हणजे सर्व भूताविषयीं
स्निग्धात करण। आणि—करुणः—म्हणजे दुःखाचे ठायीं जो दयावान् अथवा सर्व भूतांस अभय देणारा सन्यासी। अतएव—निर्ममः—
म्हणजे देहावर ही ज्याची ममता बुद्धि नाहीं। आणि—निरहंकार—म्हणजे मी चांगले आचरण करणारा—चांगले स्वभावाचा—मी मोठा
—अध्ययनशील—द्रव्यवान—कुलीन—पूज्य—परंपरेने प्रतिष्ठित—इत्यादिक ज्याचा अहंकार गेला आहे। आणि—समदुःखसुखः—
म्हणजे द्वेषाविषयीं किंवा रागाविषयीं ऐक्य बुद्धि मुळे सुख किंवा दुःख किंवा त्याची साधनें ज्यास समानच आहेत। आणि कोणी आपणास मारले किंवा आपली कोणी निंदा केली तरी ज्याचे मनास विकार होत नाहीं ॥ १३॥ सततं संतुष्टः—म्हणजे शरीरनि

संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चय.॥ मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रिय.॥ १४॥

र्वाहोपयोगी यदृच्छेने प्राप्त झालें आभान किंवा लाभ न झाला तरी मनोष पावणारा किंवा इतकेच पुरे असी अलंबुद्धि ज्यास आहे अ
सा। आणि सतत योगी—म्हणजे निरंतर श्रवण मनन निदिध्यासना विषयीच ज्याचे चित्त स्थित आहे असा। आणि—यतात्मा—म्हणजे
स्वाधीन आहेत शरीर इंद्रियें—मन ज्यास—। आणि—दृढनिश्चय—म्हणजे कुतर्कांनी फिरविण्यास शक्य नाहीं असा दृढ आहे—मी अ
कर्ता—अभोक्ता—सच्चिदानंद असंग अद्वितीय ब्रम्हच आहें—असा वेदांतांपासून झालेला निश्चय ज्याचा असा। स्थितप्रज्ञ आणि
—मर्य्यर्पित मनोबुद्धि—म्हणजे मी अक्षर ब्रम्हरूप जो वासुदेव याचे ठायींच अर्पित आहेत मन आणि बुद्धि ज्याच्या असा। जो मद्भक्तः
—म्हणजे अक्षर ब्रम्हवेत्ता तो। मे प्रियः—म्हणजे माझा आत्माच आहे यामुळें प्रिय आहे ॥ १४॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

यस्मान्नोद्विजते लोकः न उद्विजते-म्हणजे सर्व भूतांस अभय देणाऱ्या पासून कोणी जीव व्यथेप्रत पावत नाहीं। आणि- च लोकात् न उद्विजते -म्हणजे दुसऱ्यास पीडा करावी असा ज्याचा स्वभाव अशा खल जीव समुदायापासून अद्वैतदर्शनास्तव किंवा परमकारुणिकत्वामुळें क्षमाशीलत्वास्तव जो व्यथेप्रत पावत नाहीं असा। आणि- हर्षामर्ष भयोद्वेगैः विमुक्तः -म्हणजे प्रिय वस्तूचा लाभ झाला असतां रोमांच शरीरावर उभे राहावे आनंदाश्रु यावे यास कारणभूत तो आनंद त्याला अभिव्यंजक मनाचा जो वृत्तिविशेष तो हर्ष। दुसऱ्याचा उत्कर्ष पाहिला म्हणजे त्याचे सहन न व्हावें असा जो चित्ताचा वृत्तिविशेष तो आमर्ष- व्याघ्रादिकांच्या दर्शनापासून झालेला जो भासरूप चित्तवृत्तिविशेष ते भय। मी एकदा या विजन देशीं स्त्रीपुत्रादिकांहींकरून रहित कसा जगेन या प्रकारचा जो व्याकुलतारूप चित्तवृत्तिविशेष तो उद्वेग। असे जे हर्ष आमर्ष भय आणि उद्वेग त्यांहींकरून रहित किंवा अद्वैतदर्शित्वास्तव आपणास अयोग्य असें जाणून त्यांहींच त्याग केलेला त्याचे त्यागाविषयीं आपण प्रयत्न करणारा नव्हे असा जो तो। मे प्रियः-म्हणजे पूर्वीप्रमाणेच मला प्रि

यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः॥ हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः॥१५॥

अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः॥ सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः॥ १६॥

य आहे॥१५॥ आणि- अनपेक्ष -म्हणजे सर्व भोग साधने यदृच्छेकरून प्राप्त आली असतांही त्यांविषयीं निरिच्छ। शुचिः-म्हणजे पूर्वोक्त बाह्य आणि आभ्यंतर शौचानें युक्त। दक्ष -म्हणजे कर्तव्य जें भगवद्भजन किंवा वेदांतश्रवण त्याविषयीं निरलस किंवा सावधानचित्त। उदासीनः-म्हणजे दोघांचे विवादांत कोणाचाही पक्ष न घेणारा किंवा कोणाचे जयपराजयानें ज्यास हर्ष विषाद नाहींत असा। आणि- गतव्यथ. -म्हणजे दुसऱ्यानें ताडनादिक केले तरी त्याची व्यथा जो मानीत नाहीं किंवा व्यथाच ज्यास होत नाहीं असा। व्यथा उत्पन्न झाली तरी ज्याणें व्यथा केली त्यास अपकार करण्याचें सामर्थ्य असतांही जो अपकार करीत नाहीं तो समाधील आणि व्यथा हो ण्यास कारण प्राप्त झालें तरीं ज्यास व्यथा उत्पन्नच होत नाहीं किंवा मानीत नाहीं तो गतव्यथ असा विशेष जाणावा। आणि- सर्वारंभपरित्यागी -म्हणजे या लोकींचे पदार्थ कृषिवाणिज्यादिकर्में आणि परलोकचे फलार्थ यज्ञया-

गादिक काम्य कर्माचरण करणे हे सर्व आरंभ म्हणजे क्रियारूप व्यापार त्याणे सोडले आहेत असा। जो मा आपूर्वोक्त भक्त तो मला फार प्रि

य आहे॥१६॥ समदुःखसुख -असे जे मागिल तें त्याचेच व्याख्यान करतात॥ यो न हृष्यति- म्हणजे जो इष्ट वस्तूचा लाभ झाल्यामुळे हर्ष

पावत नाहीं। न द्वेष्टि म्हणजे अनिष्ट किंवा अप्रियवस्तु प्राप्त झाल्यामुळे जो द्वेष करीत नाही। न शोचति- म्हणजे इष्टवस्तूचा वियोग झा

ल्यामुळे जो शोक करीत नाही। न कांक्षति- म्हणजे प्राप्त न झालेले इष्टवस्तूचे प्राप्ती विषयी जो इच्छा करीत नाही। आता सर्वारंभपरित्यागी

- याचें व्याख्यान करतात॥ शुभाशुभपरित्यागी -म्हणजे सुखसाधन भूत किंवा दुःखसाधन भूत जी पुण्यपापरूप कर्मे किंवा मंगलामं

गलरूप कर्मे त्याचा परित्याग करण्याचा ज्यांचा स्वभाव आहे असा। जो भक्तिमान तो मला प्रिय आहे।१७। उदासीनत्वाचे व्याख्या

न करतात॥ समः शत्रौ च मित्रे च- म्हणजे शत्रुविषयी आणि मित्राविषयी जो सम मान। तथा- मानापमानयोः- म्हणजे तसाच मान आणि-

यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति॥ शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः॥१७॥

समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः॥ शीतोष्णसुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः ॥१८॥ ॥

तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केनचित्॥ अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः॥१९॥

अपमान याविषयी जो समान। आणि शीतोष्णसुखदुःखेषु समः -म्हणजे शीत किंवा उष्ण आणि सुख किंवा दुःख याविषयी जो सम

संगविवर्जित -म्हणजे व्यथा होण्यास जो संग त्यास सर्व संगाने रहित॥१८॥ आणि- तुल्यनिंदास्तुतिः-म्हणजे निंदेने ज्यास दुःख हो

त नाही आणि स्तुतीने ज्यास सुख होत नाही असा। आणि मौनी-म्हणजे वाणीचे नियमन करणारा किंवा अध्यात्मविचारा शिवाय

किंवा भगवद्गुणानुवादा शिवाय जो वाणीचा व्यापार तो न करणारा। आणि- येन केनचित्संतुष्ट -म्हणजे शरीरनिर्वाहासाठी प्रा

प्त केल्याशिवाय प्रारब्ध कर्म वशाने जे शरीरनिर्वाहोपयोगी अन्नाच्छादन मिळेल तितक्याने च जो संतोषी। आणि -अनिकेत -

म्हणजे नियत राहण्याचे स्थान जे गृह मठादिक ते ज्यास नाही असा। आणि - स्थिरमति- म्हणजे ब्रह्मात्मतत्त्वाविषयी ज्याची

स्थिर बुद्धि आहे असा। जो पूर्वोक्त भक्तिमान तो मला फार प्रिय आहे एथे भक्तिमान भक्तिमान असे भक्तीचें पुनः पुनः ग्रहण जे

केलें तें मोक्षास भक्तिच मुख्य कारण आहे असें दृढ करण्यासाठीं केलें असें जाणावें। आणि अद्वेष्टा सर्वभूतानां इत्यादिके करून
जे अद्वेष्टृत्वादिक बहुत धर्म सांगितले ते अक्षर ब्रम्होपासक जीवन्मुक्त जे आहेत त्यांचे लक्षणभूत स्वभावसिद्ध सांगितले। हेच
धर्म पूर्वी स्थितप्रज्ञाचें लक्षण लें करून सांगितले आहेत। असेंच ज्यास साक्षात्कारात्मक ब्रम्हात्मज्ञान झालें आहे त्यास अद्वेष्टृत्वादि
क धर्म प्रयत्नावांचून स्वभावतांच उत्पन्न होतात ते त्यास साधनभूत नव्हेत। या अर्थाचे वार्तिकांत सुरेश्वराचार्यांनी सांगितले आ
हेत ते धर्म जे मुमुक्षु आहेत त्यांणी अवश्य साधक दशेंत संपादन करावे॥१९॥ हे धर्म मुमुक्षूंस जीवन्मुक्ति होण्यास साधन आ
हेत असें प्रतिपादन करीत असतां प्रकरण समाप्ति करतात। येतु यथोक्तं इदं धर्म्यामृतं म्हणजे मुमुक्षु-अद्वेष्टा सर्वभूतानां-इत्या
दिकानें एथवर सांगितलेले मोक्षसाधनत्वास्तव धर्मरूपच जें अमृत त्याची। श्रद्दधाना.-म्हणजे श्रद्धेकरून युक्त। आणि-मत्पर-

येतु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते॥ श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेतीव मे प्रियाः॥२०॥ इतिश्री मद्भगव
द्गीतासूपनिषत्सु योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे भक्तियोगो नाम द्वादशोध्यायः समाप्तः॥१२॥ ॥

माः-म्हणजे मी अक्षर ब्रम्ह स्वरूप वा कूटस्थच आहे प्राप्तव्य त्याम असे होत्साते। पर्युपासते-म्हणजे उपासना म्हणजे अनु
ष्ठान करतात। ते भक्ताः-म्हणजे निरुपाधिक मद्रूप ब्रम्हाचे स्वात्मत्वे करून भजन करणारे भक्त माझे आत्मरूपच आहेत याका
रणामुळें मला। अतीवप्रिया.-म्हणजे निरतिशय प्रीतीचे आस्पद आहेत। याप्रमाणे सगुण ब्रम्होपासनेच्या परिपाके करून नि
रुपाधिक निर्गुण ब्रम्हाचें चिंतन करणारा जो अद्वेष्टृत्वादिक धर्मांनी युक्त मुख्याधिकारी त्यास वेदांत श्रवण मनन निदिध्यास
नाचे आवृत्तीनी किंवा सकृत अनुष्ठानानें महावाक्यापासून ब्रम्हात्मत्व साक्षात्कार होऊन मुक्ति होते यास्तव त्या मुक्तीस
साधन महावाक्यांतील तत्पदार्थ परमेश्वराचे अनुसंधान करावें असें या गीतेतील मध्यम अध्याय षट्कानें सिद्ध झाले॥२०॥
इतिश्रीमद्भगवद्गीतायाः रघुनाथशास्त्रिकृत भाषाविवृतौ द्वादशोध्याय. समाप्त.॥१२॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

प्रथमाध्यायापासून सहाव्या अध्याय पर्यंत प्रथमषट्कांत- अव्यक्तोयमचिंत्योयमविकार्योयमुच्यते- इत्यादिकें करून महावाक्यां-
तील त्वं पदार्थ शुद्धात्म स्वरूप सांगितलें। सप्तमाध्यायापासून द्वादशाध्याय पर्यंत मध्यमषट्कांत- येतक्षरमनिर्देश्यमव्यक्तप-
र्युपासते। सर्वत्र गमचिंत्यंच कूटस्थमचलं ध्रुवं- इत्यादिकें करून तत्पदार्थ शुद्ध ईश्वर स्वरूप सांगितलें। आतां तत्वपदात्मक जें-
वाक्य त्याचा जो त्वंपदार्थ आणि तत्पदार्थ यांचा ऐक्य रूप जो अर्थ त्याचें प्रतिपादन द्वारा ब्रम्हात्मैक्य रूप वाक्यार्थापरोक्ष ज्ञान
हें तृतीय षट्कीं आरंभितात॥ पूर्वी- तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसार बंधनान् भवामि- इत्यें करून माझे जे भक्त आहेत त्यांचा मृत्यु
रूप संसारसमुद्रापासून उद्धार करणारा मी होतों या स्तव तूं माझा भक्त हो असें सांगून भक्तावर भगवंताचा लौकर प्रसाद होण्या
ण्यास साधनभूत जे अद्वेष्टृत्वादिक धर्म त्यांचे अनुष्ठान मुमुक्षूस अवश्य केलें पाहिजे असेंही जीवन्मुक्ताचे ते स्वाभाविक
धर्म आहेत अशा कथनानें सूचविलें। परंतु आत्मस्वरूपाचे अज्ञानामुळे जन्म मरण प्रवाह रूप संसार जीवास जो प्राप्त झाला आ-

श्रीभगवानुवाच॥ इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते॥ एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः॥ १॥ ॥

हे त्यापासून उद्धार- सच्चिदानंदाद्वितीय परब्रम्ह तत्वाचें आत्मत्वें करून जें ज्ञान त्यास आत्मतत्व ज्ञान म्हणतात त्याशिवाय संभव-
त नाहीं। जीवास जो अविद्याकल्पित संसारनिमित्तक सर्वानर्थ प्राप्त झाला आहे त्यास मूलभूत देहादि संघातात्मक कीं वाऱ्याहू-
न भिन्न- जड- मी कर्ता- भोक्ता- रागी- संसारी- अल्पज्ञ- दुःखी- सुखी- परब्रम्हाहून भिन्नच आहें असा स्व स्वरूपाज्ञान मू-
लक भेद भ्रमच आहे। त्याची निवृत्ति होऊन पूर्वोक्त अनर्थ निवारण रूप संसार समुद्रापासून तरण होण्यास पूर्वोक्त धर्मानु-
ष्ठानें भगवद्भक्तानें चित्तशुद्ध जरी झालें तरी ब्रम्हात्मैक्या परोक्षात्मक पूर्वोक्त तत्वज्ञानच पाहिजे। या स्तव अर्जुनास- ब्र-
म्हात्मैक्योपदेश करावा असें मनांत आणून संसारी जीव प्रति शरीरी भिन्न भिन्न असतां त्याचा असंसारी एक अद्वितीय ब्र-
म्हाशीं अभेद कसा संभवेल अशी असंभावना निवृत्त होण्यासाठी संसार हा अविद्येनें कल्पित आहे आत्म्याचा धर्म न-
व्हे आत्मा असंग स्वभाव आहे आत्मभेद ही देहादिक उपाधीमुळे अविद्येनेंच भासविला आहे तो भेद वास्तविक नाहीं। स-

समाध्यांत त्या अपर आणि पर प्रकृति सांगितल्या त्यांचे अविवेकामुळें जीवांस देहादिकांवर तादात्म्याभिमान होऊन हा संसार प्राप्त झाला आहे आणि त्या परापर प्रकृतीच्या योगानें जीवांस कर्मफलोपभोग व्हावा यासाठीं ईश्वरसृष्टि आदिकाविषयीं प्रवृत्त होते त्या प्रकृति द्वयास क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ अशी संज्ञा आहे त्यांचें परस्पर भिन्न भिन्न स्वरूप आहे म्हणजे देहें द्रियांतःकरणात्मक क्षेत्रें आणि क्षेत्रज्ञ सर्व क्षेत्रांत निर्विकार एकच आहे क्षेत्रें मात्र परस्पर भिन्न आहेत-असें अर्जुनास समजावें यासाठीं क्षेत्र-आणि क्षेत्रज्ञ याचा विवेक या अध्यायांत सांगत असतां श्रीभगवान बोलतात॥ हे कौंतेय-इदं शरीरं क्षेत्रं इति अभिधीयते-म्हणजे हे कुंतीपुत्रा अर्जुना सुखदुःखानुभवरूप भोगाचें स्थान भूत इंद्रियें आणि अंतःकरण यांसह जें हें शरीर त्यास क्षेत्र असें म्हणतात॥ धान्यादिकाची निष्पत्ति ज्या भूम्यादिकाचे ठायीं होते त्यास शालिक्षेत्र-गोधूमक्षेत्र-चणकक्षेत्र-असें जसें म्हणतात त्याप्रमाणें। पूर्वार्जित शुभाशुभ कर्मफल सुखदुःखादिकाची निष्पत्ति जी या शरीरांत होते त्या फलनिष्पत्तिरूप गुणानें यास क्षेत्र

क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत॥ क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम॥२॥

असें म्हणतात असें तात्पर्य॥ एतत् यो वेत्ति-म्हणजे या क्षेत्रास हें मीच आहे किंवा माझें आहे असें जो असंग आत्मस्वरूपाचे अज्ञानामुळें मानितो। तं तद्विदः क्षेत्रज्ञ इति प्राहुः-म्हणजे त्यास क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचा परस्पर भेद आहे असें जाणणारे विवेकी तो क्षेत्रफळाचा भोक्ता आहे या कारणानें क्षेत्रज्ञ असें म्हणतात॥१॥ याप्रमाणें आत्मस्वरूपाचे अज्ञानामुळें देहादिक मीच किंवा तो माझा इत्यादिक अभिमानानें युक्त जो तो संसारी जीव असें त्याचें संसारिस्वरूप सांगून आतां पारमार्थिक असंसारिरूप त्याचें सांगून त्याशीं परमात्म्याचें ऐक्य सांगतात॥ हे भारत सर्वक्षेत्रेषु क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि-म्हणजे-हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना-सर्व क्षेत्राचे ठायीं विद्यमान आणि अविद्येनें कर्तृत्व भोक्तृत्वादिक संसारधर्मांचा ज्यावर आरोप झाला आहे परमार्थतः अविद्या आणि अविद्येनें कल्पिलेले जे कर्तृत्वादिक धर्म त्याहींकरून रहित स्वप्रकाश चैतन्य स्वरूप नित्य विभु जो क्षेत्रज्ञ तो अविद्याकल्पित रूप त्यागानें असंसारी अद्वितीय सच्चिदानंद परब्रम्हरूप मीच आहें असें जाण। याप्रमाणें-क्षेत्रक्षेत्रज्ञयोः यत् ज्ञानं-म्हणजे शरीरेंद्रिय संघ

तद्रूप क्षेत्र मायेने कल्पिलेलें मिथ्या आहे आणि क्षेत्रज्ञ तर परमार्थतः सत्यचित आनंद अद्वितीय ब्रह्म स्वरूप असून त्या क्षेत्राचे भा-
स अधिष्ठान आहे असे जें क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचे तत्वनिश्चयात्मक विवेकज्ञान तेंच मोक्षसाधनत्वामुळे अविद्यानाश करणारें। ज्ञानं-
मत मम- म्हणजे ज्ञान आहे याशिवाय दुसरें शिल्पादिकाचे ज्ञान प्रमाणे पांडित्य मात्र रूप जें ज्ञान ते अविद्यानाशक नव्हे ते ज्ञान नव्हे
ते अज्ञानच आहे असे माझें सर्वज्ञ परमेश्वराचे मत आहे। एथे जीव आणि ईश्वर याचा अविद्येने कल्पिलेला भेद घटाकाश महा
काशाच्या भेदाप्रमाणे औपाधिक आहे परमार्थतः अभेदच आहे। तो वेदांतील महावाक्याने उपदेशिला आहे तो पूर्वी प्रकार लिहिला
आहेच याविषयी मुक्तिभाष्यादिक पर्यंत वादविवादानी सविस्तर परमत खंडनपूर्वक लिहिल्या आहेत तो विस्तर समुद्राप्रमाणे आ
हे यास्तव मुमुक्षूनीं साराश मात्र घ्यावा यासाठी तो वाद विवाद न लिहितां सिद्धांतार्थ मात्र लिहिला आहे॥ २॥ संक्षेपाने जो अर्थ सां

तत्क्षेत्रं यच्च यादृक्च यद्विकारि यतश्च यत्॥ स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु॥ ३॥

गितला त्याचेंच सविस्तर निरूपण करण्यास आरंभ करतात। तत्क्षेत्रं यच्च- म्हणजे इदं शरीरं- या श्लोकाने सांगितलेलें जे शरीररू
प क्षेत्र स्वरूपेकरून ज्या जड दृश्य परिच्छिन्न स्वभावाचे आहे। आणि- यादृक च- म्हणजे ज्या इच्छादि धर्मांनी करून युक्त आ
हे। आणि यद्विकारि- म्हणजे ज्या इंद्रिया दिकाच्या विकाराने युक्त आहे। आणि- यतश्च यत्- म्हणजे स्थावर जंगम या भेदाने भि
न्न भिन्न जें। त्या प्रकृति आणि पुरुष यांचे संयोग रूप कारणा पासून उत्पन्न होतें। स च यः- म्हणजे तो क्षेत्रज्ञ ही स्वरूपेकरून
ज्या स्वप्रकाश चैतन्यानंदात्मक स्वभावाचा आहे। यत्प्रभाव - म्हणजे मायारूप उपाधीने कल्पिलेल्या ज्या ज्या शक्तीने युक्त-
आहे। तत्- म्हणजे हें जे क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचे सांगितलेलें सर्व विशेषणानी युक्त यथार्थ स्वरूप त्यापत। समासेन मे शृणु-
-म्हणजे संक्षेपाने मजपासून तू श्रवण कर किंवा निश्चित कर॥ ३॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीनारायणार्पणमस्तु

कोणी विस्तरे करून निरूपण केलें त्याचा तुम्ही ग्रंथे संक्षेप सांगतां असें म्हणाल तर श्रोतृबुद्धीस प्ररोचन होण्यासाठीं जे सांगावयाचें त्याची स्तुति करून बोलतात। ते क्षेत्र क्षेत्रज्ञाचें यथार्थ स्वरूप। ऋषिभि बहुधा गीत-म्हणजे वसिष्ठादिक जे ऋषी त्यांही योगशास्त्राचे ठायीं आणि योगवासिष्ठादिकाचे ठायीं ध्यान धारणा विषयत्वें करून आणि विराट् देह रूपानें अशा बहुत प्रकारानीं निरूपिलें आहे। आणि-विविधैः छंदोभिः पृथक् गीत-म्हणजे नित्य नैमित्तिक कर्म प्रतिपादन करणारे जे वेद किंवा ऋगादिक मंत्र आणि ब्राम्हण याही यजन करण्यास योग्य ज्या देवता आणि यजन करणार यजमान यांच्या अनेकविध रूपानीं गाइलें किंवा निरूपिलें आहे। आणि-ब्रम्हसूत्रपदैश्च बहुधा गीत-म्हणजे ब्रम्ह बोधक रूप देणारीं जीं सूत्रें आणि पदें त्यांहीं जे बहुत प्रकारानीं निरूपिलें आहे। पूर्वोक्त शाखाचंद्रन्यायानें कांहीं व्यवधान करून तटस्थ लक्षणानें ब्रम्हस्वरूपाचें सूचन रूप बोधन करतात अशीं हीं भूतें ज्यापासून उत्पन्न होतात किं वा ज्या पासून उत्पन्न झालीं आहेत। किंवा ज्याचे सत्तेने युक्त होऊन अस्तित्व व्यवहारास योग्य होणें अशा स्थि

ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक्॥ ब्रम्हसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः॥ ४॥

तीप्रत पावतात आणि लय पावत असतां ज्यांतच सर्वां लयप्राप्त म्हणजे आपलें नाम रूपात्मक व्यक्त स्थूल रूप टाकून अव्यक्त कारण रूपानें स्थित होतात ते ब्रम्ह असे जगदुत्पत्ति स्थिति लयकारणत्व रूप तटस्थ ब्रम्हलक्षण सांगणारी वेदांतील सर्व कारण वाक्ये ती ब्रम्हसूत्रें म्हणावीं-आणि-साक्षात्स्वरूपलक्षणानें ब्रम्हस्वरूपाचें बोधन करतात अशीं जीं ब्रम्ह सत्य आहे ज्ञानरूप आहे आनंदस्वरूप आहे असे सच्चिदानंदात्मक मिथ्या जड दुःखाहून भिन्न ब्रम्हस्वरूपाचें लक्षण सांगणारी वेदांतील ब्रम्हस्वरूप प्रतिपादन करणारी वाक्यें तीं पदें म्हणावीं। तीं ब्रम्हसूत्रें आणि ब्रम्हपदें कशीं तीं विशेषणानीं सांगतात। हेतुमद्भिः-म्हणजे लक्षणानीं ज्याचें प्रतिपादन करावयाचें आहे तें ब्रम्ह या जगाचे पूर्वीं सद्रूप सजातीय स्वगत भेदशून्य एक अद्वितीय कारणरूपानेंच होतें त्यास जग करावें असा संकल्प होऊन त्यापासून हें सर्व जग उत्पन्न झालें असें सांगून सृष्टीपूर्वीं या जगास कारण कांहीं नव्हतें-जगदुत्पत्तीचे पूर्वीं अत्यंत असतच होतें म्हणजे या जगाचें स्थूल किंवा सूक्ष्म रूप कांहीं

नवतें। असे कोणी बोलतात असत्कार्यवादी किंवा असद्वादी याचे मताचा अनुवाद करून त्या मताचे निराकरण करण्याक
रिता- जे कार्य उत्पन्न होते ते आपले उपादान कारणाशी सजातीयच उत्पन्न होते- जसें मृत्तिकेपासून उत्पन्न झालेले घटशराव
इत्यादिक कार्य मृन्मयच होते- सुवर्णापासून उत्पन्न झालेले कटककुंडलादिक सुवर्णमयच होतें। अत्यंत विजातीय होत नाही
। याप्रमाणे- हे उत्पन्न झालेले जग सद्रूप करून म्हणजे- अस्ति- आहे- अशा व्यवहारांत सत्तेने युक्त जें भासतें ते सद्रूप कारणा
पासूनच उत्पन्न झाले असावें। असतापासून सत् कसें उत्पन्न होईल। यास्तव या जगास सृष्टी पूर्वी कारण जे सद्रूप आहे तेंच ब्र-
म्ह- आणि ब्रम्ह आनंदात्म स्वरूपच आहे त्या आनंदात्मक ब्रम्हापासून आकाशादिक पंच महाभूतें आणि भौतिक स्थूल सू-
क्ष्म देह इंद्रियादिकांची उत्पत्ति झाली असे सांगून या सृष्टीस उत्पन्न करणारा सृष्टीचे पूर्वी आसमंता झागी प्रकाशावणारा ब्र
म्हात्मस्वरूप आनंद नसेल तर कोण प्राणी अपान आणि प्राण वायू यांच्या व्यापारानें युक्त होईल हाच सर्व प्राण्यास जो वैषयि
कानंद प्रतिबिंबरूप होतो [illegible] कारण बिंबरूप आनंद आहे। अशा ब्रम्हमतेचे व्यवस्थापन करणाऱ्या ज्या युक्ती त्या श्रु-
तींनी युक्त ही पूर्वोक्त [illegible] आहेत। आणि- विनिश्चित- म्हणजे उपक्रम म्हणजे आरंभ आणि उपसंहार
म्हणजे समाप्ति हे ज्यांचे [illegible] अद्वितीय सद्रूप एकच ब्रम्हात्म तत्त्व आहे या विषयीचे आहेत यामुळे निःसंशय जे
ब्रम्हात्मैक्यरूप मुमुक्षूंनी ज्ञेयार्थ त्याचे प्रतिपादन करणारी तीं ब्रम्हसूत्रें आणि ब्रम्हपदें आहेत। उपक्रम आणि उपसंहा
राचे ऐक्यरूपामुळें निःसंशय अद्वितीय ब्रम्हात्म तत्त्व बोध कोणत्या वाक्यापासून होतो त्याचें ज्ञान होण्यास संक्षेपानें छांदो
ग्यांतील सद्विद्येचे उदाहरण येथें लिहितो। उद्दालक नामक ऋषी त्याचा पुत्र श्वेतकेतु आपले गुरुकुलापासून सकल वेदादि
क विद्येचा अभ्यास करून आपले पित्याचे घरी आला। तो निरंतर स्वबुद्धिमानीच होऊन गर्वित झाला। त्याची स्तब्धता जावी या हेतूनें
उद्दालकानें त्यास आरंभीं प्रश्न केला की- जे वस्तु उपदेशानेंच समजते। ज्याचें ज्ञानानें न जाणलेले ही जाणलें जातें। न ऐकलेले
ही ऐकलें जातें असे वस्तु आपले गुरूपासून समजून घेतलेंस काय। अशा प्रश्नानें एका कारणाच्या ज्ञानानें सर्व कार्यांच्या कारण

स्वरूपानें ज्ञानाची प्रतिज्ञा करून त्या वस्तूचा उपदेश करण्यास आरंभ केला. त्या आरंभी हें सर्व नाम रूपें करून व्यक्तीस पावलेलें द्वय-
मान जग सृष्टीचे पूर्वी एक अद्वितीय सद्रूपच होतें तें या जगाचें बहुत रूपानें विस्तार व्हावा हें जग उत्पन्न करून या जीवात्म रूपानें-
त्यांत प्रवेश करून नाम आणि रूप यांहींकरून या जगास स्पष्ट व्यवहारास योग्य करीन असा संकल्प करते झालें नंतर सद्रूप उपा-
दान कारणापासून या सर्व प्रजा उत्पन्न झाल्या त्या सद्रूपाधिष्ठान सत्तेनेंच सत्तेस पावल्या आहेत. याचें लय स्थान सद्रूपच आहे अ-
सें सांगून नंतर जसें एका मृत्पिंडाचे ज्ञानेंकरून मृण्मय विकार जे घट राजण इत्यादिक ते मृत्तिका स्वरूपानें जाणले जातात ते
विकार केवळ वाणीनें उत्पन्न होणारे घट शराव राजण इत्यादिक नाम मात्र आहे परंतु त्या नामाचा मृत्तिके शिवाय दुसरा अर्थ आ-
हे असें नाहीं त्या शब्दाचा मृत्तिका हाच सत्य अर्थ आहे अशा प्रकारच्या अनेक दृष्टांतानीं उपादान स्वरूप जाणलें म्हणजे त्या
उपादान स्वरूपानें उपादेय सर्व कार्य स्वरूप ज्ञात होते असें दाखऊन या प्रमाणे जगास कारण तें सद्वस्तु आहे त्या उपादान का-
रण सद्रूप वस्तूच्या ज्ञानानें हें सर्व जग अस्ति आहे अशा सत्तेनें निरनिराळे नामरूपानें व्यवहारास एतें वस्तुतः सद्रूपाहून नि-
राळें पाहिलें असता असत् मिथ्याच आहे असे सद्रूप ब्रम्हज्ञानानें सद्रूपानें सर्व जगाचें ज्ञान मध्यें सांगून अंतीं हें सर्व जग
ऐतदात्म्य म्हणजे सद्रूप जो आत्मा तत्स्वरूपच आहे हा आत्मा ज्याच्या तो एतदात्मा त्याचा जो भाव तें ऐतदात्म्य असा बहु-
व्रीही समास करून नंतर भाव प्रत्यय करावा भाव म्हणजे प्रकृतीचा अर्थ तो अर्थ आहे यावरून एतदात्मा
या बहुव्रीही समास प्रतिपाद्य एतदात्म संबंधी असा अर्थ त्यांतील सद्रूप प्रकार भूत जो आत्मा तो ऐतदात्म्य शब्दाचा अर्थ
आहे. हा आत्मा हें सर्व जग असें म्हटल्यानी ही हा अर्थ निष्पन्न होतो तथापि असें म्हणणें हा महदात्मा अशा आत्मा स्वी-
य भाव संबंध स्थलींही संभवतें तसा जगाचा आणि आत्म्याचा संबंध नाहीं असें सूचवण्या साठीं बहुव्रीही आणि भाव
प्रत्यय असा प्रयत्न केला. त्यामुळे जर आत्मा स्वीय भाव रूप संबंध एथें विवक्षित आहे तर त्याचा बोध बहुव्रीहीनें ही होतो म-
ग भाव प्रत्यय निराळा केला याचें वैयर्थ्य येईल यामुळे ती शंका गेली तरी-हा आत्मा ज्याचा अशा बहुव्रीहींत हा आत्मा अ-

से जे पदाचें सामानाधिकरण्य आहे ते - मृत् घट. - एथे जसे परिणाम रूपार्थी आहे किंवा - यत् रजत इति अभात् साशक्ति. यः चौरः सः स्था
णु. - एथे जसे बोधार्थी हें आहे त्यांतून कोणते अर्थी आहे असा संशय होऊन ये यास्तव त्याचा निर्णय करण्यासाठी ते सत्य या अर्थाचे वा
क्य आहे त्यांतील तत या शब्दाचा प्रकृत जो सद्रूप प्रधानभूत आत्मा तो अर्थ ते व्हांतो आत्माच सत्य असे त्याणे सिद्ध झालें यावरून
न जगद्रूप विकार अनृत मिथ्या असा अर्थ निष्पन्न झाल्यानें तें सामानाधिकरण्य बाधार्थी आहे असा निश्चय होऊन जसा पूर्वोक्त
उदाहरणी जे रजत म्हणून भासले तें रजत नव्हे तर शक्ति असा रजताचा बाध होऊन शक्तितत्व त्या वाक्याचा अर्थ किंवा दुरून उं
च पदार्थ पाहून हा चोर असा जो भासला होता तो चोर नव्हे तर स्थाणु म्हणजे वृक्षाचा खुंट आहे असा चोराचा बाध होऊन स्था
णूची सत्ता असा त्या वाक्याचा अर्थ होतो त्याप्रमाणे जेंहे भिन्न भिन्न सत्तेने नाम रूपात्मक जग भासत होतें ते सद्रूप आत्माच आहे
असा जगाचे सत्तेचा बोध होऊन सद्रूपात्म सत्ता असा त्या वाक्याचा अर्थ होतो नंतर तो सद्रूप आत्मा तूच आहेस असा श्वेतकेतू
शेवटी ब्रम्हात्मोपदेश केला असा आरंभी आणि मध्ये आणि अंती ब्रम्हात्मैक्य रूप एकच अर्थ सांगितला यावरून सर्व सद्विदे
चे अद्वितीय ब्रम्हात्मैक्य प्रतिपादन करण्याविषयी तात्पर्य आहे असा विचार व तास निर्णय होतो। यासविषये चे तात्पर्य जीव आ
णि ईश्वर भिन्न आहेत जग सत्य आहे याविषयींच आहे असे उपक्रम आणि उपसंव्हार याचे क्लिष्ट कल्पनेने निराळे आपले प
क्षास साधक अर्थ करून वर्णन करतात परंतु ते वास्तविक नव्हेत असे समजण्यासाठीं श्री वेदव्यासानी महाद्वियेचे मोक्षधर्मांत
श्वेतकेतु आणि सुवर्चला याने संवाद रूपाने उपबृंहण म्हणजे व्याख्यान लिहिलें आहे त्याचें संक्षेपाने एथें वर्णन करतो
म्हणजे त्याचे ते वर्णन दुराग्रहामुळे असे स्पष्ट होईल॥ सुवर्चला नामक देवकन्या जन्मांतर सिद्ध ब्रम्हतत्वानुभव जीस झा
ला आहे अशी होती ती आपले सारखा ब्रम्हवेत्ता पती आपणास असावा असे इच्छून श्वेतकेतू सत्याचे पित्यापासून ब्रम्हात्म
तत्वबोध झाला आहे असे ऐकून त्यास तिने पतित्वें करून वरले नंतर ब्रम्हवेत्ती तीं दंपती गृहस्थाश्रम धर्मांनीं युक्त असतां म
हिर्षेचे ठायी उद्दालकाने वारंवार ब्रम्हतत्वोपदेश केलेला श्वेतकेतु ब्रम्हात्मतत्व कसें जाणतो हें समजण्याचे इच्छेनें सुव

र्चं लेनें श्वेतकेतूस प्रश्न केला तो असा - ततः कदाचित् भर्त्तारं श्वेतकेतु स्मवर्चला ॥ प्रपच्छ को भवानत्र ब्रूहि मे द्विजसत्तम - हे
द्विजश्रेष्ठा तूं कोण आहेस असा आपले भर्त्यास स्मवर्चलेनें प्रश्न केला। त्या प्रश्नाचा अभिप्राय श्वेतकेतूनें जाणून ही एकाए-
कीं उत्तर न देतां क्रमानें उत्तर द्यावें अशा तात्पर्यानें - तामाह भगवान् वाग्मीत्व याज्ञातो न संशयः ॥ द्विजोत्तमोहं क्रमगे सत्यव्रत
परायणः ॥ हे द्विजोत्तम असें मला संबोधन करणारी जी तूं इणे मी ब्राम्हण सत्यव्रतपरायण आहें असें जाणलेंच आहे तेव्हां
यांत प्रष्टव्य काय आहे असें उत्तम बोलणार ब्रम्हवेत्ता जो श्वेतकेतु यानें उत्तर दिलें। नंतर - सातमाह मया त्मानं पृच्छामि हृदिस्था
यिनं ॥ देहोपाधि रूप निमित्ताने आत्म्यावर कल्पिलेले जें देहावरील प्रत्यक्ष ब्राम्हण्य त्याविषयीं माझा प्रश्न नाहीं तर मी द्विजो
त्तम आहे असा जो देहाहून निराळा आत्मा अहं म्हणजे मी या शब्दानें सांगतोस त्या हृदयांत शयन करणाऱ्या आत्म्यावि-
षयीं माझा प्रश्न आहे असें स्मवर्चला बोलली। नंतर - तच्छ्रुत्वा प्रत्युवाचेनां सर्वज्ञो मुनिपुंगवः - ते ऐकून तो सर्वज्ञ मुनिश्रेष्ठ
श्वेतकेतू स्मवर्चलेप्रत वक्ष्यमाण प्रत्युत्तर बोलला - मनसैव समायुक्त मात्मानं मन्यसे यदि ॥ तन्मिथ्या गोत्रसद्भावे वर्तते दे
हबंधनः ॥ त्वमप्यहमहं सर्वं महमित्येव वर्तते ॥ नात्र तत्परमार्थं तद्यन्मां त्वमनुपृच्छसि - मन आदिक उपाधीनीं युक्त जें आ
त्मस्वरूप त्याचे ठायीं अहं या शब्दाचा प्रयोग मुख्य आहे। मन आदिक उपाधीनीं युक्त जे लोकांनीं मानलेलें आत्मस्वरूप तें ब्राम्हण
कुलोत्पन्न देहाचे उपाधीनी आत्म्यावर कल्पिलेल्या ब्राम्हण्या प्रमाणें मिथ्याच आहे। यास्तव अहं शब्दार्थ मुमुक्षूस प्रश्न करण्यास
योग्य नाहीं। आणि अहंभाव माझे ठायीं आणि तुझे ठायीं आणि दुसऱ्याचे ठायीं ही साधारण प्रत्यक्षच आहे यास्तव परमार्थ वस्तू
चे जाणण्याची इच्छा जर तुला आहे तर अहंभाव प्रश्नार्ह नाहीं असें प्रत्युत्तर श्वेतकेतूनें दिलें। नंतर कर्तृत्व भोक्तृत्वादियुक्त
अहंभाव जर मिथ्या आहे तर कर्तृत्व ज्ञानपूर्वक श्रौतस्मार्त रूपवैदिक कर्म तूं कसें करतोस असा स्मवर्चलेनें प्रश्न केल्या
नंतर - लोकसंग्रहार्थ मी कर्म करतो - असें उत्तर श्वेतकेतूनें दिलें। नंतर अहं या शब्दाचा प्रयोग सर्व अहंभावावर करता
त तो व त्याचा मुख्य वाच्यार्थ आहे मुख्य आत्मा तर शब्दाला अगोचर आहे त्यावर वाणीची प्रवृत्ति नाहीं असें श्वेतकेतूनें

सांगितल्यानंतर पुन. स्वादपतीची प्रश्नोत्तरें प्रवृत्त झाली। श्वेतकेतु प्रश्न करते - सदाहंकारशब्दोयं व्यक्त मात्मनि संश्रितः॥ न
वाच स्तत्र वर्तेत इति मिथ्या भविष्यति। शब्दाचा आणि अर्थाचा वाच्यवाचक भाव संबंधच आहे संयोगादिक नाही तेव्हां स
र्व अहं शब्दाचा प्रयोग आत्म्यावर लौकिक व्यवहारात करतात असे असून आत्म्याचे ठायी शब्दाची प्रवृत्ति नाही असें मिथ्या
कसें सांगता। असा श्वेतकेतूनें प्रश्न केला। त्यावर - अहं शब्दोप्यहंभावे नात्मभावे शुभ प्रभो॥ न वर्तते परो चित्ते वाचः सगुण
लक्षणा॥ अहं शब्द अहंभावाचे ठायीं प्रवृत्त होतो। गुण कर्म जाती या धर्मांचे संबंधानें प्रवृत्त होणाऱ्या वाणी निर्धर्मक-निर्गु
ण- निष्क्रिय- अचिन्त्य-परमात्म तत्त्वाचे ठायी प्रवृत्त होत नाहीत असें श्वेतकेतूने उत्तर दिलें। नंतर - अहंभावोत्र कोनाम ह्या
त्मभावस्तथैव च॥ तन्मे ब्रूहि यथान्याय मेवं च मुनि सत्तम॥ असं आहे तर अहंभाव तो कोणता आणि त्याहून भिन्न आत्म
भाव तो कोणता ते मला मुनिश्रेष्ठा सांग। असें श्वेतकेतूनें पुसल्या नंतर - मृन्मयो हि घटाभास स्तादृक् भाव इहेष्यते॥ अहं-
भावः परे चित्ते ह्यात्मभावो महान्परः॥ न वाचस्तत्र वर्तन्ते इति नैव विरुध्यते- मृत्तिकेचे ठायी घटाचा जसा आभास मिथ्या क-
ल्पिला आहे तसा असंग आत्मस्वरूपाचे ठायीं अहंभाव हा आभास मिथ्या भूत कल्पिला आहे॥ असा अहं या शब्दाचा अ
र्थ आणि आत्मा याचा भेद दाखवून कल्पिताकारात्मक उपाधीला घेऊन प्रवृत्त जो अहं शब्द तो आत्मस्वरूपाचे ठायीं मुख्यवृत्तीक-
न राहत नाही। तेथें लक्षणेनेच ज्ञाते लौकिक वैदिक व्यवहारात त्याचा प्रयोग करतात। हें पूर्वीं अहं शब्दाचे एक मुख्य अर्थ
आणि दोन अमुख्य अर्थ असे प्रतिपादन केलें आहे तेथें सविस्तर लिहिलेंच आहे। यावरून मुख्य वृत्तीनें कोणतीही वाणी आ
त्मस्वरूपाचे ठायी राहत नाही हे विरुद्ध नाहीं। सर्व शब्दाची शुद्ध आत्मस्वरूपावर लक्षणाच आहे असें तात्पर्य सांगून या
चा उपसंहार केला। नंतर आत्मा अहंकाराहून भिन्न आहे तो सर्व प्रपंचास अधिष्ठान भूत ब्रम्हरूप आहे असें श्वेतकेतू
नें सिद्ध करून आकाश सर्व वाय्वादिकास आश्रय असला तरी निरवयवत्व असंगस्वभावामुळे वायु आदिकाशी अ
संबद्धच आहे याप्रमाणें सर्व प्रपंचास अधिष्ठानभूत ही परब्रम्ह असंगत्वामुळे प्रपंचाशी असंबद्ध आहे असे श्वेतकेतू

नि प्रतिपादन केल्यानंतर पुन. प्रश्नोत्तरे प्रवृत्त झालीं। श्वेतकेतु म्हणाला-निर्विकारं ह्यमूर्तं च निरंशं सर्वगं तथा॥ दृश्यते च वियन्नित्यं तादृगात्मा न दृश्यते। निर्विकार निरवयव क्रियाशून्य सर्वव्यापक आकाश जसें दिसतें तसा आत्मा कां दिसत नाहीं असा श्वेतकेतूनें प्रश्न केल्यावर। श्वेतकेतु.-त्वचा स्पृशति वै वायुमाकाशस्थं पुनःपुनः॥ तत्स्थं गंधं तथा घ्राति ज्योतिः पश्यति चक्षुषा॥ तमो रश्मिगणं चैव मेघजालं तथैव च॥ वर्षतारागणं चैव नाकाशं दृश्यते पुनः॥ आकाशस्याप्यथाकाशं सद्रूपमिति निश्चितं॥ सदर्थे कल्पितं सर्वं तत्सत्यं विष्णुरेव च॥ यानि नामानि गौणानि ह्युपचारात्परात्मनि॥ न चक्षुषा न मनसा न चान्येन परो विभुः॥ चिंत्यते सूक्ष्मया बुध्या वाचा वक्तुं न शक्यते॥ एतत् प्रपंचमखिलं तस्मिन्नेव प्रतिष्ठित-आकाशांत राहणारा जो वायु त्याचे त्वचेनें स्पार्शन प्रत्यक्ष होतें। आकाशांतील तेजाचें-तमाचें-सूर्यकिरणांच्या समुदायाचें-तारागणाचें-वृष्टीचें-चक्षूनें प्रत्यक्ष होतें। हे पदार्थ निराळे करून त्याशिवाय आकाशाचें प्रत्यक्ष होत नाहीं आणि आकाशावर रूप आणि स्पर्श नाहींत यामुळें त्याचें कोणतेही इंद्रियानें प्रत्यक्ष होतच नाहीं त्याचे शब्दरूप विशेष गुणानें अनुमानमात्र होतें असेंच तार्किकादिक मानतात। लौकिक आकाशाची ही गति मग आकाशापेक्षांही सूक्ष्म जें अरूप अशब्द अस्पर्श सद्रूप ब्रम्हात्म वस्तु तें चक्षुरादिक इंद्रियांनीं कसें प्रत्यक्ष होईल। त्या सत्‌रूप ब्रम्हाचे ठायीं हें सर्व विश्व कल्पिलेलें आहे तें च सद्वस्तु सत्य आणि सर्व व्यापक आहे त्याचें शुद्ध सूक्ष्म बुद्धीनें चिंतन होतें। वाणीनें तें बोलण्यास शक्य नाहीं। जीं कल्पित गुणाचे योगानें परमात्म्याचे ठायीं नामें आहेत तीं लाक्षणिक आहेत। त्यांची मुख्य वृत्तिम्हणजे वाच्यता असंग निर्धर्मक आत्मस्वरूपाचे ठायीं नाहीं। असें श्वेतकेतूनें उत्तर दिलें। या प्रश्नोत्तरपरंपरेत-मृन्मयो हि घटाभासं तादृक्भास इहेष्यते-येणेंकरून वाचारंभणश्रुत्यर्थ जो एथें लिहिला तो स्पष्ट केला आहे॥ सद्रूपं एणेंकरून अदर्थाहून भिन्न आत्मा कोण असा त्याविषयीं प्रश्न केला त्या आत्मस्वरूपास सद्रूप ब्रम्ह म्हणून सांगितली। एणेंकरून श्वेतकेतू तूं जो तूं सद्रूप आत्मस्वरूप ब्रम्ह आहेस-असा महावाक्यानें उपदेश केला तो ब्रम्हात्मैक्यरूप महावाक्यार्थ स्पष्ट केला आणि-सदर्थे कल्पितं सर्वं तत्सर्वं विष्णुरेव च-एणेंकरून ब्रम्हात्मैक्यरूप महावाक्यार्थबोधास अनुकूल हें जगत्

तदात्म्यच आहे ते तद्रूपच सत्य आणि आत्मा आहे- असा जो सद्विद्येंत सांगितलेला अर्थ तो स्पष्ट करून दाखविला। या उपबृंह
णात्मक सद्विद्येचे व्याख्यानानें सद्विद्येतील उपक्रम आणि उपसंव्हार अद्वितीयनिष्प्रपंच ब्रम्ह आणि जीव यांचें ऐक्य प्रति
पादनाविषयींच आहेत असें सिद्ध होतें ॥ अथवा- अथातो ब्रम्हजिज्ञासा - यास आरंभ करून। अनावृत्ति शब्दादनावृत्ति
शब्दात् - एतदंतजी चतुरध्यायी उत्तर मिमांसा तीस ब्रम्हमीमांसा असेंही म्हणतात ती सूत्रात्मक आहे। तीं सूत्र ब्रम्ह प्र
तिपादन करतात म्हणून त्यास ब्रम्हसूत्रें म्हणतात। तद्रूप म्हणजे त्या सूत्रात्मक जी पदें म्हणजे जगाच्या उत्पत्तिस्थिति
लयांस कारण जें अद्वितीय परब्रम्ह तेंच वेदांत प्रतिपाद्य आहे अशा प्रकारानें परब्रम्ह प्रतिपादन करणारी अशा ब्रम्हसूत्रात्मक
पदांनी जें क्षेत्र क्षेत्रज्ञस्वरूप उत्तम विचारात्मक मीमांसेनें प्रतिपादिलें आहे तीं पदें कशीं आहेत तें सांगतात। हेतुमद्भिः - पूर्वोक्त
प्रकारांनी प्रतिपादन करण्यांत जे हेतु तद्वाचक पंचम्यादि विभक्तींनी युक्त। आणि विनिश्चितैः - संशय पूर्वपक्ष सिद्धांत दाखवून
विवक्षित पूर्वोक्त अर्थाचा निश्चय करून देणारीं अशीं आहेत। ते हेतु कसे त्यांचें स्वरूप समजण्यासाठीं। ईक्षतेर्नाशब्दं - या सूत्रां
तील हेतूचें निरूपण एथें संक्षेपानें लिहितों॥ अथातो ब्रम्हजिज्ञासा - या प्रथम सूत्रें करून शमदमादि साधनसंपन्न जो मुमु
क्षु त्याणें मोक्षसाधनभूत जें ब्रम्हात्मैक्य ज्ञान त्याचे प्राप्तीविषयीं वेदांत वाक्यांहीं करून ब्रम्हात्म विचार करावा असें सांगू
न नंतर ब्रम्हलक्षण समजल्याशिवाय ब्रम्हविचार होणार नाहीं यासाठीं - जन्माद्यस्य यतः - या द्वितीय सूत्रानें ज्या सत्यज्ञाना
नंदात्मक ब्रम्हापासून या जगाची उत्पत्ति स्थिति प्रलय लय होतात ते ब्रम्ह असें जगदुत्पत्तिस्थितिलयकारणत्वरूप तटस्थ
लक्षण आणि सत्य ज्ञानानंदात्मक ब्रम्ह असें स्वरूप लक्षण सांगितलें। या दोन लक्षणांचा विचार विस्तरानें पूर्वीं लिहिलाच आ
हे। लक्षण सांगितल्यानंतर ब्रम्ह जगाचे उत्पत्ति स्थिति लयास कारण सच्चिदानंदात्मस्वरूप आहे याविषयीं शास्त्र म्हणजे वे
दच प्रमाण आहेत असें - शास्त्रयोनित्वात् - या सूत्रानें सांगितलें। नंतर जगदुत्पत्ति स्थिति लयास कारण सत्यज्ञानानंदात्म
क जसें ब्रम्ह वेदांत सांगतात तशा ब्रम्हस्वरूपाचें ज्ञान ज्यास आहे तो अग्निहोत्रादिक वैदिक कर्मे करण्यास प्रशस्त अधिका

री असें कर्मांगत्वेंकरून किंवा वेदांतातील ज्या उपासना आहेत त्यांचें उपास्य ब्रम्ह या लक्षणानें आहे असें उपासनांचें अंगत्वें करून
च ब्रम्हाचें निरूपण केले आहे। प्राधान्येंकरून निरूपण केलें नाहीं। असें मीमांसादिक म्हणतात। त्यांचे मताचें निराकरण करण्या
साठीं- तत्तु समन्वयात्- या चतुर्थ सूत्रानें ब्रम्ह वेदांतांत स्वप्राधान्येंकरून सांगितलें आहे। कर्मशेषत्वें करून म्हणजे कर्मांगत्वेंक
रून किंवा उपासनांगत्वें करून सांगितलें नाहीं। कारण उपक्रम उपसंहारादिक जीं तात्पर्यनिर्णयाला कारण लिंगें आहेत त्यांव
रून स्वप्राधान्यें करूनच सर्व वेदांत ब्रम्ह प्रतिपादन करतात असें निश्चित आहे असें सांगितलें। नंतर सद्विद्या जगत्कारणत्वें
करून सृष्टिपूर्वकालीन साम्यावस्थायुक्त गुणत्रयात्मक प्रधानस्वरूपाचेंच प्रतिपादन करते तेव्हां सर्व वेदांत कारणत्वें करून
ब्रम्हप्रतिपादन करतात हें संभवत नाहीं अशी सांख्याचे मतानें शंका आली तीचें निराकरण करण्यासाठीं- ईक्षतेर्नाशब्दं- असें सू
त्र केलें। त्या सूत्रांत पूर्वोक्त- तत्तु समन्वयात्- या सूत्रातील तत् या शब्दाची अनुवृत्ति करावी। प्रधान या शब्दाचा अध्याहार क
रावा। म्हणजे तें पद बाहेरचें घ्यावें। म्हणजे- प्रधान- न तत्- म्हणजे जगत्कारणत्वेंकरून सद्विद्या प्रतिपाद्य नव्हे। यास हेतु- अ
शब्दं- म्हणजे सद्विद्येतील जगत्कारणाचा वाचक जो- तत्- हा शब्द तत्प्रतिपाद्यत्व प्रधानास नाहीं यावरून। प्रधानास तत्-
शब्दप्रतिपाद्यत्व कां नाहीं असें म्हणाल तर त्याविषयीं हेतु- ईक्षतेः- म्हणजे तत् या शब्दाला- तदैक्षत- असा ईक्ष धातू
चा योग आहे यास्तव जगाचे कारणाचा वाचक तत् या शब्दाचा जर प्रधान अर्थ होईल तर ईक्ष धातूचा जो आलोचन किंवा
संकल्परूप अर्थ त्याचा अन्वय त्यावरच होईल। आलोचन किंवा संकल्प हे चेतनाचे धर्म आहेत हे जड प्रधानावर संभवतन
ही तयास्तव तत् या शब्दाचा अर्थ प्रधान नव्हे तर चेतन ब्रम्हच आहे असा हेतु यासूत्रांत सांगितला आहे। असेंपुढेंहीप्र
ति सूत्रीं हेतु दाखवून सर्व वेदांतांत जगत्कारणत्वें करून सच्चिदानंदाद्वय ब्रम्हच प्रतिपाद्य आहे। जीव किंवा जड प्रकृतिप्र
धानादिक प्रतिपाद्य नाहींत असें त्या सूत्रांहीं करून निश्चित केलें आहे ॥ ४॥ या प्रमाणें प्ररोचना उत्पन्न करून अर्जुनास क्षेत्र-
स्वरूप सांगतात॥ महाभूतानि- म्हणजे पृथिवी- आप- तेज- वायु- आकाश- हीं पंच महाभूतें। अहंकारः- पंचमहाभूतांस का

रण भूत अभिमान स्वरूप। बुद्धि-अहंकारास कारणभूत अध्यवसाय म्हणजे निश्चय त्यासच महत्तत्व असें म्हणतात। अव्यक्त एव
-बुद्धीस कारणभूत सत्वरजतमोगुणात्मक प्रधान सर्व जगाचे कारण ते कोणाचें ही कार्य नव्हे। प्रकाराने हे आठ पदार्थ च प्रकृती अ
शी सांख्य मताने यांची व्याख्या। ही वेदान्त्यास मान्य नाहीं। सांख्यमतसिद्ध सांगितलेले स्वरूपाचे अव्यक्त महत्तत्व अहंकार हे पद
र्थ वेदप्रतिपाद्य नाहीत असे वेदांती म्हणतात। यास्तव वेदान्त्यांचे मतानें याची व्याख्या अशी करावी। प्रकृतीस माया-असें म्हणावे
मायोपाधिक जो त्यास ईश्वर असे जाणावे उनशा अर्थाच्या श्रुतीत जी माया सांगितली आहे ती अव्याकृत अनिर्वचनीय माया
एथील अव्यक्त शब्दाचा अर्थ। तीच-ममसाया दुरत्यया-एणेकरून भगवंतानी गीतेत ही सांगितली आहे। सृष्टीचे आरंभीत
मायेविषयीं चे जें ईक्षण म्हणजे पाहणे जेंसद्दिघेत-तत् ऐक्षत-म्हणजे ते सद्रूप ब्रह्म ईक्षण करतें झालें असें सांगीतलें तेंबु

महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेवच॥ इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः॥ ५॥
इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः॥ एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतं॥ ६॥

द्धि या शब्दाचा अर्थ। अहंकार-ईक्षणानंतर मी बहुत रूपाने उत्पन्न होईन-असा जो जगाचे कारणभूत सद्रूपाचा बहुभवनसंक
ल्प तो अहंकार शब्दाचा अर्थ। त्यासंकल्पानंतर पृथिव्यादिक पंचमहाभूतांची आकाशादि क्रमेंकरून उत्पत्ति। इंद्रियाणि दशैकं
च-श्रोत्र-त्वक्-चक्षु-रसन-घ्राण-ही पांच ज्ञानेंद्रिये आणि-वाक्-पाणी-पाद-पायु-उपस्थ-ही पांच कर्मेंद्रिये अशीं दाहा इंद्रि
ये। आणि एकं-एक संकल्प विकल्पात्मक मन। आणि-पंच च इंद्रियगोचराः-शब्द स्पर्श रूप रस गंध असे पांच पांच ज्ञानेंद्रि
याचे विषय। यासच सांख्य चतुर्विंशति तत्वे असें म्हणतात॥ ५॥ इच्छा-म्हणजे सुखा विषयीं किंवा सुखाचे साधनाविषयीं
मला हे असावे अशी स्पृहात्मक चित्ताची वृत्ति। तिलाच काम किंवा राग असे म्हणतात। द्वेष-म्हणजे दुःखाविषयीं किंवा त्या
चे साधनाविषयी हें मला नसावे अशी पूर्वोक्त स्पृहेला विरोधी चित्ताची वृत्ति जीस क्रोध किंवा ईर्ष्या म्हणतात। सुखं-म्हणजे

पुण्याख्य धर्मच मुख्य कारण जीस आहे आणि करावासाठी दुसऱ्याची इच्छा होते करावाविषयींची इच्छा करावार्थ चहोते अशी निरुपाधिक च इच्छा जीविषयी आहे अशी ज्या करवाकार वृत्तीत परमात्मरूप प्रतिबिंबित होतें अथवा ज्या वृत्तीनें परमात्मस्वरूप करवाची अभिव्यक्ति होते ती वृत्ति। दुःख-म्हणजे निरुपाधिक द्वेषांत विषय आणि पापस्वरूप अधर्मच जीचे उत्पत्तीस मुख्य कारण आहे अशी चित्ताची वृत्ति। संघात.-म्हणजे पंचमहाभूतांचा जो परिणाम म्हणजे इंद्रिये आणि शरीर यांचा विलक्षण संबंध रूप समुदाय। चेतना-म्हणजे ब्रम्हस्वरूप ज्ञानाची जीत अभिव्यक्ति होते अशी जी इंद्रियादिक प्रमाणाचे द्वारा होणारी विषयाकार अंतःकरण वृत्ति जीस तार्किकादिक जन्यज्ञान असे म्हणतात। धृतिः-म्हणजे मरणादिसमयीं भूमीवर पडावाजोगीं झाले लीं जीं देहेंद्रियादिक त्यांचें स्तंभन करून धरण्याचा जो प्रयत्न तो। हे काम संकल्प विचिकित्सा श्रद्धा अश्रद्धा धृति अधृति ह्रीर्धीर्भीर् हे सर्व मनाचे वृत्तिरूप धर्म मनोरूपच आहेत या अर्थाच्या श्रुतीनें सांगितले त्या सर्व धर्मांचें उपलक्षण आहे। एतत्क्षेत्रं समासेन उदाहृतं-म्हणजे हें परिदृश्यमान महाभूतादिक धृत्यंत जड क्षेत्र ज्ञानात्मक साक्षिस्वरूपानें प्रकाशावयाचे आहे या मुळे साक्षिस्वरूप जो क्षेत्रज्ञ त्याहून भिन्न अचेतन असे संक्षेपानें तुला सांगितलें। शरीरेंद्रियांचा जो संघात तोच क्षेत्रज्ञ आत्मा असे लोकायत बोलतात। क्षणिक चैतन्य ज्यास विज्ञान असें म्हणतात तो आत्मा असें सुगत बोलतात। इच्छा द्वेष प्रयत्न सुख दुःख ज्ञान हे आत्म्याचे गुण आहेत याचे योगानें आत्म्याचे प्रत्यक्ष होतें असें तार्किकादिक बोलतात। असें असून हें सर्व क्षेत्रच आहे असें कसें सांगतां अशी शंका होईल तर तिचे निराकरण करण्याकरितां सांगतात। सविकारं-म्हणजे जायते वर्धते परिणमते क्षीयते नश्यति-म्हणजे उत्पन्न होतें वाढतें बाल्य तारुण्यादिक परिणामात्मक अवस्थां प्रत पावतें क्षीण होतें अत्यंत नाश पावते असें जे निरुक्तांत यास्कानीं विकार सांगितले आहेत त्या विकारानीं युक्त हें महाभूतादि धृत्यंत पदार्थात्मक क्षेत्र आहे। तात्पर्य। हे विकार प्रत्यक्ष सिद्ध आहेत देहेंद्रियांचा संघातच आत्मा म्हटला तर आपली उत्पत्ति किंवा नाशादिक विकार आपणास प्रत्यक्ष नाहींत आणि दुसरेही आपले वरील धर्म आपल्या दर्शनां वांचून जाणले

मरण प्रवाहांत प्तनाहीन। एणे करून अमानित्वादिक ज्ञान साधन संपन्नास क्षेत्र क्षेत्रज्ञांचे विवेक ज्ञान होऊन तेणेकरून त्याचे अ
ज्ञानाचा नाश होऊन त्यास परपुरुषार्थभूत मोक्ष प्राप्ति होते असें या अध्यायांत सांगितलें असें जाणावें ॥ ३४॥ इतिश्री मद्भगवद्गीता
या. रघुनाथशास्त्रिकृत भाषाविवृतौ त्रयोदशो ध्याय समाप्त ॥ १३॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीनारायणार्पणमस्तु॥
पूर्वाध्यायी- यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावरजंगम॥ क्षेत्र क्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ- येणेकरून हे जे स्थावरजंगमात्मक
विश्व उत्पन्न होते ते क्षेत्र म्हणजे प्रकृति आणि क्षेत्रज्ञ म्हणजे पुरुष यांचे संबंधापासून उत्पन्न होते असे सांगितले। ते निरीश्वर-
वादी सांख्यमताप्रमाणे स्वतंत्र प्रकृतिपुरुषांचे संबंधापासून उत्पन्न होत असें नाही। प्रकृतिपुरुष यांचा जो संबंध होतो तो ईश्वराधी
न आहे कर्तृत्व भोक्तृत्वा विषयी प्रकृतीस किंवा पुरुषास स्वातन्त्र्य नाही ईश्वरपरतंत्रता आहे। असें सांख्यमतनिराकरण करून सां-
गण्या साठी आणि- कारणं गुणसंगोस्य सदसद्योनिजन्मसु- एणे करून जीवास सत् असत् इत्यादिक योनीचे ठायीं जे जन्म होते त्यास

॥ इतिश्री मद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रम्हवि॰ श्रीकृष्णार्जुन॰ क्षेत्र क्षेत्रज्ञ विवेको नाम त्रयोदशोध्याय समाप्तः॥ १३॥

श्रीगणेशा॰॥ परंभूय. प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमं॥ यज्ज्ञात्वा मुनय. सर्वे परां सिद्धि मितो गता ॥ १॥ श्रीकृष्णा॰॥

गुणांशी संग कारण आहे असें सांगितलें त्याविषयी गुण कोणते कोणत्या गुणांशी कसा संबंध होतो कोणता गुण जीवास कसा बंध
क होतो याचें निरूपण करण्याविषयी आणि- भूतप्रकृतिमोक्षं च ये विदु- असें जे सांगितलें तेथें भूतप्रकृति मोक्ष तो कोणता। तो क-
सा होतो ते सांख्य मतापेक्षां निराळे वेदांतिमत सिद्ध भूतप्रकृति मोक्षाचें स्वरूप सांगण्या साठी आणि मुक्ताचे लक्षण काय तें सांगण्यास
ठीं चतुर्दशाध्यायाचा आरंभ करतात॥ यांत प्रथम पुढे जो अर्थ सांगावयाचा त्याचे श्रवणा विषयी श्रोत्याची अभिरुचि उत्पन्न होण्या
साठीं त्या अर्थाची दोन श्लोकांनी स्तुति करून श्रीभगवान् बोलतात॥ ज्ञानानां उत्तमं परं ज्ञानं भूयः प्रवक्ष्यामि - म्हणजे जेणे करून
ज्ञान होतें अशीजीं बहिरंग यज्ञादिक ज्ञान साधने त्यामध्यें उत्तम जे ज्ञान साधन सर्वोत्कृष्ट आणि उत्तम फल साधन ब्रम्ह ते पूर्वा-
ध्यायीं वारंवार सांगितलें आहे तरीं पुन: सांगतो। ब्रम्हाकार अंत करण वृत्त्यात्मक ज्ञान होण्याचा विषय स्वरूपानें ब्रम्ह कारण अ-

हे यास्तव ब्रम्ह ज्ञान साधन आहे। अमानित्वादिक उत्तम ज्ञान रूप फलास साधनें अंतरंग आहेत तथापि तीं परम्हणजे सर्वोत्कृष्ट ना-
हींत त्यापेक्षां ब्रम्ह उत्कृष्ट आहे। अथवा जाणिजेतात तें ज्ञान म्हणजे सर्व ज्ञेय पदार्थ त्यामध्यें अतिशयितजें उत्तम ज्ञेय ब्रम्हवस्तु तें तु
ला पुन: सांगतों। यत्ज्ञात्वा-म्हणजे ज्या ज्ञानसाधनाचें अनुष्ठान करून किंवा जें ब्रम्हवस्तु वेदांत वाक्यापासून झालेलीं अपरोक्ष असे
ड ब्रम्हात्मा कारांत: करण वृत्ति तीणेकरून स्वात्मत्वें करून अनुभवून। सर्वे मुनय: -म्हणजे सर्व सन्यासी किंवा मनन शील। इत: सिद्धिं-
गता: -म्हणजे देहबंध रूप जो हा संसार यापासून सिद्धीप्रत पावले म्हणजे मुक्त झाले॥१॥ त्या सिद्धींचा कधींही कोणास व्यभिचार
नाहीं असें सांगतात॥ इदं ज्ञानउपाश्रित्य-म्हणजे या ज्ञानसाधनाचें उत्तम प्रकारानें अनुष्ठान करून किंवा विषय विषयी भावरूप वि
कल्प ज्यांत भासत नाहीं अशाया ज्ञानानें युक्त होऊन। मम साधर्म्यं आगता: -म्हणजे मी जो परमेश्वर त्याचे सादृश्याप्रत म्हणजे

इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्य मागता:॥ सर्गेपि नोपजायंते प्रलयेन व्यथंतिच॥२॥

ब्रम्हरूपानें सर्वात्मत्व सर्व नियंतृत्व सर्व भावाधिष्ठातृत्वादि जे धर्म त्यांहींकरून मद्रूपतेप्रत पावतात किंवा पावलेले होतात ते ज्ञानब
लें करून च काकभृशुंडी प्रभृतीपुराण सिद्धतानी। सर्गेपि नोपजायते-म्हणजे हिरण्यगर्भ प्रभृती उत्पन्न होत असताही उत्पन्न हो
त नाहींत॥ प्रलयेपि न व्यथंति-आणि ब्रम्हदेवाचे प्रलयकालीं ही नाश किंवा लयाप्रत पावत नाहींत। जो मी ब्रम्ह आहें-असें जाण
तो तो हे सर्व होतो म्हणजे सर्वात्मक होतो सर्वांचा वश कर्ता सर्वांचा ईशान सर्वांचा अधिपति होतो। तो साधुकर्मानें मोठा होत नाहीं
। असाधुकर्मानें लहान होत नाहीं असें ज्ञानफल ईश्वराचें साम्य प्राप्त होते म्हणून श्रुतींतही सांगितलें आहे। काकभृशुंडी
प्रभृती ब्रम्हदेवाचे प्रलयींही नाश पावले नाहींत असें महाभारतांत सविस्तर उपाख्यान सांगितलें आहे॥२॥ श्रीकृष्णार्पणम
स्तु॥ ॥श्रीनारायणार्पणमस्तु॥ ॥श्रीगोविंदार्पणमस्तु॥ ॥श्रीवासुदेवार्पणमस्तु॥

याप्रमाणें ज्ञानाचे प्रशंसेने श्रोत्यास सावधान करून परमेश्वराधीन जे प्रकृति आणि पुरुष त्यासच सर्वभूतोत्पत्तीचे हेतुत्व आहे स्वतंत्र
पणाजो सांख्य मानतात तो नाही असा जो विवक्षित अर्थ तो दोन श्लोकांनी सांगतात॥ मम महद्ब्रम्ह-म्हणजे सर्व कारण वास्तव सर्व का-
र्यापेक्षा मोठे आणि कार्यांची वृद्धि होणे असे जे बृंहण त्यास कारण आहे म्हणून त्यास ब्रम्ह म्हणतात असे जे त्रिगुणात्मक मा-
या स्वरूप अव्याकृत प्रकृति स्वरूप महत ब्रम्ह त्यास अव्यक्त असे ही म्हणतात ते। मम योनि - म्हणजे तमदन ब्रम्ह मीजो-
शुद्धचिन्मात्र रूप परमात्मा याचे योनी म्हणजे गर्भाधान स्थान किंवा कार्य ब्रम्ह ज्याने प्रवेश करण्याचे स्थान आहे। तस्मि-
न् अहं गर्भं दधामि-म्हणजे त्याचे ठायी मी सर्व भूतोत्पत्तीस कारण भूत जो सर्व जीव समष्टि रूप कार्य ब्रम्ह रूप हिरण्य गर्भ तद्रूप
आपल्या प्रतिबिंबाचे स्थापन करतो किंवा सर्व भूतोत्पत्तीस कारण भूत मी बहुत रूप होईन असा जो भूत्युक्त बहु भवने क्षणरू-
प संकल्प त्यास धारण करतो म्हणजे प्रथम मायेचा त्या सकल्पात्मक वृत्तिरूप परिणाम होतो त्यासच महत्तत्व म्हणतात आणि

मम योनिर्महद्ब्रम्ह तस्मिन् गर्भं दधाम्यहम्॥ संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत॥ ३॥

तदुपाधिक जो परमेश्वर त्यास हिरण्यगर्भ किंवा कार्य ब्रम्ह असे म्हणतात। जसा लोकांतील प्रसिद्ध पिता पर्जन्यादि द्वारा ब्रम्हादि
कात प्रथम लीन झाले त्या नंतर मातापितरानें भक्षण केलेले अन्न द्वारा आपले शरीरांत रेतात लीन झालेला जो पुत्राख्य जीव त्याचा शरी
राशी योग व्हावा या हेतूने योनीचे ठायी रेताचें सिंचन करून गर्भाचे स्थापन करतो। त्या गर्भाचें स्थापना नंतर शरीर उत्पन्न होई तों
पर्यंत मध्यवर्ती अवस्थेत त्या रेतास कललादिक म्हणजे रक्त मांस अस्थि मज्जा इत्यादिक अवस्था होऊन नंतर चैतन्य युक्त शरी
र उत्पन्न होते। त्याप्रमाणे अविद्या काम कर्माचे वासनानी युक्त माझे ठायीं लीन झालेला जो क्षेत्र रूप जीव त्यास पुनः त्या कर्माचे फ
लोपभोगार्थ कार्यकारणात्मक सधान शरीराने युक्त करण्या साठीं चिदाभास म्हणजे चैतन्य प्रतिबिंब तद्रूप रेताचे मायेचे ठायी से
चन करून तत्पूर्वक पूर्वोक्त माया वृत्तिरूप गर्भाचे स्थापन करतो। नंतर तें व्यक्त भोगायतन शरीर उत्पन्न होण्या साठी मध्ये आकाश वा
यु तेज जल पृथिवी यापाच महाभूतांच्या उत्पत्ति रूप अवस्था सजप सूनच होतात। ततः सर्वभूतानां संभव भवति - म्हणजे त्या गर्भे

धाना नंतर मध्यवर्ती आकाशादिकांच्या उत्पत्तिरूप अवस्था झाल्या नंतर। हे भारता अर्जुना- सर्व हिरण्यगर्भादिक भूतांचा शरीर द्वारा संभव म्हणजे उत्पत्ती होते। ईश्वरानें केलेले पूर्वोक्त गर्भाधानावांचून स्वतंत्र प्रकृति पुरुषापासून भूतांची उत्पत्ती होत नाहीं असें सांख्य मताचें निराकरण करण्या विषयीं तात्पर्य आहे॥३॥ देवादिकांचे जे अयोनिज देह प्रसिद्ध आहेत त्यांस दुसरीं कारणें आहेत- मग सर्व भूतांची उत्पत्ती परमेश्वराचे पूर्वोक्त गर्भाधाना पासूनच होते असें कसें सांगतां अशी शंका होईल तर त्याविषयी सांगतात। हे कौंतेय- हे कुंतीपुत्रा अर्जुना। सर्वयोनिषु याः मूर्तयः संभवंति- म्हणजे सर्व देव पितर मनुष्य पशु पक्षी वृक्ष इत्यादिक योनीच्या ठायीं जरायुज अंडज स्वेदज उद्भिज्जादिक भेदें करून जा अनेक प्रकारच्या मूर्ती म्हणजे शरीरें उत्पन्न होतात। तासां महत् ब्रम्ह योनिः- म्हणजे त्या सर्व शरीरांस कारणभूत पूर्वोक्त महत् ब्रम्ह स्वरूप माया तीच योनी म्हणजे मातृस्थानी आहे आणि- अहं बीजप्रदः पिता- म्हणजे मी परमेश्वर गर्भाचें स्थापन करणारा पित्याचे स्थानी आहे। अयोनिज देवादिकांचे जे देह उत्पन्न झाले ते हि-

सर्वयोनिषु कौंतेय मूर्तयः संभवंति याः॥ तासां ब्रम्ह महद्योनिरहं बीजप्रदः पिता॥ ४॥

सत्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः॥ निबध्नंति महाबाहो देहे देहिनमव्ययं॥ ५॥

रण्यगर्भाचे संकल्पा पासून मानस उत्पन्न झाले त्यांस अयोनिज असें पुराणादिकांत म्हटले आहे ते जरायुजादिकां प्रमाणें प्रसिद्ध योनि संभव नसले तरी परमेश्वर शक्ति रूप माया रूप योनीचे परिणामात्मक संकल्पा पासूनच झाले आहेत यामुळें त्यांचाही संभव पूर्वोक्त मायेचे ठायी जे परमेश्वरानी केलेले गर्भाधान त्यापासूनच आहे यामुळें। संभवः सर्वभूतानां ततो भवति- असें जे सांगितले ते विरुद्ध नाहीं॥ ४॥ या प्रमाणें ईश्वराचे आश्रयामुळें प्रकृति सर्व भूतांची सृष्टी करते असें सांगितल्यानें क्षेत्र क्षेत्रज्ञ संयोग ही ईश्वराधीनच आहे असे सिद्ध झाले। यावरून निरीश्वर सांख्य मताचे निराकरण झालें। आतां ती प्रकृति आपले गुणाचे द्वारा पुरुषास बंधक रते हे सांगण्या साठी कोणते गुण आहेत कसा संबंध जीवास होतो आणि त्या संगानें कोणता गुण जीवास कसा बंध करतो ते सांगतात॥ सत्वरजस्तम इति गुणाः- म्हणजे सत्वरजतम यांनावाचे गुण ते। प्रकृतिसंभवाः- म्हण

जे त्रिगुणात्मक जी माया शक्तिरूप प्रकृति तीपासून उत्पन्न होणारे आहेत। तार्किक जसे रूपरसादिक गुणांस द्रव्याश्रितत्व-
मानून गुणाश्रय जे द्रव्य आणि द्रव्याश्रित जे गुण यांचा परस्पर अत्यंत भेद मानतात तसे एथें विवक्षित नाहीं। प्रकृति आणि गुण-
यांचे ऐक्यच आहे म्हणजे प्रकृति त्रिगुणात्मकच असतां जेव्हां ती न्हीही गुणांची समान अवस्था असते तेव्हां त्या साम्याव
स्था युक्त तीन गुणांसच प्रकृति म्हणतात तेच गुण एक प्रधान एक अंग अशा सुखदुःख मोह किंवा त्यांची साधने अशा विष
मस्वभावाने परिणाम पाऊन साम्यावस्थेपासून विषमावस्थेने निरनिराळे सृष्टि समयीं झाले म्हणजे त्यास प्रकृतीपासून उत्प
न्न झालेले प्रकृतिसंभव असे म्हणतात। ते प्रकृति संभव तीन गुण हे महाबाहो अर्जुना। देहे अव्ययं देहिनं निबध्नंति-म्हणजे प्र
कृति कार्यभूत देहेंद्रिय मनोबुद्धीचा जो संघात तत्त्वरूप भोगायतन जे शरीर त्याचे ठायीं परमार्थतः सर्व विकार शून्य अव्यय-
असतां ही अज्ञानाने देहादिकावर हें मीच किंवा हें माझे अशा अभिमानाने युक्त होऊन मी कर्ता भोक्ता संसारी सुखी दुःखी आहे अ

तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयं॥ सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ॥ ६॥

से मानणारा जो जीव त्याप्रत रज्जूनजसे वत्साप्रत स्तंभाचे ठायीं बांधतात त्याप्रमाणे बंधन करतात-म्हणजे जलपात्रे आपले ठा
यी स्थित जलाचे चांचल्यादि विकाराप्रत आकाशस्थ अचल सूर्याचे ठायीं जशी भ्रांतीने भासवितात त्याप्रमाणें जीवस्वरूप निर्वि
कार असतां ही त्याचे ठायीं आपले वरील जे कर्तृत्व भोक्तृत्व सुखदुःख मोहात्मक विकार त्याप्रत भासवितात। परमार्थतः जीवस्व
रूपास बंधनाहींच असें-शरीरस्थोपि कौंतेय न करोति न लिप्यते-एणें करून पूर्वी सांगितलेंच आहे॥ ५॥ त्या बंधकरणाऱ्यात
न गुणांचीं लक्षणे सांगून त्यांत कोणता गुण कोणते संगाने बंधन करतो तें सांगतात॥ निर्मलत्वात् प्रकाशक-म्हणजे स्वच्छ त्यास
व-म्हणजे चैतन्य प्रतिबिंब ग्रहणकरण्याचे योग्य ते स्तव तमो गुणाने केलेलें जें स्वरूप चैतन्याचे आवरण त्याचे नाशक होऊन
चैतन्य स्वरूपाचें किंवा सर्वार्थाचे प्रकाशक म्हणजे अभिव्यंजक। सत्त्व-म्हणजे सत्त्वगुण आहे। आणि तो अनामय म्हणजे र
जोगुणाचे कार्य जें दुःख त्याचे थिरो धिकर व स्वरूपाचें ही अभिव्यंजक आहे। हे अनघ-सुखसंगेन ज्ञानसंगेन च देहिनं बध्ना

नि-म्हणजे हे निःपापा अर्जुना तो सत्त्वगुण अविद्येनें ज्याचें असंगा द्वितीयसच्चिदानंदात्मक स्वरूप तिरोहित झालें आहे असा देही जो जीव त्याप्रत सुख संगें करून आणि ज्ञान संगें करून देहाचे ठायीं बंधन करतो म्हणजे अंतःकरणवृत्ति स्वरूप जें ज्ञान-आणि सुखाचा अभिव्यंजक जो अंतःकरण धर्म त्यांचा जीवस्वरूपावर आरोप करून मी सुखी मी ज्ञानी अशा अध्यासानें युक्त करतो ॥ ६॥ आतां रजोगुणाचें लक्षण सांगून तो जीवास बंध कसा करतो तो प्रकार सांगतात ॥ रजः रागात्मकं विद्धि-म्हणजे विषयांचे ठायीं पुरुष अनुरक्त जेणें करून होतात असा जो कामादिकांचा रंजनात्मक वर्ग तत्स्वरूप जो रजोगुण तो। तृष्णा-संग समुद्भवं-म्हणजे जें प्राप्त न झालें त्या विषयींचा जो अभिलाष किंवा प्राप्त होत असतां ही तृप्ति न होणें यास तृष्णा म्हणतात। प्राप्त झालेले अर्थाचा नाश झाला तरी त्याजवरची प्रीति किंवा त्याचा वियोग न व्हावा अशी इच्छा त्यास संग म्हणतात। त्या तृष्णा आणि संग यांची उत्पत्ती ज्यापासून होते असा म्हणजे तृष्णासंगास उत्पन्न करणारा आहे असें जाण। तो रजोगुण हे कौंतेया

रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवं ॥ तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनं ॥ ७ ॥

तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनां ॥ प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८ ॥

अर्जुना देही जो जीव त्याप्रत। कर्मसंगेन बध्नाति-म्हणजे रजोगुण प्रवृत्तीला कारण आहे या स्तव परमार्थत जीवस्वरूप कर्तृत्व भोक्तृत्व धर्म रहित असतां ही जीव स्वरूपावर त्याचा आरोप करून दृष्ट किंवा अदृष्ट जे कृषिवाणिज्य यज्ञादिक कर्माचें फल भूत ऐहिक सुख आणि स्वर्गादिक अर्थ त्यां विषयी चा जो मी हें करतो किंवा करीन याचें फल मी भोगतों किंवा भोगीन असा अभिमान त्याणे युक्त करतो ॥ ७॥ आतां तमोगुणाचें लक्षण आणि तो बंधन कसें करतो तो प्रकार सांगतात ॥ तमस्तु अज्ञानजं सर्वदेहिनां मोहनं विद्धि-म्हणजे रज आणि सत्त्व या गुणाहून विलक्षण जो तमोगुण। तो आवरणशक्ति स्वरूप जें अज्ञान त्यापासून उत्पन्न झालेला आणि तो अविवेक रूप आहे यामुळें सर्व प्राण्यास भ्रांतीला उत्पन्न करणारा आहे ॥ तत्-प्रमादालस्यनिद्राभिः देहिनं निबध्नाति-म्हणजे हे भरत कुलोत्पन्ना अर्जुना तो तमोगुण देही जो जीव त्याप्रत प्रमाद आलस्य आणि निद्रा यांहीं

करून देहाचे ठायीं बंधन करतो। सत्वगुणाचें कार्य जो अर्थ प्रकाश त्यासविरोधी जें मनाचें अनवधान किंवा विवेकाविषयीं जें असामर्थ्य त्यास प्रमाद म्हणतात। रजोगुणाचें कार्य जी कर्माविषयीं प्रवृत्ति तीस विरोधि जें प्रवृत्तीविषयीं जें असामर्थ्य त्यास आलस्य म्हणतात। पूर्वोक्त जे सत्वगुणाचें कार्य आणि रजोगुणाचें कार्य या दोघास विरोधी जी तमोगुणाला अवलंब करणारी वृत्ति तीस निद्रा म्हणतात। हीं प्रमादालस्य निद्राचीं स्वरूपें जाणावीं ॥ ८॥ या तीन गुणामध्यें कोणतें कार्याचे ठायीं कोणाचा उत्कर्ष आहे तें सांगतात॥ हे भारता। सत्व स्फरवे संजयति-हे भरतकुळोत्पन्ना अर्जुना। उत्कर्षाप्रत पावलेला म्हणजे सर्वांहून वृद्धीप्रत पावलेला जो सत्वगुण तो दुःख कारणाचा पराभव करून जीवाप्रत स्फरवाचे सवधानें युक्त करतो। रजः कर्मणि संजयति-उत्कर्ष पावलेला रजोगुण स्फरव कारणाचा पराभव करून जीवाप्रत दृष्टादृष्टार्थक पूर्वोक्त कर्मा विषयींचे प्रवृत्तीनें युक्त करतो। तमः-उत्कर्ष पावलेला तमोगुण-ज्ञान आवृत्य-म्हणजे इंद्रियादिक प्रमाणांनीं उत्पन्न झालेलें हि सर्व कार्य विषयक

सत्वं स्फरवे संजयति रजः कर्मणि भारत॥ ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ॥ ९॥

रजस्तमश्चाभिभूय सत्वं भवति भारत॥ रजः सत्वं तमश्चैव तमः सत्वं रजस्तथा ॥ १०॥

ज्ञानाचें आच्छादन करून जीवाप्रत प्राप्त झालेलें किंवा जाणलेले जे पदार्थ त्यांविषयींचें अज्ञानानें किंवा अवश्य जें करावयाचें तें न करणें अशा अनवधानानें युक्त करतो। उत म्हणजे आणखी। पूर्वी ज्यांची स्वरूपें सांगितली आहेत अशा आलस्य आणि निद्रा यांहीं करून युक्त करतो ॥ ९॥ पूर्वोक्त आपआपलें कार्य करण्या विषयीं केव्हां मत्वादिक गुण समर्थ होतात तें सांगतात ॥ हे भारत रजः तमश्च अभिभूय-म्हणजे हे भरतकुळोत्पन्ना अर्जुना रज आणि तम या दोहों गुणांचा पराभव करून जेव्हां सत्वगुण वृद्धीप्रत पावतो तेव्हां पूर्वोक्त आपलें कार्य करण्यास समर्थ होतो। याच प्रमाणें-रजः सत्वं तमश्च अभिभूय-भवति-म्हणजे रजोगुण सत्व आणि तम या दोहों गुणांचा पराभव करून वृद्धीप्रत जेव्हां पावतो तेव्हां पूर्वोक्त आपलें कार्य करण्यास समर्थ होतो। याप्रमाणेंच तमः सत्व रजश्चाभिभूय भवति-म्हणजे तमोगुण सत्व आणि रज या दोन गुणांचा परा

भव करून जेव्हां वृद्धीप्रत पावतो तेव्हां पूर्वोक्त आपलें कार्य करण्यास समर्थ होतो ॥ १०॥ आतां त्यात्या गुणाची वृद्धि शरीरांत झाली हे समजण्याविषयीं त्यांचीं लिंगे सांगतात॥ अस्मिन् देहे - म्हणजे सुखदुःखानुभवात्मक भोग होण्याचें स्थानजें शरीर याचेठायीं सर्वद्वारेषु - म्हणजे शब्दादिक विषयास ग्रहण करणाऱ्या विषयज्ञान होण्यास साधन जीं श्रोत्रादिक बाह्येंद्रियरूपकारणें त्यांचेठायीं। यदाज्ञानं प्रकाशः - म्हणजे जेव्हां आपआपले विषयाविषयींचें जें आवरण त्याचानाश करणारा त्यात्या इंद्रियांचें द्वारा त्यात्या विषयाकार वृत्तिरूप जो बुद्धीचापरिणाम तेंचजे शब्दादिविषयक ज्ञान किंवा त्यावृत्तीचेठायीं अभिव्यक्त झालेलें जें त्यात्या विषयाचें अधिष्ठान भूत चैतन्य तद्रूप जो विषयप्रकाश तद्रूप शब्दादि विषयाचें ज्ञान उत्पन्न होतें त्या ज्ञानरूप प्रकाशात्मक लिंगानें उत - म्हणजे आणि जेव्हां सुख होते त्यालिंगानें। सत्व विवृद्ध इति विद्यात् - म्हणजे श्रोत्रादिक सर्व इंद्रियें जेव्हां आपआपल्या शब्दादिक विषयांचें ग्रहण करतात तेव्हां शरीरांत सत्वगुण वृद्धीप्रत पावला असें जाणावें ॥ ११॥

सर्वद्वारेषु देहेऽस्मिन् प्रकाश उपजायते॥ ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्वमित्युत॥ ११॥
लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा॥ रजस्येतानि जायंते विवृद्धे भरतर्षभ॥ १२॥

लोभः - पुष्कळ द्रव्यादिकाचा लाभ झाला तरीं प्रतिक्षणी याहून अधिक मिळावें असी जी विषयप्राप्तीनें निवृत्त न होणारी इच्छा तद्रूप अभिलाष। प्रवृत्तिः - निरंतर प्रयत्न करण्याच्या स्वभाव किंवा नित्य अग्निहोत्रादिक कर्मांविषयीं प्रवृत्ति। आरंभः - ज्यांत पुष्कळ द्रव्य व्यय होतो आणि आयासही फार होतो अशीं जीं काम्य निषिद्ध वैदिक कर्में तशींच लौकिक मोठें घर बांधावें मोठें कृषिवाणिज्य करावें इत्यादिक व्यापाराविषयींचा उद्योग तो। कर्मणांअशमः - हे करून हें करीन तें झाल्यावर दुसरें तिसरें करीन असा संकल्पाचाउपरम न होणें। स्पृहा - लहानमोठे दुसऱ्याचे द्रव्य पशु स्त्री आदिक पदार्थ पाहिले असतां ते पदार्थ कोणतेही साधनानें मी आपलेसे करीन अशी त्यापदार्थाची घेण्याची इच्छा। एतानि - ही कार्ये। हे कुरुनंदन रजसि विवृद्धे जायंते - हे अर्जुना रजोगुण वृद्धीप्रत पावला असतां उत्पन्न होतात। या कार्यरूप लिंगानीं रजोगुण वृद्धीप्रत पावला असें जाणावें ॥१२॥

अप्रकाश: -- या धडाण्या साठी गुरुआदिक उपदेश करीत असतां ही बोध होण्याची अयोग्यता किंवा बोध न होणे। अप्रवृत्ति-श्च -आणि कोणतेही कर्मा विषयीं प्रवृत्ति होण्यास निमित्त असतां ही प्रवृत्ति न होणे। प्रमाद: -ज्याकाळी जें अवश्य करावयाचें त्या काळी त्याचे करण्याचे अनुसंधान नसणें। मोह म्हणजे विपरीत ज्ञान। चशब्दानें पूर्वोक्त आलस्य। हे कुरुनंदन तमस्येव प्रवृद्धे एतानि जायते - हे कुरुनंदना अर्जुना ही कार्यें तमोगुणाची वृद्धी झाली असतांच उत्पन्न होतात। या कार्यस्वरूप लिंगांनीं तमोगुण शरीरांत वृद्धीप्रत पावला असे जाणावे॥१३॥ आतां मरणकाळीं सत्वादि गुण वृद्धीप्रत पावले असतां त्यांचे फळ भेद सांगतात॥ सत्वे प्रवृद्धे यद्देहभृत् प्रलयं याति - म्हणजे सत्वगुणाची वृद्धी झाली असतां जेव्हां देहधारी जीव मरण पावतो। तदा उत्तमविदां अमलान् प्रतिपद्यते - म्हणजे तेव्हां उत्तम जे हिरण्यगर्भादिक त्यांचे जे उपासक त्यास प्राप्त होणार जे रज आणि

अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च॥ तमस्येतानि जायंते विवृद्धे कुरुनंदन॥१३॥

यदा सत्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत्॥ तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते॥१४॥

रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते॥ तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते॥१५॥

कर्मणः सुकृतस्याहुः सात्विकं निर्मलं फलं॥ रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलं॥१६॥

तमोरूप मलरहित लोक म्हणजे देवांच्या सुखभोगाच्या स्थानें त्याप्रत पावतो॥१४॥ रजसि प्रलयं गत्वा - म्हणजे रजोगुण वृद्धीप्रत पावून जेव्हां मरण पावतो तेव्हां। कर्मसंगिषु जायते - म्हणजे श्रौत स्मार्त कर्मानुष्ठान करणारे जे मनुष्य त्यांचे योनींत जन्म पावतो। तथा तमसि प्रलीन: - म्हणजे तसाच तमोगुण वृद्धीप्रत पावून मरण पावलेला॥ मूढयोनिषु जायते - म्हणजे पशुपक्षी इत्यादिक ज्या मूढ योनी त्यांचे ठायीं जन्म पावतो॥१५॥ आतां सत्वादिक गुणांस त्याचे त्याचे उचित कर्मांचे द्वारा विचित्र फलाचें कारणत्व सांगतात॥ सुकृतस्य कर्मण: सात्विकं निर्मलं फलं आहु: - म्हणजे सत्वगुणापासून उत्पन्न झालेले जे सात्विक शुद्ध पुण्यात्मक कर्म त्याचे दुःखाज्ञानरूप मलरहित ज्ञानवैराग्य सुखादिक सत्वगुणापासून होणारे फल होतें असे महर्षी बोलतात॥

रजसस्तु फलं दुःखं – म्हणजे रजोगुणापासून उत्पन्न होणारें जें राजस पापमिश्रित पुण्यस्वरूप कर्म ज्यांत दुःख फार आ-
णि सुख अल्प असें मिश्रितफल होतें । तमसः अज्ञानं फलं – म्हणजे तमोगुणापासून उत्पन्न होणारें जें तामस धर्मस्वरूप
कर्म त्याचें अविवेक ज्यामध्ये वाढून आहे असें दुःखस्वरूप फल होतें ॥ सात्विक–राजस आणि तामस या कर्मांचीं लक्षणें
– नियतं संगरहितं – इत्यादिकें करून अष्टादशाध्यायांत सांगतील ॥ १६ ॥ हें पूर्वोक्त फल वैचित्र्य होण्यास पूर्वीं सांगीत-
लेल्याच हेतु सांगतात ॥ सत्वात् ज्ञानं संजायते – म्हणजे सर्व इंद्रिय द्वारा विषयाकार बुद्धीचा वृत्तिरूप परिणाम जो होतो तद्रूपी
वा तीचे ठायीं अभिव्यक्त झालेले जे विषयाधिष्ठान चैतन्य तद्रूपविषयप्रकाशरूप ज्ञान सत्वगुणापासून उत्पन्न होतें यास्तव तद-
नुरूप सात्विक कर्माचें ज्यांत प्रकाश फार आहे असें सुखरूप फल होतें ॥ रजसः लोभ एवच – म्हणजे रजोगुणापासून को-

सत्वात् संजायते ज्ञानं रजसो लोभ एवच ॥ प्रमादमोहौ तमसो भवतो ज्ञानमेवच ॥ १७ ॥
ऊर्ध्वं गच्छंति सत्वस्था मध्ये तिष्ठंति राजसाः ॥ जघन्यगुणवृत्तस्था अधो गच्छंति तामसाः ॥ १८ ॥

ण्यावधी विषयांची प्राप्ति झाली तरी त्याची निवृत्ति होणें अशक्य असा अभिलाष उत्पन्न होतो । तो निरंतर वृद्धी पावणारा-
च आहे त्याची पूर्तता कधींही होत नाहीं यास्तव तो दुःखालाच हेतु आहे म्हणून तत्पूर्वक केलें राजस कर्माचें दुःखरूप-
च फल आहे ॥ तमसः प्रमादमोहौ भवतः अज्ञानं चभवति – म्हणजे तमोगुणापासून पूर्वोक्त प्रमाद आणि मोह उत्पन्न होतात-
आणि अज्ञानही उत्पन्न होतें । एवकारें करून प्रकाश किंवा प्रवृत्ति तमोगुणापासून होत नाहीं असें सांगितलें । यास्तव ता-
मस कर्माचें तामस अज्ञान मोह प्रमाद रूपच फल होतें ॥ १७ ॥ आतां सत्वादिक गुणवृत्तस्थ म्हणजे सत्वादिक गुणाचा जो-
स्वभाव त्याचे ठायीं स्थित जे सात्विक राजस तामस त्यास पूर्वोक्त फलवउर्ध्व मध्य अधोलोक गमन रूप सांगतात ॥ सत्वस्था-
ऊर्ध्वं गच्छंति – जघन्यगुणवृत्तस्था – एथें तमोगुण वृत्तशब्दाचा प्रयोग केला आहे यास्तव पहिले दोन ठिकाणीं सत्वस्थ या-
शब्दाचा सत्वगुणवृत्तस्थ राजस याशब्दाचा रजोगुणवृत्तस्थ असा अर्थ करावा । सत्वगुणाचें जें वृत्त म्हणजे शास्त्रीय ज्ञान किं-

चा शास्त्र विहित कर्म करणे त्याचे ठायीं जे रत किंवा तत्पर होऊन त्याचें अनुष्ठान करणारे ते ऊर्ध्वं म्हणजे सत्यलोक पर्यंत जे देव लोक त्याप्रत ज्ञान उपासना कर्म स्वरूपाचे तारतम्या प्रमाणे मरणोत्तर जातात किंवा देवादिक योनीत उत्पन्न होतात। राजसाः मध्ये तिष्ठंति-रजो गुणाचे जें वृत्त म्हणजे लोभादि पूर्वक राजस कर्मा विषयी प्रवृत्तीतीचे ठायी राहणारे तत्पर ते मध्य म्हणजे पुण्यपाप फल मिश्र जो मनुष्य लोक त्याचे ठायी राहतात किंवा उत्पन्न होतात। जघन्य गुण वृत्तस्थाः तामसाः अधः गच्छंति-जघन्य म्हणजे सत्व आणि रज यागुणाहून पलीकडील निकृष्ट जो तमो गुण त्याचे जें निद्रालस्य प्रमाद रूप वृत्त त्याचे ठायी राहणारे तामस म्हणजे तमः प्रधान मनुष्य अधः म्हणजे पशु पक्षी यांच्या ज्या मूढयोनी त्यांचे ठायी जातात म्हणजे उत्पन्न होतात ॥ १८॥ पुरुषास सदसद्योनीचे ठायी जन्म होणे आणि तेथें सुखदुःखानुभव करणे असा जो संसार त्यास स्वतंत्र प्रकृति पुरुषाचा संग कारण आहे असे निरीश्वर सांख्य मताचे निराकरण करण्या साठी तो प्रकृतिपुरुष संग ईश्वराधीन आहे असे नि-

नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ॥ गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोधिगच्छति ॥ १९॥

रूपण केलें आणि त्रिगुणात्मक प्रकृति संभव गुणाचा संबंध कोणता कसा तो होतो आणि त्यागुणा मध्यें कोणता गुण कसे जीवास बंधन करतो त्याचे सविस्तर निरूपण केलें ॥ आता क्षेत्र क्षेत्रज्ञाचें अंतर जे ज्ञानचक्षूनें जाणतात आणि भूतप्रकृतिमोक्षाप्रत जे जाणतात ते मोक्षाप्रत जातात असें जे सांगितलें ते पुरुष प्रकृतीहून भिन्न असंग चैतन्य रूप आहे असे ज्ञानानें पुरुष संसार बंधापासून मुक्त होतो असें जें सांख्यमत आहे त्याप्रमाणे सांगितले नाहीं तर अनादि अनिर्वचनीय मिथ्यास्वरूप जी अविद्या तत्कृत असंग-सच्चिदानंदाद्वय-अकर्ते-अभोक्तृ-स्वस्वरूपाचे आवरणामुळें आत्मस्वरूपाचे ठायी अविद्या कल्पित मिथ्या भूत भासमान जो विषयादिक भूतभौतिक देहेंद्रिय मनो बुद्धि आदिक जड सुखदुःख मोह किंवा तत्साधनात्मक सर्व दृश्य द्वैत प्रपंच त्याचे ठायीं झालेला जो तादात्म्याभिमान तन्मूलक जो मी सुखी दुःखी कर्ता भोक्ता संसारी असा अभिमानात्मक बंध त्याची मूलभूत अज्ञान त्याची निवृत्ति अद्वितीया संग सच्चिदानंदात्मक ब्रम्हस्वरूपच मी आहें असा ब्रम्हात्मैक्या परोक्षज्ञा

नापासून च होऊन जीवास स्वस्वरूप ब्रम्हरूपानें स्थितिरूप मोक्ष होतो अशा वेदांत सिद्धांताचे अभिप्राया प्रमाणे सांगितलें
। सांख्य प्रकृती हून भिन्न पुरुष असंग चिद्रूप आहे अशा ज्ञानास संसार बंधनिवृत्ति रूप मोक्षाचें जें कारणत्व मानतात तें त्यां
चे च मतानें संभवत नाहीं। सांख्य प्रकृति स्वतंत्र मानतात तिला नियंता कोणी नाही ती व्यापक आणि सत्य एकच आहे। पुरुष-
असंग चिद्रूप प्रतिशरीरी भिन्न भिन्न आहे। प्रकृतीचीं जीं कार्यें भूतें आणि भौतिक देहेंद्रियादिक ती सत्यच आहेत असें मान
तात। त्यांचे मतीं प्रकृती स्वतंत्र आहे आणि तिचे कार्यें देहेंद्रियादिक सत्यच आहे तर तिणे स्वतंत्रपणाने जो देहेंद्रिय मनोबुद्धी
शी पुरुषाचा संग केला तो ती प्रकृति आणि देहेंद्रियादिक निरंतर सत्यच असतां त्याची निवृत्ति होऊन पुरुषास असंगत्व ज्ञान-
संभवणारच नाही किंवा देहेंद्रियादिक नष्ट झाली तरी पुनः त्यांचे कारण प्रकृती आहे यामुळें तीं पुनः दुसरी जशींउत्पन्न होतात
त्याप्रमाणे उत्पन्न होतील त्यामुळे एकवार प्रकृतीशीं भिन्न आपले स्वरूप असंग आहे असे ज्ञान होऊन पुरुष मुक्त झाला तरी
स्वतंत्र प्रकृति आहेच आणि तिची कार्यें देहेंद्रियादिक सत्यच आहेत त्यामुळें ती पुनः आपले स्वतंत्रपणाने पुरुषास संग उत्प
न्न करील च तेव्हा पुन मुक्तास ही संसार होईल तसे झाले तर मुक्त झाल्यावर पुनः जीवास संसार नाही असे जें सर्व श्रुति-
स्मृतींत सांगितलें आहे त्याशीं विरोध येईल॥ पुरुषास जो बंध होतो तो प्रकृति आणि पुरुष यांचे अविवेकात्मक कारणाने
होतो तो अविवेक प्रकृति पुरुषाचे विवेक ज्ञानाने नष्ट झाला म्हणजे कारणच नाही यामुळें पुरुषास बंधरूप संसार पुनः हो
त नाही असे जर सांख्य म्हणतील तर त्यांस पुसावें की अविवेक प्रकृती पुरुषा प्रमाणे अनादिच आहे किंवा स्वतंत्र प्रकृ
तीने जीवाचे बंधार्थ उत्पन्न केला आहे। पहिल्या अनादित्व पक्षी प्रकृतीस पुरुषाला बंध करण्याविषयीं चे स्वातन्त्र्य नाहीं ते
व्हां अपसिद्धांत त्यास मानावा लागेल। दुसऱ्या पक्षी विवेकानें एकवार अविवेक नष्ट झाला तरी प्रकृति स्वतंत्र आहे ती पुनः
अविवेक उत्पन्न करील यामुळें मुक्तास पुनः बंध होईल आणि अविवेक जो बंधास कारण म्हणतां तो विवेकाभाव किंवा वि
वेकभिन्न किंवा विवेक विरोधी यांतून कोणते स्वरूपाचा आहे। केवल अभावाला चेतन पदार्थाचे सहायाशिवाय भाव-

कार्याचे कारणत्व संभवत नाही आणि दृष्टही नाही यामुळे पर्दहन्यायस संभवत नाही। दुसरा पक्ष मानला तर विवेकभिन्न घटपट
दिक पदार्थ प्रवाहाने सर्वदा आहेत त्यापासून हीपुरुषास बंध होईल यामुळें कधीही मोक्ष होणार नाहीं। तिसरेपक्षीं विवेकविरो
धी अज्ञानतें बंधाला कारण असे झालें। तें कारण मानले तर अज्ञानामुळे आलेला जो बंध तो मिथ्याच आहे तेव्हां वेदांतिसमत
मायावादच सांख्यानी मानिला असें झालें यामुळे स्वपक्षाची हानि झाली आणि एक बद्ध एक मुक्त अशी व्यवस्था सिद्ध होण्या
साठीं सांख्यांनी प्रतिशरीरीं जीवस्वरूप निरनिराळे मानून जीवाचें नानात्व मानिले तेही निरर्थक होईल। असंग आत्मस्वरू
प सर्वदा मुक्त असतां ही त्यास बंधमोक्ष अज्ञानाने जसे मानिले तसें आत्मस्वरूप एक नित्यमुक्त असतां ही अज्ञानानें कोणी
बद्ध कोणी मुक्त इत्यादिक जीवाचा भेद ही अज्ञानानेच भासविला आहे तो मिथ्याच आहे अशारीतीनें तीही व्यवस्था वेदां
ती याणी केलीच आहे आणि ती व्यवस्था जीवास निरोध म्हणजे नाश नाही उत्पत्ति म्हणजे देहसंबंध नाही जीव बद्ध नाहीं
साधक नाही मुक्त नाही हा परमार्थ सत्य अर्थ आहे अशा अर्थाच्या जीवास वास्तव जन्म नाश बंध मोक्ष नाहींत असें सांगणाऱ्या
श्रुतीस संमत आहे न असें सांख्यमत निराकरण करण्यासाठीं स्वाभिमत वेदांतप्रतिसिद्ध मिथ्या अज्ञानकृत बंधनिवृत्तीचें साध
न भूत जे अज्ञान निवर्तक ब्रम्हात्मस्वरूप ज्ञान त्याचें स्वरूप आणि त्या ज्ञानानें होणारी जी अविद्या आणि तत्कार्य सर्व देहेंद्रियादि
क भूत भौतिक - दृश्य प्रपंच मिथ्या आहे यास अधिष्ठानभूत आत्मसत्तेशिवाय सत्तास्वरूप नाही अशी जी सर्व अविद्या तत्कार्य
भूत बंधाविषयींनि स्वरूप तेची प्रतीति तद्रूप जो पूर्वोक्त भूत प्रकृति मोक्ष त्याचें स्वरूप सांगतात आणि मुक्ताचें ही लक्षण सां
गतात॥ यदा द्रष्टा गुणेभ्य. अन्यकर्तारं नानुपश्यति - म्हणजे जेव्हां द्रष्टा जीव विचार कुशल होत्सातां देहेंद्रिय मन बुद्धिवि
षय रूप जें कार्य कारण विषय तदाकारानें परिणाम पावलेले जे गुण त्याहून अन्य कर्त्याप्रत विचारानंतर पाहत नाही तर गुण
च श्रोत्रादिक बाह्य ज्ञान करणे मन बुद्धि आदिक आंतर विषयक ज्ञान करणें आणि शरीर विषय स्वरूप झालेले सर्व कार्याचे
कर्ते आहेत असें विचारानंतर पाहतो। गुणेभ्यश्च परं वेत्ति - म्हणजे आणि त्याच्या शरीरेंद्रिय मन बुध्यादिकाच्या स्वरूपानें

परिणामपावलेले जे गुण त्यांहून पात्रस्थजल किंवा त्यांचे चांचल्यादिक कर्मांने असंस्पृष्ट पात्रस्थजलाचा प्रकाशक जसा सूर्य त्याप्रमाणें गुण किंवा त्याचीं जीं कर्तृत्व भोक्तृत्व सुखदुःखादिक कार्यें त्यांहीं करून असंस्पृष्ट आणि त्यांचा भासक निर्विकार-सर्वसाक्षी सर्व क्षेत्राचे ठायीं एक आणि समान अशा क्षेत्रज्ञाप्रत ब्रम्हत्वें करून जो जाणतो। मः मद्भावं अधिगच्छति-म्हणजे तो द्रष्टा मत्स्वरूपतेप्रत पावतो-म्हणजे ब्रम्हस्वरूपच होतो ॥१९॥ कसा मद्रूपतेप्रत पावतो ते सांगतात॥ देही देहसमुद्भवान् एतान् त्रीन् गुणान् अतीत्य-म्हणजे देहाभिमानी जीव देहादिकाची जी उत्पत्ति आहे ज्यांपासून असे हे मायामय तीन सत्वरजतमोगुण यांप्रत ब्रम्हात्मतत्वज्ञानी हे मिथ्या निःस्वरूप आहेत असें जीवंत असतांच जाणून। जन्ममृत्युजरा दुःखैः विमुक्तः-म्हणजे मिथ्याभूत जी जन्म आणि मृत्यु आणि जरा आणि आधिभौतिक आध्यात्मिक आदिदैविक दुःखे यांहीं करून जीवंत असतांच त्यावर निस्वरूपतात्मक मिथ्यात्व ज्ञानेकरून पारमार्थिक संबंधशून्य होत्साता तो ज्ञानी। अमृतं अश्नुते

गुणानेतानतीत्य त्रीन् देही देहसमुद्भवान्॥ जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोमृतमश्नुते॥२०॥

कैर्लिंगैस्त्रीन् गुणानेतानतीतो भवति प्रभो॥ किमाचारः कथंचैतान् त्रीन्गुणानतिवर्तते॥२१॥

म्हणजे जन्ममरणशून्य मत्स्वरूप मोक्षाप्रत स्वात्मत्वें करून अनुभवितो॥ २०॥ गुणातीत जीवंत असतांच मोक्ष पावतो असें ऐकून गुणातीताचें लक्षण आणि आचरण आणि गुणातीत होण्याचें साधन समजावें या इच्छेनें अर्जुन प्रश्न करतो॥ हे प्रभो एतान् त्रीन् गुणान् अतीतः यः-म्हणजे हे कृष्णा गुणाचा अतिक्रम करून राहिलेला जो गुणातीत तो। कैर्लिंगैः युक्तो भवति-म्हणजे कोणते लिंगानीं युक्त होतो म्हणजे कोणते लिंगानीं तो गुणातीत असें जाणावयास योग्य होतो तें मला सांग। असा एक प्रश्न। प्रभो या संबोधनानें भक्ताचे मनोरथ प्रभूनेच पुरविले पाहिजेत असें सूचविलें। किमाचारः-म्हणजे त्या गुणातीताचा आचार कासा काय यथेष्टाचार किंवा शास्त्रनियमित आचार हा दुसरा प्रश्न। च एतान् त्रीन् गुणान् कथं अतिवर्तते-म्हणजे आणि या तीन गुणांपासून अतीत कसा होतो। हा गुणातीत होण्याचें साधन काय असा तिसरा प्रश्न॥

हे स्थित प्रज्ञाचें लक्षणादिकाविषयी चे प्रश्न द्वितीया ध्यायांत-स्थितप्रज्ञस्य का भाषा-इत्यादिक अर्जुनानें केल्यावरून-प्रज

हाति यदा कामान्-इत्यादिकें करून त्यांची उत्तरें त्याच अध्यायांत भगवंतानीं सांगितली च आहेत तथापि पूर्वीपेक्षां कांहीं अ

धिक विशेष समजावा या इच्छेनें अर्जुन पुनः प्रश्न करतो असा अर्जुनाचा अभिप्राय जाणून श्रीकृष्ण भगवान् पूर्वी गुणातीता

च्या लक्षणादिकाविषयींची जी उत्तरें सांगितलीं त्यापेक्षा दुसरे प्रकारांनी त्यांचे लक्षणादिका विषयींची उत्तरें पांच श्लोकांनी-

सांगतात ॥ कोणते लिंगानें गुणातीत असें जाणावें या प्रश्नाचे उत्तर सांगतात ॥ हे पांडव हे पंडुपुत्रा अर्जुना-प्रकाशं-सत्वगु-

णाचें कार्य-च प्रवृत्ति-आणि रजोगुणाचें कार्य-च मोहं-तमोगुणाचें कार्य-हें उपलक्षण करून सर्व जीं प्रत्येक प्रत्येक तीन गु

णाचीं कार्यें । संप्रवृत्तानि-आपआपले सामर्थ्यानें प्रादुर्भूत झालेली असतां तीं दुःख रूप किंवा दुःखास साधन आहेत म्ह-

णून त्यांचा । नद्वेष्टि-द्वेष करीत नाहीं । आणि निवृत्तानि नकांक्षति-आणि तीच सुख रूप किंवा सुख साधन रूप त्या गुणांची कार्यें आ

श्रीभगवानुवाच ॥ प्रकाशंच प्रवृत्तिंच मोहमेवच पांडव ॥ नद्वेष्टि संप्रवृत्तानि ननिवृत्तानि कांक्षति ॥ २२ ॥

उदासीनवदासीनो गुणैर्योन विचाल्यते ॥ गुणावर्तंत इत्येव योवतिष्ठति नेंगते ॥ २३ ॥ श्रीकृष्णा० ॥

हेत तीं आपले नाशाचे सामर्थ्यानें नाश पावली तरी त्याचे ठायीं स्वप्नाप्रमाणें मिथ्यात्व निश्चय झाल्यामुळें त्यांची इच्छा करीत नाहीं

असा जो राग द्वेष शून्य त्यास गुणातीत म्हणावें असा याचा पुढेंच वर्थश्लोकांत अन्वय आहे ॥ २२ ॥ हे गुणातीताचें लक्षण स्वा-

र्थच आहे तें गुणातीत जो आहे त्याणेंच जाणण्यास योग्य आहे परार्थ नाहीं । कारण राग द्वेष आहे किंवा नाहीं म हें दुसऱ्याचे दु

सऱ्यास समजत नाहीं तें समजणें स्ववेद्य आहे यासाठी हा गुणातीत आहे असें दुसऱ्यास समजण्याचें जें लिंग तें त्याचा

आचार कसा या दुसरे प्रश्नाचे उत्तरांत सांगतात ॥ उदासीनवत् आसीनः-म्हणजे जसा उदासीन पुरुष दोघे विवाद करी

त असतां एकाचा पक्ष घेऊन अनुरक्त होत नाहीं त्याप्रमाणें राहिलेला तत्ववेत्ता गुणातीत । गुणैःन विचाल्यते-सुख दुःख वि

षयाकारानीं परिणाम पावलेले जे गुण तीहीं करून जो विवेक दर्शनावस्थेपासून झालेले स्वरूप स्थितीपासून चलन पाव

त नाहीं। तेंच स्पष्ट करतात॥ गुणाः स्ववर्तते इत्येवअवतिष्ठति-म्हणजे देहेंद्रियाकारादिकानीपरिणाम पावलेले हे गुणच परस्प
र आपआपले कार्याचे ठायीं परस्पर रहतात हा सर्व भ्रमानें आत्मस्वरूपाचे ठायीं भासणारा प्रपंच जड द्रव्य स्वभावप्रमाणें मि-
थ्याच आहे आणि याचा आत्म्याचा वास्तविक संबंध नाहीं स्वयंप्रकाशस्वरूप मी परमार्थतः सत्य च निर्विकार द्वैत शून्य आ
हें अशा निश्चयानें युक्त होत्सातां तो आपले स्वरूपाचेच ठाईं राहतो। नइंगते-कोठेंही व्यापारयुक्त होत नाहीं। योवतिष्ठते-
असें एथे क्रियापद आत्मनेपदी असावें परंतु छंदो भंग होईल यास्तव अवतिष्ठति असें परस्मैपदी-क्रियापद केलें। अ
थवा योनुतिष्ठति-असा पाठ करावा त्यांत-यः नु तिष्ठति-असा पदच्छेद करावा। अर्थ पूर्वी प्रमाणेंच आहे॥ २३॥ समदुः
ख सुखः-म्हणजे सुख दुःखें मिथ्या अनात्मा जे अंतःकरणादिक त्यांचे धर्म आहेत आत्म्याचे धर्म नाहींत अशा निश्च-
यानें सुख प्राप्त झालें तर प्रीति नाहीं दुःख झाले तरी द्वेष नाहीं अशीं सुख दुःखें ज्यास समानच आहेत। आणि ज्याकार

समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः॥ तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः॥ २४॥

णास्तव-स्वस्थः-म्हणजे द्वैत दर्शन नसल्यामुळें आत्मस्वरूपाचेच ठायीं जो राहिलेला आहे आणि समलोष्टाश्मकांचन
-म्हणजे याचकारणास्तव लोष्ठ म्हणजे मृत्तिकेचा गोळा अश्म म्हणजे पाषाण कांचन म्हणजे सुवर्ण हीं समान म्हणजे-
लोष्ठ पाषाण अग्राह्य सुवर्ण ग्राह्य अशी विषम बुद्धि ज्यावर नाहीं अशी ज्यास आहेत। याचकारणास्तव-तुल्यप्रियाप्रिय
-म्हणजे सुख साधनरूप प्रिय किंवा दुःख साधन रूप अप्रिय ज्यास तुल्यच म्हणजे हे हित करणारें आणि हे अहित कर
णारे अशी त्यांवर बुद्धि नसल्यामुळें तीउपेक्षा करण्यास च ज्यास पात्र आहेत असा। आणि-धीरः-म्हणजे शमादि साध
न संपन्न किंवा धैर्यवान। याचकारणानें-तुल्यनिंदात्मसंस्तुति.-म्हणजे लोकांनीं आपले गुणकीर्तन करणें अशीजी स्तुति आणि
आपले दोषाचे वर्णन करणे अशीजी निंदा त्या ज्यास स्तुतीनें हर्ष निंदेनें विषाद न झाल्यामुळें निर्विकारत्वास्तव समानच आ
हेत। त्यास गुणातीत म्हणावे किंवा या लिंगानी हा गुणातीत आहे असे जाणावें॥ २४॥ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥

मानापमानयो. तुल्यः–म्हणजे लोकानी केलेला जो आपला सत्कार तोमान आणि लोकांनीं केलेला जो अपला असत्कार तो अपमान त्यांहींकरून हर्ष विषाद नसल्यामुळें तेज्याम समानच आहेत। पूर्वोक्त स्तुति निंदा शब्दानीं केलेले व्यापार आणि मानापमान हे कायिक किंवा मानसिक व्यापार असा विशेष जाणावा। असा जो तो–तुल्यो मित्रारि पक्षयोः–म्हणजे मित्राप्रमाणें शत्रूंसही द्वेष करण्यास पात्र होत नाहीं अथवा मित्रपक्ष किंवा अरिपक्ष ज्याम तुल्य म्हणजे मित्रपक्षावर अनुग्रह करावा शत्रुपक्षावर क्रोध किंवा द्वेष करावा अशा विषमबुद्धीस पात्र ज्यास नाहींत असा। आणि–सर्वारंभपरित्यागी–म्हणजे देह निर्वाहोपयोगी मात्रजे व्यापार त्याहून सर्व कर्मांविषयींचे व्यापाराचा त्याग करण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा। उदासीन व दासीनः–एथून एथवर पर्यंत सांगितलेला आचार ज्याचा आहे त्यास गुणातीत असें म्हणावें किंवा याआचारानें हा गु-

मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः॥ सर्वारंभपरित्यागी गुणातीनः स उच्यते ॥ २५॥

मांच योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ॥ स गुणान्समतीत्यैतान्ब्रम्हभूयाय कल्पते ॥ २६॥

णातीत आहे असें जाणावे ॥ २५॥ आतां कोणते साधनानी गुणातीत होतो अशा तृतीय प्रश्नाचें उत्तर सांगतात॥ यः मां च अव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते–म्हणजे–च–हा–तु–याच्या अर्थी अथवा–एव–याच्या अर्थी आहे। जो तर सर्वांतर्यामी मायेने क्षेत्रज्ञ स्वरूपतेप्रत आणिलेला किंवा क्षेत्रज्ञ स्वरूपानें भासविलेला परमानंदघन वासुदेव नारायण ईश्वर मी याचें द्वादशाध्यायांत सांगितलेला निरतिशय प्रेमलक्षण जो भक्तियोग तेणें करून सर्वकाल स्वात्मत्वेकरून चिंतन करतो। सः एतान् गुणान् समतीत्य–म्हणजे तो माझा भक्त यागुणाचा अतिक्रम करून द्वैतदर्शनाचा ज्ञानानें बाध झाल्यामुळें। ब्रम्हभूयाय कल्पते–म्हणजे ब्रम्हस्वरूपानें स्थिती होणें अशा मोक्षास योग्य होतो। गुणातीत होण्यास सर्वदा भगवच्चिंतन च साधन असे या उत्तराचे तात्पर्य ॥ २६॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥ श्रीनारायणार्पणमस्तु॥ ७ ॥

याविषयीं हेतु सांगतात॥ हि अहं ब्रम्हण: प्रतिष्ठा -म्हणजे ज्या कारणास्तव तत्पदवाच्यार्थ जगदुत्पत्ति स्थिति लय कारण स
गुण सोपाधिक ब्रम्हाची प्रतिष्ठा म्हणजे निर्गुण निरुपाधिक निर्विकल्प सच्चिदानंदात्मक तत्पदलक्ष्यार्थ पारमार्थिक स्वरूप
मी वासुदेवच आहें यास्तव निरुपाधिक ब्रम्ह स्वरूप जो मी वासुदेव त्याचें स्वात्मत्वें करून जो चिंतन करतो तो ब्रम्हस्वरूप मो
क्षप्राप्तीस योग्य होतो असे जें सांगितलें तें यथार्थच आहे। ज्याची प्रतिष्ठा मी असें सांगितलें तें ब्रम्ह कसें तें विशेषणांनीं सांग
तात। अमृतस्य -म्हणजे नाशरहित। च-अव्ययस्य-म्हणजे आणि उत्पत्ति वृद्धि इत्यादिक परिणाम रहित। च-म्हणजे-आणि
-शाश्वतस्य-क्षीणता रूप परिणाम रहित। आणि धर्मस्य-म्हणजे ज्ञाननिष्ठा लक्षण जो धर्म त्याचा प्रापक। आणि सुखस्य-
ऐकांतिकस्य-म्हणजे दुःखसंबंध रहित नित्यानंदात्मक सुखरूप आणि ऐकांतिक म्हणजे सर्वदेशाचे ठायीं सर्वकालाचे
ठायीं एकरूपानें राहणार अशा सगुण ब्रम्हाचें मी वास्तविक मी निरुपाधिक स्वरूप आहें यास्तव माझा भक्त मासें चिंतनानें म

ब्रम्हणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च॥ शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च॥ २७॥

द्रूप होऊन समारापासून मुक्त होऊन मद्रूप मोक्षास पावतो म्हणजे मद्रूपच होतो असा भाव॥ ब्रम्हदेवानींही भगवान कृष्णा
प्रत-एकस्त्वमात्मा पुरुष: पुराण: सत्य: स्वयंज्योतिरनंत आद्य:॥ नित्योऽक्षरोऽजस्रसुखो निरंजन: पूर्णोऽद्वयो मुक्त उपाधि
तोऽमृत:- एणें करून सर्वोपाधि रहित ब्रम्हात्मस्वरूप तूंच आहेस असें स्तुतींत वर्णिलें आहे। स्तुतीवांचून ही -सर्वेषामेव
वस्तूनां भावार्थो भवति स्थित:॥ तस्यापि भगवान् कृष्ण: किमन्यद्वस्तु रूप्यतां। सर्व जी कार्यवस्तू त्यांचा सत्तारूप जो परमार्थ तो-
कार्यरूपानें होणारें जें सोपाधिक ब्रम्ह त्याचे ठायींच राहिला आहे। कारण सते शिवाय कार्य सत्ता नाहीं यास्तव कार्यसत्ता सोपाधि
क कारण ब्रम्हरूपच आहे। सोपाधिक ब्रम्ह कल्पना निरुपाधिक परब्रम्हाचे ठायींच झाली आहे या कारणास्तव कारण-
स्वरूप सोपाधिक ब्रम्हरूप जो तूं याचाही पारमार्थिक सत्तास्वरूप भगवान निरुपाधिक कृष्ण आहे अधिष्ठान सत्तेपेक्षा
त्यावर कल्पिलेले पदार्थांची भिन्न सत्ता नाहीं यास्तव सोपाधिक ब्रम्हा सुद्धा सर्व जगाचे कल्पनाधिष्ठानभूत निरुपाधिक

कृष्ण स्वरूपापेक्षा दुसरे कोणते वस्तु आहे म्हणोन सांगावे तें कृष्ण स्वरूपच पारमार्थिक आहे त्याशिवाय दुसरे पारमार्थिक सद्वस्तु-
नाही असे श्री शंकरांनी कृष्ण स्वरूपाचे वर्णन केलें आहे। तसें च येथें भगवंतानीं- ब्रम्हणोहि प्रतिष्ठाहं-एणेकरून अर्जुनास सां
गितले॥ अथवा तुझा जो भक्त तो तुझ्या निरंतर चिंतनानें तुझ्या स्वरूपाप्रत पावो परंतु ब्रम्हापेक्षा भिन्न जो तूं याचे चिंतनानें ब्र
म्हभाव रूप मोक्ष कसा प्राप्त होईल अशी शंका होईल तर तिचें निराकरण करण्याकरितां मीब्रम्हच आहे ब्रम्हाहून भिन्न ना
हीं असें-ब्रम्हणोहि प्रतिष्ठाहं-एणेकरून सांगतात॥ ब्रम्हण -परब्रम्हाची प्रतिष्ठा स्वरूप सत्ता मीच आहे मासेंहून ब्रम्ह भिन्न-
नाहीं॥ आणि अव्ययस्य अमृतत्वस्य प्रतिष्ठा अहमेव-म्हणजे ज्याचा नाश नाहीं असा जो मोक्ष त्याची प्रतिष्ठा पर्यवसान मीच आहें
माझी प्राप्तीच मोक्ष आहे आणि शाश्वतस्य धर्मस्य प्रतिष्ठा अहमेव-म्हणजे नाशरहित नित्य जो मोक्ष तें ज्याचें फल आहे असा
जो ज्ञाननिष्ठा स्वरूप धर्म त्याची प्रतिष्ठा म्हणजे पर्यवसान मीच आहे त्या धर्मानें पावावयाचे वस्तु मीच आहे मासेंहून दुसरे नाहीं

इतिश्री मद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रम्हविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन
संवादे गुणत्रय विभागो नाम चतुर्दशोध्यायः समाप्तः॥ १४॥ श्रीभगवानुवाच॥

आणि एकांतिकस्य सुखस्य च प्रतिष्ठा अहमेव-म्हणजे दुःख रहित परमानंद स्वरूप सुखाचें पर्यवसान मीच आहें मजवांचू
न दुसरे मुमुक्षूंस पावावयाचें दुसरें सुख नाहीं यास्तव माझा भक्त ब्रम्हभाव रूप मोक्षास योग्य होतो असें जें सांगितलें तें विरु
द्ध नाहीं युक्तच आहे॥ ॥ इतिश्रीमद्भगवद्गीतायाः रघुनाथशास्त्रिकृत भाषाविवृतौ चतुर्दशोध्यायः समाप्तः॥ १४ ॥ ॥
श्रीगणेशाय नमः॥ पूर्वाध्यायीं भगवंतानीं संसारास कारण भूत प्रकृतिसंभव गुणाचें सविस्तर निरूपण करून त्या गुणानें जो अती
त झाला त्यास अव्यभिचारी भक्तीचे योगानें म्हणजे माझे भजनानें ब्रम्हभावलक्षण मोक्षलाभ होतो असें-मांच योव्यभिचारेण
भक्तियोगेन सेवते-या श्लोकानें सांगून मनुष्य रूपी जो तूं त्याचे भजनानें ब्रम्ह प्राप्तिरूप मोक्ष कसा प्राप्त होईल अशा शंकेचें निरा
करण करण्यासाठीं-ब्रम्हणोहि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च-या सूत्रभूत श्लोकानें आपणास अनेकांतिक सुख रूप परब्र

म्ह स्वरूपत्व सांगितलें। त्यासूत्र भूत श्लोकाचें तें कारव स्वरूप ब्रम्ह कोणते लक्षणाचें आणि कोणत्या स्वरूपानें आहे आणि तें संसार कार्यी कशानें आवृत झालें आहे त्या आवरणाचा कोणते साधनानें नाश होतो आणि तें कोणत्या अधिकाऱ्यास प्राप्त होतें याचें सविस्तर निरूपण करून व्याख्यान करण्यासाठीं याप्रंचदशाध्यायाचा आरंभ करतात॥ त्यांत प्रथम-ब्रम्हणोहि प्रतिष्ठाहं-असें भगवंताचें वाक्य ऐकून मासें मारखा मनुष्यच हा दिसत असून असें कसें बोलतो अशा विस्मयानें युक्त झालेला आणि भयेंकरून व लज्जेंकरून काहीं पुढे प्रश्न करीत नाहीं अशा अर्जुनास पाहून कृपेंकरून आपलें स्वरूप सांगण्याची ज्यांस इच्छा झाली आहे असा भगवान श्रीकृष्ण चिरकालाचें भगवत्तत्वज्ञान होण्यास अधिकार आहे या स्तव गुणातीतत्व होण्यास साधनभूत या संसारावर वैराग्य उत्पन्न होण्यासाठीं संसाराचें नश्वर वृक्षरूपानें वर्णन करीत असता बोलतात॥ अश्वत्थवृक्षाचा विस्तार मोठा असतो आणि तो फार दिवस राहतो नसाच हा प्रपंच किंवा संसार त्याचा विस्तार फार मोठा असून अनादि

ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययं॥छंदांसि यस्य पर्णानि यस्तंवेद स वेदवित्॥१॥

काला पासून प्रवाहरूपानें स्थित आहे। यास्तव त्याचें अश्वत्थ रूपानें च वर्णन करतात॥ ऊर्ध्वमूलं-म्हणजे परब्रम्हस्वरूपाचा अतिशय मोठेपणा वर्णन करण्याकरतां परब्रम्ह स्वरूपास चार पादांची कल्पना करून हें चतुर्दशभुवनात्मक ब्रम्हांडामुद्धां त्यांत राहणारे सर्व विश्व परब्रम्ह स्वरूपाचा एक पाद आहे आणि अवशिष्ट त्रिपाद परब्रम्हाचें अमृतस्वरूप ब्रम्हांडाचेही वर द्योतमान स्वस्वरूपात्मक ऊर्ध्वलोकाचे ठायीं ब्रम्हविष्णु महेश्वर स्वरूपात्मक आहे असें पुरुषसूक्तांत वर्णन केलें आहे। त्याप्रमाणावरून ब्रम्हविष्णु महेश्वराचें स्वरूपानें ऊर्ध्वलोकीं राहणारें जें परब्रम्हाचें मायोपाधिक परमेश्वरात्मक स्वरूप तें-आहे मूल म्हणजे मूळाप्रमाणें उत्पत्ति स्थिति लयास कारण त्या प्रपञ्च किंवा संसार वृक्षाचें असा। तात्पर्य॥ मायोपाधिक जें परब्रम्ह तें च परमेश्वर स्वरूप जगदुत्पत्ति स्थिति लयास कारण आहे। परब्रम्ह शक्तिरूप जी माया ती परमेश्वराहून भिन्न नाहीं। ती सत्वगुण रजोगुण आणि तमोगुण अशी त्रिगुणात्मक आहे। रजोगुणात्मक त्या त्यंशोपाधिक कार्य ब्रम्हाख्य परमेश्वर जगाचे

ष्टीस कारण आहे। सत्वगुणात्मक शक्त्यंशोपाधिक विष्णवाख्य परमेश्वर जगाच्चे स्थितीस कारण आहे। तमोगुणात्मक शक्त्यं
शोपाधिक महेश्वर किंवा रुद्राख्य परमेश्वर जगाच्चे संव्हारात्मक प्रलयास कारण आहे। हे ब्रम्हविष्णु महेश्वररूपी तीन शक्त्युपा
धिक परमेश्वराचे अंश शक्तीचेच अंशभूत असून शक्तीहून अनन्य परमेश्वराशी अनन्य आहेत। तेच सांगितले प्रमाणें जगाच्चे उ
त्पत्ति स्थिति आणि प्रलय यांस कारण आहेत। असे विष्णुपुराण कूर्मपुराण स्कंदपुराण यांत स्पष्ट सांगितले आहे॥ विष्णुपुराणात
प्रथमअंशांतील तृतीयाध्यायात - निर्गुणस्याप्रमेयस्य शुद्धस्याप्यमलात्मनः॥ कथमर्गादिकर्तृत्वं ब्रम्हणोह्युपपद्यते - इतिमैत्रे
य प्रश्ने - म्हणजे सत्वादिगुणरहित आणि देशकाल वस्तु परिच्छेदानीं रहित आणि याच कारणास्तव देहेंद्रियादिक जी साधनें
त्यांहीकरून रहित जो असंग शुद्ध स्वरूप रागादिक म्हणजे इच्छाक्रोधादिक मलरहित परमात्मा त्यास सृष्टिस्थितिसंव्हारक
र्तृत्व कसे संभवतें असा मैत्रेयानें प्रश्न केला असता। पराशरः। शक्तयः सर्व भावाना मचिन्त्य ज्ञानगोचराः॥ यतोतोब्रम्हणस्तास्तु
सर्गाद्या भाव शक्तयः - म्हणजे अग्नि मणि मत्रादिक जे सर्वभाव पदार्थ त्याच्या कुतर्कांनीं त्याचे स्वरूप नाहीं असें म्हणता येत न
हीं त्याचे दाह किंवा त्याचा प्रतिबंध होणें इत्यादिक जे कार्य अनुभवास येतें तेणेंकरून त्या आहेत अशा अनुमानात्मक ज्ञान
नें त्या आहेत असा निश्चय होतो अशाजशा शक्ती आहेत त्याप्रमाणें ब्रम्हाच्यादी सृष्टिस्थितिलयरूप कार्यांस उत्पन्नकार
णाच्या शक्ती आहेत त्यांकरून परब्रम्हस्वरूपाहून अन्यजी शक्ती तदुपाधिकत्वास्तव तीं वरील कर्तृत्व ब्रम्हाचे ठायीं भास
ते असें पराशरानीं उत्तर दिलें॥ त्या शक्ती कोणत्या त्यांचे स्वरूप कूर्मपुराणांत उत्तर भागांत - सर्वासामेव शक्तीनांब्रम्हविष्णु
शिवात्मकाः॥ प्रधाना. संस्मृता देवा. शक्तय. परमात्मन.॥ आभ्यः परस्तात भगवान परमात्मा सनातनः - म्हणजे परमात्म्या
च्या सर्व शक्तीमध्यें प्रधानभूत शक्तिस्वरूप ब्रम्हविष्णु शिवात्मक देव आहेत असें महर्षींनीं सांगितलें आहे। या ब्रम्हवि
ष्णु महेश्वरात्मक ज्या शक्ती त्यांपेक्षांही परस्तात म्हणजे त्याहीकरून असंसृष्ट किंवा त्याहून निराळा निरुपाधिक परमात्मा
त्यांचा ही अधिष्ठानभूत सनातन आहे असें सांगितलें आहे॥ असाच अर्थ शिवपुराणांत सांगितला आहे॥ सृष्टेः प्रवर्तकोब्र

म्हा स्थिते विष्णुर्विमोहनः ॥ संव्हारस्य ततोरुद्रस्तयोर्नित्यं नियामकः ॥ तस्मात्त्रयस्ते कथ्यंते जगतः कारणं त्रय ॥ कारणत्रयहेतुश्च शिवः परम कारणं ॥ म्हणजे सृष्टीचा प्रवर्तक ब्रम्हा आणि स्थितीचा प्रवर्तक विष्णु आहे परंतु संव्हाराचा प्रवर्तक रुद्र हा मोह शक्तीमुळें ब्रम्हविष्णूचा ही नियामक आहे। या कारणास्तव ते ब्रम्हविष्णुरुद्र तिघे सृष्टिस्थितिलयास क्रमानी प्रत्येक प्रत्येक तीन कारणें आहेत। कारण भूत जें ते तीन यांचाही मूल कारण कल्याण स्वरूप निरुपाधिक परमात्मा आहे॥ स्कंद पुराणांतही- ब्रम्हा विष्णुश्च रुद्रश्च परतत्व विभूतयः ॥ एषां त्रयाणां मधिकः सर्व कारण मीश्वरः - म्हणजे ब्रम्हा विष्णु आणि रुद्र हे परमात्म तत्व जें परमब्रम्ह त्याच्या विभूति म्हणजे माया द्वारा अंश आहेत। या तिघां पेक्षांही सर्वांचें कारण निरुपाधिक परमेश्वर आहे। अथवा। जशा शिडीच्या किंवा जिन्याच्या पायऱ्या एकीवर एक असतात त्या प्रमाणें पूर्वी सांगितल्या प्रमाणे मनुष्यांतील मुख्य राजाच्या आनंदा पेक्षां मनुष्य गंधर्वांचा आनंद शतगुणित अधिकतर आहे। त्यापेक्षां देव गंधर्वांचा आनंद शतगुणित अधिक आहे या क्रमानें पितर- आजानदेव- कर्मदेव- मुख्यदेव- इंद्र- बृहस्पती- प्रजापती- सूत्रात्मा यांचे उत्तरोत्तर शतगुणित अधिक आनंद आहेत। त्यापेक्षांही निरतिशय जो ब्रम्हानंद वाणीला मनाला अगोचर ज्यापासून हीं सर्व भूतें उत्पन्न होतात आणि उत्पन्न झालेलीं जेणें करून स्थितीप्रत पावतात आणि लय पावत असतां त्याचे ठायींच लय पावतात असा जो श्रुतींत सांगितलेला सर्वांहून वर राहणारा ब्रम्हरूप आनंद किंवा सर्वांहून उत्कृष्ट जें ब्रम्ह तें ऊर्ध्व। अथवा। सर्व संसाराचा तत्वज्ञानानें बाध झाला तरी ज्या स्वरूपाचा बाध होत नाही। सर्व बाधाचें साक्षिभूत जें सर्वांवर राहतें तें सर्व संसाराचें भ्रमास अधिष्ठानभूत परब्रम्ह। अथवा- या अध्यायांत क्षर आणि अक्षर सांगावयाचे आहेत। त्याहून उत्तर किंवा उत्कृष्ट पुरुषोत्तम तो ऊर्ध्व। तें आहे मायेचे योगानें मूल ज्यांचें असा मूल शब्दाचा पूर्वीचाच अर्थ सर्व व्याख्येंत जाणावा। आणि- अधः शाखं- अधः म्हणजे निरतिशयित आनंद सर्वोत्कृष्ट पुरुषोत्तमादि रूप ऊर्ध्व पदार्थांपेक्षां खालीं राहणारे पूर्वोक्त जे ब्रम्हविष्णु महेश्वर किंवा त्याहून अर्वाचीन म्हणजे अलीकडील कार्योपाधि हिरण्यगर्भादिक विराट प्रजापति असुर सुर गंधर्व अप्सरा नर तिर्यक् पशुपक्षीस्थ

वर रूपजे सर्वविकार ते सर्व दिशांचे ठायी पसरले हे आहेत यामुळें शाखा प्रमाणे विस्तार करणारे ज्या संसार वृक्षाचे आहेत ॥ वेदां
त जे थें सृष्टि सांगितली तेथें परब्रम्हास मायाशक्तीचे योगानें सृष्टि करण्याचा संकल्प उत्पन्न होऊन परब्रम्हानें अपंचीकृत
भूतें आणि भौतिक इंद्रिय प्राण मन इत्यादिकांची सूक्ष्म सृष्टि उत्पन्न केली ॥ नंतर महाभूतांचें पंचीकरण करून स्थूल सृष्टि
उत्पन्न करून त्या द्विविध सृष्टींत जीवरूपानें आपण प्रवेश करून त्यांचे द्वारा नाम रूपाचे व्याकरण करण्याचा संकल्प क
रून याचे अमुक नाम अमुक रूप असा विस्तार करण्याचा संकल्प होता त्याप्रमाणें या प्रपंचात्मक जगाचा विस्तार केला अ-
सें प्रतिपादन केले आहे। याप्रमाणावरून जसा प्रसिद्ध अश्वत्थ वृक्ष किंवा दुसरा वृक्ष याचे उत्पत्ति स्थिति आदिकाम-
त्याचें बीजभूत सूक्ष्म मूळच कारण आहे त्याप्रमाणें या प्रपंच वृक्षाचें उत्पत्यादिकांस मायोपाधिक परमेश्वराचें मायाश
क्तिस्वरूप ब्रम्हविष्णु महेश्वरात्मक सूक्ष्मरूपच कारण आहे। आणि प्रसिद्ध अश्वत्थ वृक्षाचे मोठे विस्तारास त्याच्या स्थूल शा-
खाच कारण आहेत। त्याप्रमाणे या प्रपंच वृक्षास मायोपाधिक परमेश्वर रूप सूक्ष्म कारणाचे जो स्थूलरूप जे महत्तत्त्वोपाधि
क हिरण्यगर्भ विराटादिक तेंच नामरूपाचे व्याकरणानें विस्तार होण्यास कारण आहे असा हा जो प्रपंच वृक्ष त्यास-अश्व
त्थं प्राहुः। ह्मणायाम व मिथ्यास्वरूप प्रपंचवृक्ष नश्वर आहे यामुळे श्वः म्हणजे उद्यांही प्रातःकालपर्यंत राहील असा वि-
श्वास करण्यास योग्य नाहीं असा अश्वत्थ शब्दापासून अर्थ निष्पन्न होतो याकारणानें हा प्रपंच अश्वत्थ आहे त-
थापि मूढांस त्या त्या देहेंद्रिय प्रवाहरूपाने हा निरंतर स्थिर आहे म्हणून- अव्ययं- तत्वज्ञानाशिवाय छेद होण्यास दुर्घ
ट आहे असें। प्राहुः-म्हणजे श्रुति आणि स्मृति बोलतात॥ ऊर्ध्वमूल अर्वाक शाख म्हणजे अधःशाख हा अश्वत्थ स
नातन म्हणजे प्रवाहें करून अनादि अनंत आहे असे कठवल्ली श्रुतींत सांगितले आहे॥ अव्यक्तमूल प्रभवस्तस्यैवानु-
ग्रहोत्थितः॥ बुद्धिस्कंधमयश्चैव इंद्रियांतरकोटरः॥ महाभूतविशाखश्च विषयैः पत्रवांस्तथा॥ धर्माधर्म सुपुष्पश्च सुख
दुःख फलोदयः॥ आजीव्यः सर्वभूतानां ब्रम्हवृक्षः सनातनः॥ एतद्ब्रम्हवनं चैव ब्रम्हाचरति साक्षिवत्॥ एतत्छित्वा-

न भित्वा च ज्ञानेन परमात्मिना॥ ततस्था त्मग तिं याथ्य नस्मान्नावर्तते पुनः॥ अर्थ। अव्यक्त म्हणजे मायोपाधिक अव्याकृ
त ब्रम्हरूप मूलकारणापासून आहे प्रभव म्हणजे उत्पत्ति ज्याची। आणि त्या मूलकारणाचे अनुग्रहें करून म्हणजे स्थूल
स्वरूपात्मक दृढत्यामुळें उत्थित म्हणजे उत्तम प्रकारें करून वृद्धीप्रत पावलेला। वृक्षाच्या शाखा त्याच्या स्कंधापासून हो
तात। संसार वृक्षास स्कंध स्थानीं बुद्धि तिचे जे नानाविध परिणाम तेच विस्तार करणारे शाखारूप आहेत यास्तव तोत
न्मय म्हणजे तत्प्रचुर आहे। आणि इंद्रियांचीं जीं अंतरें म्हणजे छिद्रें तीच त्याचीं कोठें आहेत। आणि पृथिव्यादिक पंचम
हाभूतें ज्यास उपशाखा आहेत। अथवा विशाख म्हणजे स्तंभ ज्यास खुंट म्हणतात तो ज्यास महाभूतें आहेत। आणि
शब्दादि विषय ज्याचीं पत्रें आहेत त्यांहीकरून युक्त। आणि पुण्य पापरूप पुष्पांहीं करून जो युक्त। आणि सुख दुःख
रूप फळें ज्यास उत्पन्न झालीं आहेत त्या फळांनी जो युक्त। आणि सर्व भूतांचा जो उपजीव्य म्हणजे स्थितीस किंवा सेव
न करण्यास स्थानभूत। प्रसिद्ध वृक्ष जसा पक्ष्यादिकाचे स्थितीस कारण तसा। ब्रम्हवृक्ष म्हणजे परमात्मा जो याणें
अधिष्ठिलेला वृक्ष तो सनातन म्हणजे तत्त्वज्ञानावांचून छेद करण्यास दुर्घट। आणि- एतत् ब्रम्हवनं- म्हणजे याजी-
वरूप ब्रम्हाचे वन म्हणजे भोग्य। असा हा प्रपंच वृक्ष आहे। याप्रत परब्रम्ह साक्षी प्रमाणें आहे। त्याचे धर्मानें लिप्त न हो
तां त्याचें प्रकाशक आहे। या संसार वृक्षरूप ब्रम्हवनाप्रत मी ब्रम्हच आहें अशा ब्रम्हात्म ज्ञानात्मक उत्कृष्ट खड्गानें
छिन्न भिन्न करून म्हणजे समूल उत्कृंतन करून। मोक्षाख्य जी आत्मप्राप्तिरूप गति ती प्रत पाऊन त्या मोक्षापासून
पुनः जीव परत जन्मास येत नाहीं असें स्मृतीनें ही सांगितलें आहे॥ येथें अश्वत्थरूप वृक्षाची जी उपमा दिली ती गंगेचे
तरंगांनी ज्याचे मूळांतील मृत्तिका धुऊन जाऊन वायूनें ज्याचीं अर्धीं मूळें उपडून अर्धीं भूमीत राहून खालीं शाखा
होऊन वर मुळें होऊन अर्धा पडलेला जो अश्वत्थ वृक्ष त्याची दिली। त्यामुळें ऊर्ध्व मूल अधः शाख अश्वत्थ ही वि
शेषणें उपमानास अश्वत्थ वृक्षास उपपन्न झालीं असें जाणावें॥ छंदांसि यस्य पर्णानि- म्हणजे अद्वैत ब्रम्हात्मतत्व

र्थे आच्छादन करतात यामुळें किंवा संसार रूप वृक्षाचें रक्षण करतात यामुळें ज्यांस छंद असे म्हणतात असे जे ऋक् यजुः साम वेदांतील कर्मकांड भाग ते ज्यास पर्णां प्रमाणें आहेत। प्रसिद्ध वृक्षांची पर्णें जशीं त्याचे संरक्षणार्थ किंवा शोभार्थ होतात तसेच कर्म कांडात्मक वेद यज्ञादिक धर्माधर्म प्रतिपादन करतात त्याची फलेंही सांगतात। त्याचें अनुष्ठान जीव करून त्याचें फल भोगासाठीं नानाविध देव मनुष्यादिक देह धारण करतात यामुळें प्रपंच वृक्षास शोभा येते। तीस धर्माधर्म प्रतिपादन करण्याचे द्वारानें कर्म कांडात्मक वेदच कारण आहेत। आणि प्रलयोत्तर ही जीवानी केलेले धर्माधर्माचें फळ त्यांस देण्याकरतां ईश्वर वारंवार सृष्टी करतो। याप्रमाणें प्रपंच वृक्ष निरंतर प्रवाहरूपानें स्फुरसिन राहतो। त्यास धर्माधर्मांचे प्रतिपादन द्वारा ते कर्मकांड रूप वेदच कारण आहेत। अथवा प्रसिद्ध अश्वत्थादिक वृक्षास पर्णें वाढून असल्यीं म्हणजे त्यायोगानें त्याची छाया दाट होते तेणे करून तो वृक्ष सर्व जीवांस त्याखाली बसून विश्रांती घेण्यास योग्य होतो। याप्रमाणे कर्म कांड रूप वेदांत सांगितलेलीं जी नित्य नैमित्तिक कर्में त्यांचें अनुष्ठान जीवानी केलें म्हणजे त्या कर्मांचीं जी स्वर्गादिक फलें ती जीवांस छायेप्रमाणें होऊन त्यायोगानें हा प्रपंच वृक्ष जीवांस आश्रय करण्यास योग्य होतो म्हणून कर्म प्रतिपादन द्वारा तें कर्म कांड रूप वेद या प्रपंच वृक्षास कर्मफलभूत जी छाया ती प्राप्त होण्यास पर्णाप्रमाणे आहेत। यस्तं वेद-म्हणजे अशा प्रकारच्या या संसार रूप मायामय अश्वत्थ वृक्षास जो जाणतो। स वेदवित्-म्हणजे तोच कर्म ब्रम्ह रूप वेदार्थ वेत्ता॥ संसार वृक्षाचें मूळ कारण मायोपाधिक परब्रम्ह हिरण्यगर्भादिक जे जीव ते याचे शाखा स्थानी आहेत। ती संसार वृक्ष स्वरूपानें नाशवंत आहे प्रवाह रूपानें अनंत आहे त्याचें वेदोक्त कर्मांनीं सेवन जीव करतात तो ब्रम्हात्म तत्व ज्ञानानें नाश पावतो। इतकाच सकल वेद प्रतिपाद्य अर्थ आहे। जो वेदार्थ वेत्ता तो वेदवित। अशी पूर्वोक्त वृक्ष ज्ञात्याची स्तुती केली॥ १॥ पूर्वश्लोकांत कार्योपाधि जे हिरण्यगर्भादिक जीव ते या प्रपंच वृक्षाचे शाखास्थानीं सांगितले आतां यांवरील विशेष सांगतात॥ अधश्चोर्ध्वं प्रसृताः तस्य शाखाः-म्हणजे त्या कार्योपाधिक हिरण्यगर्भादिक जीवांमध्यें जे कुत्सित आचरण करणा

र पापीजीव ते अधः -म्हणजे मनुष्य पश्वादिक योनीचे ठायीं आपले संततीचे द्वारानें प्रसृताः म्हणजे विस्तारा प्रत पावले आहे
त आणि जे रमणीय म्हणजे उत्तमाचरण करणारे पुण्यवंत जीव ते-ऊर्ध्वप्रसृता. -म्हणजे देवादिक योनीचे ठायी संततीचे द्वाराने वि
स्ताराप्रत पावले आहेत ते मनुष्यलोकापासून सत्यलोकपर्यंत विस्तार पावलेले जीव-गुणप्रवृद्धाः विषय प्रवाला शाखाः-
म्हणजे जशा प्रसिद्ध अश्वत्थादिक वृक्षाच्या शाखा जलसेचनानें विस्तार पावतात तशा देहेंद्रिय मन विषयादिकाकारानें प
रिणाम पावलेले जे सत्वादिक गुण त्यांहीं करून विस्ताराप्रत पावलेल्या आणि शब्दादिक जे विषय तेच तदाकार इंद्रियद्वारा
झालेल्या अंतःकरणवृत्तीनीं रजकल्या त्तव आहेत। शाखांस संलग्न कोंवळे पालवी प्रमाणें ज्यांस अशाया संसारवृक्षाच्या
शाखा आहेत। आणि ब्रम्हविष्णु महेश्वरात्मक मायोपाधिक परमेश्वर स्वरूप ऊर्ध्व मुख्य मूल या प्रपंच वृक्षाचें जसें
आहे त्याप्रमाणे दुसरीहीं या प्रपंच वृक्षाचीं-अधः मनुष्यलोके -म्हणजे खालचा जो हा मनुष्य लोक त्याचें ठायीं मूल
अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषय प्रवालाः॥ अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबंधीनि मनुष्यलोके॥२
नि म्हणजे त्यात्या विषयांच्या भोगापासून उत्पन्न झालेल्या ज्या रागद्वेषादिक धर्माधर्म प्रवृत्तीस उत्पन्न करणाऱ्या वासना
तदात्मक अवांतर मूळे किंवा उ ।मूळें। अनुसंततानि म्हणजे अनस्यूत म्हणजे प्रवाहरूपानें नित्य आहेत। तीं कर्मानुबंधी
नि -म्हणजे धर्माधर्माख्य कर्मच आहे अनुबंध म्हणजे पाठीमागून होणारें ज्यांच्या अशीं तीं अवांतर मूळें आहेत। तात्पर्य। ऊ
र्ध्व भागीं किंवा अधोभागी स्थित जे लोक त्यांचे ठायीं केलेले जे भोग त्यांहीं करून कर्मक्षय झाला असतां त्या भोगांच्या वासना
हीं करून युक्त जे जीव ते मनुष्य लोकीं किंवा ब्राम्हण्यादिक जातीनीं युक्त जो मनुष्य देह तद्रूप जो लोक त्याचे ठायीं जन्मास येऊ
न त्या वासनानुरूप कर्में करण्या विषयीं प्रवृत्त होऊन कर्में करतात॥ यास्तव कर्में वासना नंतर दं णारीं आहेत। हें उपलक्ष
ण करून प्रपंच अनादि बीजांकुरन्यायानें आहे यास्तव वासना ह्या कर्मजन्य भोगानंतर आहेत कर्में वासनानंतर आहेत अस
हा अविछिन्न प्रवाहरूप संसार वृक्ष आहे। बहुतकरून मनुष्यांस च कर्माधिकार आहे यास्तव मनुष्यलोकीं असें म्हटलें॥
॥२॥

हे पाल्लव योन रुन्त्य नाहीं ॥१९॥ याप्रमाणे ज्ञानाचें आणि कर्माचें आणि कर्त्याचे प्रत्येक सात्विकादिक भेदानें त्रिविधत्व सांगण्याची प्रतिज्ञा करून प्रथम तीन श्लोकांनीं ज्ञानाचें त्रिविधत्व सांगतात। विभक्तेषु सर्वभूतेषु-म्हणजे परस्पर व्यावृत्त म्हणजे भिन्न भिन्न असे जे उत्पत्ति नाशवन्त अव्याकृत हिरण्यगर्भ विराट् स ज्ञक बीज सूक्ष्म स्थूल रूप समष्टि व्यष्ट्यात्मक द्रव्यवर्ग त्यांचे ठायीं। अव्ययं अविभक्तं एकं भावं येन ईक्षते-म्हणजे उत्पत्तिविनाशादिक सर्व विकार रहित अदृश्य आणि अधिष्ठानत्वें करून आणि बाधाचे अवधित्वें करून किंवा बाधाचे साक्षित्वें करून सर्वत्र अव्यावृत्त म्हणजे भेदरहित आणि अद्वितीय असा जो परमार्थ सत्तास्वरूप स्वप्रकाश आनंदरूप आत्मा त्याप्रत वेदांतवाक्याचे श्रवणमननादिकानें उत्पन्न झालेलें जें ब्रम्हात्माकार अंतःकरणपरिणामात्मक वृत्तिरूप ज्ञान तेणें करून साक्षात्कारानें पाहतो। तत् ज्ञानं सात्विकं विद्धि-म्हणजे तें मिथ्या प्रपंचाचा बाध करणारें अद्वैत ब्रम्हात्मतत्व दर्शनरूप ज्ञान सात्विक असें तूं जाण। संसारकारण जें राजस तामस ज्ञान तें सात्विक नव्हे असा अभिप्राय॥ २०॥ आ

सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते॥ अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्विकं॥ २०॥

पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान्॥ वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं राजसं स्मृतं॥ २१॥ ॥

ता राजस ज्ञान सांगतात। पृथक्त्वेन स्थितेषु सर्वभूतेषु-म्हणजे भिन्नभिन्नत्वें करून राहिलेले जे देहादिक त्यांचे ठायीं। पृथग्विधान् नाना भावान्-म्हणजे सुखित्व दुःखित्वादिकें करून परस्पर विलक्षण असे जे प्रतिदेहाचे ठायीं भिन्नभिन्न क्षेत्रज्ञ जीव त्यांप्रत। यत् ज्ञानं वेत्ति-म्हणजे ज्या ज्ञानें करून जाणतो। एथें-येन ज्ञानेन वेत्ति-असा प्रयोग असावा परंतु करणावर त्व कर्तृत्वाचा आरोप करून-काष्ठानि पचंति-म्हणजे काष्ठें पाक करतात असा जसा लोकांत प्रयोग आहे तसा-यत् ज्ञानं वेत्ति-हा प्रयोग करणावर कर्तृत्वाचा आरोप करून केला। अथवा अहंकाररूप कर्त्याचा आणि अंतःकरणवृत्तिरूप ज्ञानाचा अभेदच आहे या अभिप्रायानें तसा प्रयोग केला असें जाणावें। तत् ज्ञानं विद्धि राजसं-म्हणजे ते ज्ञान राजस असें तूं जाण। पुनः ज्ञानपदानें आत्म्यांचा परस्पर भेद त्यांचा ईश्वराशीं भेद त्या आत्म्याहून आणि ईश्वराहून आणि परस्पर अचेतनाचा भेद याप्रकारचें अ-

नौपाधिक प्रपंचभेद ज्ञान सर्वही कुतार्किकांचे राजसच आहे असे कचविलें ॥ २१॥ आता तामस ज्ञान सांगतात। यत्तु एकस्मिन्का र्ये अहेतुकं कृत्स्नवत् सक्तं - म्हणजे पूर्वोक्त राजसाहून भिन्न - तु शब्दाचा अर्थ भूतकार्ये बहुत विद्यमान असता एकेच भूतवि कार रूप देहादिक कार्याचे ठायी किंवा प्रतिमादिकाचे ठायी अहेतुक म्हणजे उपपत्तिरहित दुसरे भूतकार्यास आत्मत्व किंवा ईश्वरत्व नाही तर याच भूतकार्यास आत्मत्व कसे किंवा ईश्वरत्व कसें असे ज्यात अनुसंधान नाही याप्रकारचे जे कृत्स्नवत्स क्तं - म्हणजे परिपूर्ण प्रमाणे म्हणजे हाच किंवा या परिमाणाचाच आत्मा किंवा ईश्वर आहे याहून भिन्न नाही अशा अ भिनिवेशानें युक्त। जसे दिगंबराचे मती सावयव देह परिमाणाचा आत्मा किंवा चार्वाकांचे मती देहच आत्मा असें ज्ञान किं वा पाषाण काष्ठ प्रतिमाच किंवा प्रतिमेतच तितके परिणामाचा ईश्वर असे याच कारणास्तव। अतत्त्वार्थवत् - म्हणजे तत्त्वा र्थाचा अवलंबन करणारें। आणि अल्पं च - म्हणजे आत्म्याचे किंवा ईश्वराचे नित्यत्व किंवा सर्वव्यापकत्व ज्यांत भासले

यत्तु कृत्स्नवदेकस्मिन् कार्ये सक्तमहेतुकं॥ अतत्त्वार्थवदल्पंच तत्तामसमुदाहृतं ॥२२॥

नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतं॥ अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते॥२३॥

नाहीं या स्तव अल्प असें जे नित्य विभु देहादिक जो आत्मा तद्भिन्न ईश्वरही नित्य विभु सर्वव्यापक अज्ञानार्किकादिकांच्या ज्ञानाहून विलक्षण अनित्य परिच्छिन्न देहात्माभिमान रूप ज्ञान किंवा प्राकृत मूढ लोकांचे परिच्छिन्न प्रतिमादि परिमा ण प्रतिमात्मक ईश्वर ज्ञान। तत्तामसं उदाहृतं - म्हणजे तें ज्ञान तामस असे शिष्टांनीं म्हटले आहे ॥ २२॥ याप्रमाणे वेदांत मतांचें जें अद्वैतात्म दर्शन रूप सात्त्विक ज्ञान त्याचा मुमुक्षूनी स्वीकार करावा। आणि द्वैतदर्शीचें जें आत्मा नित्य विभु प्रति शरीरी भिन्न भिन्न असें पूर्वोक्त राजस भेद ज्ञान आणि आत्मा अनित्य परिच्छिन्न परिमाणाचा किंवा देहच आत्मा इत्यादिक तामस ज्ञान त्यांचा त्याग करावा असे सांगून आता त्रिविध कर्म सांगतात। नियतं - म्हणजे शा स्त्रोक्त यावत् अंगाचे अनुष्ठान करण्यास जे असमर्थ आहेत त्यांस ही यथाशक्ति अंगानुष्ठान करून अवश्यक

नैष्य असे म्हणजे नित्य। आणि संगरहित - म्हणजे मी असा मोठा याज्ञिक आहें इत्यादिक अभिमानरूप जो राजस अहंकार तेणें क
रून रहित। आणि अरागद्वेषत. अफलप्रेप्सुना कृतं - म्हणजे याकर्मानें राजादिकापासून सन्मान पावेन असा मनातील जो अभि-
प्राय तो राग - याकर्मानें शत्रूचा पराजय करीन असा जो अभिप्राय तो द्वेष - त्यांही करून केलेलें आणि ज्यास फळाची इच्छा नाहीं अ
शा कर्त्यानें केलेलें। यत् कर्म तत् सात्विकं उच्यते - म्हणजे जे होम दानयागादिरूप कर्म त्यास सात्विक असें शिष्ट म्हणतात॥२३
॥ आता राजस कर्म सांगतात॥ यत्तु कामेप्सुना वा साहंकारेण बहुला यासं क्रियते - तु शब्दानें सात्विकापेक्षा भेद सांगितला। फ
लाची इच्छा करणारा जो कर्ता किंवा पूर्वोक्त संगात्मक गर्वानें युक्त जो कर्ता किंवा वा शब्दानें समुच्चय करून फलेच्छा करणारा
आणि अहंकारानें ही युक्त असा कर्ता त्यानें केलेलें जें - बहुलायासं - सर्वांगांचे अनुष्ठानानें क्लेश देणारें काम्य कर्म। तत् राजसं
उदाहृतं - म्हणजे तें राजस कर्म असें शिष्ट म्हणतात। एथें सर्व विशेषणानीं सात्विक कर्माचीं जीं विशेषणें त्यांचा अभाव सांगि

यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः॥ क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतं॥२४॥
अनुबंधं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषं॥ मोहादारभ्यते कर्म तत्तामसमुदाहृतं॥२५॥

तला॥२४॥ आता तामस कर्म सांगतात। अनुबंधं - म्हणजे पश्चात् होणारें अशुभ। क्षयं - म्हणजे शरीरसामर्थ्याचा किंवा ध
नाचा किंवा सेनेचा जो नाश तो। हिंसा - म्हणजे प्राण्यास होणारी पीडा। पौरुष - म्हणजे आपलें सामर्थ्य। याचें अनपेक्ष्य - म्ह
णजे आलोचन न करून। मोहात् आरभ्यते कर्म - म्हणजे केवळ अविवेकानेंच त्या कर्माचा आरंभ करतात। तत् तामस उदाहृतं
- म्हणजे त्यास तामस कर्म असें शिष्ट म्हणतात॥२५॥ आता त्रिविध कर्त्यांचें निरूपण करीत असता सात्विक कर्ता सांगता
त। मुक्तसंगः - म्हणजे फळाची इच्छा ज्यानें टाकली आहे असा। आणि - अनहंवादी - म्हणजे मी कर्ता असें जो बोलत नाहीं
किंवा आपल्या गुणाची श्लाघा करीत नाहीं। आणि धृत्युत्साहसमन्वितः - म्हणजे विघ्न उपस्थित झालें तरी प्रारंभ केलेलें -
कर्माचा त्याग न करण्यास कारणभूत जो अंतःकरणाचा वृत्तिविशेष तो धृति म्हणजे धैर्य - हें मी करीनच अशा निश्चया-

त्मक जी बुद्धि तो उत्साह - त्यांहीकरून युक्त। आणि सिध्य सिध्योः निर्विकारः - म्हणजे कर्माने सिद्धीने झालेले हर्षामुळें मुख प्रस
न्न होणे आणि कर्माचे असिद्धीनें झालेल शोकानें मुख म्लान होणें अशा विकाराने रहित। कर्ता सात्विकः उच्यते - म्हणजे कर्ता-
म्हणजे शास्त्रप्रमाणावरून कर्म करणारा फलाचे प्रीतीने करणारा नव्हे असा जो कर्ता त्यास सात्विककर्ता असें शिष्ट बोलता
त॥ २६॥ आता राजस कर्ता सांगतात। रागी - म्हणजे कामादिकानें व्याकुलचित्त। आणि फलप्रेप्सुः - म्हणजे फलाचीइ-
च्छा करणारा। आणि लुब्धः - म्हणजे परद्रव्याचा अभिलाष करणारा किंवा द्रव्य असतांही त्याचा धर्मकार्यादिकार्थव्यय
न करणारा। आणि हिंसात्मकः - म्हणजे आपला अभिप्राय प्रगट करून दुसऱ्याचे वृत्तीचा छेद करणे असीजी हिंसा तीक
रण्याविषयी त्याचा स्वभाव आहे असा। आपला अभिप्राय प्रकट न करून पूर्वोक्त हिंसा करण्याच्या स्वभावाच्या पुरुषा

मुक्तसंगोनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः॥ सिध्यसिध्योर्निर्विकारः कर्ता सात्विक उच्यते॥ २६॥
रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोशुचिः॥ हर्षशोकान्वितः कर्ता तामसः परिकीर्तितः॥ २७॥
अयुक्तः प्राकृतस्तब्धः शठोनैकृतिकोलसः॥ विषादी दीर्घसूत्रीच कर्ता तामस उच्यते॥ २८॥ ॥

स नैकृतिक असें म्हणतात। आणि अशुचिः - म्हणजे शास्त्रोक्त शौचरहित। हर्षशोकान्वितः - म्हणजे कर्म सिद्धीनें जो ह
र्ष आणि असिद्धीने जो शोक त्यांहींकरून युक्त। कर्ता राजस परिकीर्तितः - म्हणजे असा जो कर्ता तो राजस कर्ता असे शि-
ष्टानीं म्हटलें आहे॥ २७॥ आता तामस कर्ता सांगतात। अयुक्तः - म्हणजे सर्वकाळ विषयानें आपले कडे चित्त ओढून घेत-
ल्यामुळे जें कर्तव्य त्याविषयी जो सावधान नाहीं असा। आणि प्राकृतः - म्हणजे बाळाप्रमाणे ज्याचे बुद्धीस शास्त्रसंस्कार-
नाही असा। आणि स्तब्धः - म्हणजे गुरु देवता यांसही जो नम्र होत नाहीं। आणि शठः - म्हणजे दुसऱ्याची वंचना करण्या
साठी एकजाणत असताही अन्यथा बोलणारा। नैकृतिकः - म्हणजे आपण परोपकार करणारा आहे असा दुसऱ्यास भ्रम
उत्पन्न करून त्याचे वृत्तीचा छेद करून स्वार्थ संपादना विषयीं तत्पर। अलसः - म्हणजे जे अवश्य करावयाचे आहे तें कर

ण्याविषयी ही ज्याची प्रवृत्ति होत नाही। विषादी - म्हणजे निरंतर असंतोष स्वभावामुळे शोक करण्याचे स्वभावाचा। दीर्घसू त्री-म्हणजे निरंतर हजारो शकानी युक्त असल्या मुळे त्याची फार हळू हळू प्रवृत्ति होते किंवा आजजे करावयाचे ते महिन्याने करण्याचे स्वभावाचा असा जो कर्ता त्यास तामस कर्ता शिष्ट म्हणतात॥ २८॥ यापमाणे ज्ञान कर्मच कर्ताच त्रिविध गुणभेदत. -याचे व्याख्यान केले। आता धृत्युत्साह समन्वित -या श्लोकात कच विलेले जे धृति आणि उत्साह म्हणजे बुद्धि याचे गुण भेदाने त्रिविधत्व सागण्याची प्रतिज्ञा करतात। बुद्धे-धृतेश्चैव गुणत अशेषेण पृथक्त्वेन प्रोच्यमानं त्रिविध भेदं- शृणु-म्हणजे हे धनजया अर्जुना पूर्वोक्त अध्यवसायात्मक म्हणजे निश्चयात्मक वृत्तीने युक्त जी बुद्धि आणि धृति या च्या सत्वादिक गुणानी केलेला जो त्रिविध भेद तो तुला सागतो तो निःशेष आणि कोणता भेद ग्राह्य कोणता त्याज्य असा विवेके करून सांगतो त्याप्रत तू श्रवण कर। पृथक् बुद्धि शब्दाने वृत्तीचे ग्रहण करावे किंवा वृत्तियुक्त अंतःकरणाचे ग्रहण करा

बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु॥ प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय॥ २९॥

वें। प्रथम पक्षी ज्ञान पृथक् सागावे दुसरे पक्षी कर्ता पृथक सागून ये कारण वृत्ति युक्त अंतःकरणालाच कर्तृत्व आहे आणि ज्ञा न धृतीचे पृथक् कथन करण्यास नको। इच्छादिकाची व्यावृत्ति करण्यासाठी त्याचे पृथक् कथन केले असे संभवत नाही। वृत्तियुक्त अंतः करणाला त्रिविधत्व सांगितले म्हणजे सर्व अंतःकरण वृत्तीस त्रिविधत्व विवक्षित आहे यामुळे इच्छादिकाची व्यावृत्तिविव क्षित नाही अशी शंका एते तथापि अंतःकरण वृत्त्युपाधीने युक्त जो चिदाभास तो कर्ता। एथे त्या उपाधियुक्तापासून उपाधिनि राळा करून वृत्ति रूप उपाधिच करणत्वे करून विवक्षित आहे सर्वत्र करणोपहित च कर्ता आहे। जरी काम संकल्प विचिकि त्सा श्रद्धा अश्रद्धा धृति अधृति ह्री धी भी. या सर्व मनोवृत्ति मनोरूपच आहेत अशा अर्थाच्या श्रुतीत सागितलेल्या कामा दिक सर्व अंतःकरण वृत्तीस अंतःकरणाचे सत्वादिकाचे भेदाने त्रिविधत्व असल्या मुळे त्रिविधत्व आहे तथापि बुद्धि आ णि धृति याचे एथे कथन ज्ञान शक्ति आणि क्रिया शक्ति याचे उपलक्षणार्थ केले इच्छादिकाचे व्यावृत्ती साठी केले ना

हीं असें जाणावें ॥ २९॥ बुद्धीचें त्रैविध्य सांगत असतां प्रथम सात्विक बुद्धि सांगतात। प्रवृत्तिं-म्हणजे प्रवृत्ति मार्ग। निवृत्तिंच-आणि निवृत्ति मार्ग-म्हणजे सन्यास। कार्या कार्ये-आणि प्रवृत्ति मार्गाचे ठायीं कर्मानुष्ठान करणे असेजे कार्य आणि निवृत्ति मार्गाचे ठायीं कर्मानुष्ठान न करणे असेजे अकार्य। भयच अभय एवच-म्हणजे भय म्हणजे प्रवृत्ति मार्गाचे ठायी गर्भवासादिक दुःख आणि अभय म्हणजे निवृत्ति मार्गाचे ठायीं गर्भवासादिक दुःखाचा अभाव। बधमोक्षंच यो वेत्ति-म्हणजे आणि बंध म्हणजे प्रवृत्ति मार्गाचे ठायीं मिथ्या ज्ञानाने केलेला जो कर्तृत्वादिकाचा अभिमान आणि मोक्ष म्हणजे निवृत्तिमार्गाचे ठायी तत्व ज्ञानाने केलेले जे अज्ञान आणि त्याच्या कार्याचा अभाव याप्रत जी बुद्धि म्हणजे पूर्वी सांगीतले प्रमाणे करणावर कर्तृत्वाचा आरोप करून ज्या बुद्धीने जाणतो। पार्थ सा बुद्धिः सात्विकी-म्हणजे हे अर्जुना ती बुद्धि सात्विकी म्हणावी॥

प्रवृत्तिंच निवृत्तिंच कार्याकार्ये भयाभये॥ बंधमोक्षंच योवेत्तिबुद्धिः सा पार्थ सात्विकी॥ ३०॥

यया धर्ममधर्मंच कार्यंचाकार्यमेवच॥ अयथावत्प्रजानातिबुद्धिः सा पार्थ राजसी॥ ३१॥

अधर्मं धर्ममितिया मन्यते तमसावृता॥ सर्वार्थान्विपरीतांश्चबुद्धिः सा पार्थ तामसी॥ ३२॥

३०॥ आता राजस बुद्धि सांगतात। धर्मं अधर्मंच-शास्त्रविहित आणि शास्त्रनिषिद्ध असे जे अदृष्टार्थ उभय। कार्यंच अकार्यं एवच-म्हणजे कर्तव्य आणि अकर्तव्य दृष्टार्थ उभय। याप्रत-अयथावत् यया प्रजानाति-म्हणजे ज्या बुद्धीने यथावत्-म्हणजे यथार्थरूपाने जाणत नाही किंवा हा धर्म आहे किंवा नाही हे कर्तव्य आहे किंवा नाही हे अकर्तव्य आहे किंवा नाही असें संशययुक्त ज्या बुद्धीने पाहतो। पार्थ सा बुद्धिः राजसी-म्हणजे हे पार्था ती बुद्धि राजसी म्हणावी॥ ३१॥ आता तामस बुद्धि सांगतात। तमसा आवृता या बुद्धिः-म्हणजे विशेषदर्शनाचा विरोधी जो तमोगुण रूप दोष तेणे करून आवृत झालेली जी बुद्धि। अधर्मं धर्ममिति मन्यते-म्हणजे अधर्माला धर्म असे मानिते। जा बुद्धीने युक्त पुरुष अधर्माला धर्म असें मानितो हे उपलक्षण करून धर्माला अधर्म असें मानितो असे समजावें-आणि सर्वार्थान् विपरीतान् मन्यते-आणि याप्रमाणे सर्व-

ज्ञेय पदार्थ दृष्टार्थ किंवा अदृष्टार्थ त्यांप्रत विपरीत म्हणजे उलटे पाहतो किंवा मानितो। पार्थ सा बुद्धि. तामसी - म्हणजे हे अर्जुना ती बुद्धि तामसी म्हणावी ॥ ३२ ॥ आता तीन श्लोकांनी धृतीचे त्रिविधत्व सांगत असतां सात्त्विक धृति सांगतात। योगेन अव्यभिचारिण्या यया धृत्या - म्हणजे चित्तैकाग्र्यतात्मक समाधिरूप जो योग त्याला सोडून न राहणारी अशी जी धृति म्हणजे प्रयत्न तेणे करून। मन प्राणेंद्रियक्रिया धारयते - म्हणजे मन प्राण इंद्रिये यांचे जे चेष्टात्मक व्यापार त्यांप्रत धारण करतो - म्हणजे शास्त्रविरुद्ध प्रवृत्तीपासून आवरून घेतो। जो प्रयत्न झाला म्हणजे मन प्राण इंद्रियांचे व्यापार शास्त्रविरुद्ध विषयाकडे होत नाही किंवा मनाधीनच होतो असे तात्पर्य। पार्थ सा धृतिः सात्त्विकी - म्हणजे हे अर्जुना ती धृति सात्त्विक म्हणावी॥ ३३॥ आता राजस धृति सांगतात। प्रसंगेन फलाकांक्षी सन् - म्हणजे कर्म कर्तृत्वाच्या अभिमानाने फळेच्छा क-

धृत्या यया धारयते मनः प्राणेंद्रियक्रियाः ॥ योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी॥३३॥

यया तु धर्मकामार्थान् धृत्या धारयतेऽर्जुन ॥ प्रसंगेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥ ३४॥

यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च॥ न विमुंचति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ ३५॥

रणारा होत्साता। यया धर्मकामार्थान धारयते - म्हणजे ज्या धृतीने धर्म अर्थ काम यांप्रत धारण करतो - म्हणजे यांचे अनुष्ठान निरंतर करावे असे मनांत आणतो। तु शब्दाने मोक्षाचे साधनाचे अनुष्ठान करावे असे मनांत आणित नाही असे सुचविले॥ पार्थ सा धृतिः राजसी - म्हणजे हे अर्जुना ती धृति राजसी म्हणावी॥ ३४॥ आता तामसी धृति सांगतात। यया - ज्या धृतीने। स्वप्न - निद्राप्रत। भय - त्रासाप्रत। शोक - इष्टवियोगाने झाला त्यामुळे होणारा त्या संतापाप्रत। विषाद - खिन्नतेप्रत। मदमेव च - आणि - शास्त्रनिषिद्ध विषयांचे सेवनाने विवशाकित्वतेप्रत। दुर्मेधा. न मुंचति - म्हणजे विवेकासमर्थ ज्याची कुत्सित बुद्धि आहे असा पुरुष सोडीत नाही। सर्वकाल पूर्वोक्त स्वप्नादिकांप्रत कर्तव्यत्वे करून च मानितो। पार्थ सा धृतिः तामसी - म्हणजे हे अर्जुना ती धृति तामस म्हणावी॥ ३५॥ ॥ श्री कृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्री नारायणार्पणमस्तु ॥ ॥

याप्रमाणें क्रियांचे आणि कारकाचे सत्वादिक गुणाचे योगाने त्रिविधत्व सांगून त्यांचे फळजे सुख त्याचें त्रिविधत्व सांगण्या-
ची प्रतिज्ञा श्लोकाचे अर्धाने करतात। हे भरतर्षभ-इदानी त्रिविधं सुखं मे शृणु-म्हणजे हे भरत वंशांत श्रेष्ठा अर्जुनाआ-
तां माझे वाक्येंकरून त्रिविध सुखाप्रत ग्राह्य कोणते त्याज्य कोणतें याविषयीचा विवेक होण्याकरतां श्रवण कर। श्रवण
करण्यास विषयांतरा कडील मन काढून सावधानचित्त हो। दीड श्लोकानें सात्विक सुख सांगतात। यत्र अभ्यासात् रमते-म्हणजे
ज्या समाधि सुखाचे ठायीं अतिपरिचय रूपजो अभ्यास तेणे करून तृप्त होतो। विषय सुखाप्रमाणे तत्काळ तृप्त होतनाही।
आणि दुःखांतं च निगच्छति-म्हणजे ज्या सुखाचे ठायी रममाण झाला हो सातां सर्व दुःखांचा जो नाश त्याप्रत पावतो किंवा-
अनुभवितां विषय सुखाप्रमाणें अंती म्हणजे शेवटीं मोठ्याप्रत अनुभवीत नाहीं॥३६॥ तेंच स्पष्ट करून दाखवितात।
यत् अग्रे विषमिव-म्हणजे जे सुख ज्ञान वैराग्य समाधीच्या साधनानुष्ठानाचे आरंभीं फार आयास होऊन होतें या-

सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ॥अभ्यासाद्रमते यत्र दुःखांतं च निगच्छति॥३६॥
यत्तदग्रे विषमिव परिणामे मृतोपमं॥ तत्सुखं सात्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजं॥३७॥

मुळें विषाप्रमाणे दुःखरूप वाटतें। परंतु परिणामे अमृतोपमं-म्हणजे ज्ञानवैराग्य समाधीचा परिपाक झाला म्हणजे अ-
मृताप्रमाणें निरतिशय प्रीतीचें आस्पद होतें। आणि आत्मबुद्धिप्रसादजं-म्हणजे आत्माकारजी अंतःकरणाची वृत्ति
तिचा जो प्रसाद म्हणजे निद्रालस्यादिकाचे रहितत्वामुळे स्वच्छत्वे करून स्थिति तीपासून उत्पन्न झालेले राजससुख
प्रमाणे विषयाचे आणि इंद्रियाचे संबंधापासून जे झालेलें नव्हे। आणि जें निद्रा किंवा आलस्यापासून झालेलें नव्हे।
तत्सुखं सात्विकं प्रोक्तं-म्हणजे असेजें अनात्म्याकडील मनाची वृत्ति नाहीशी होऊन सुख स्वरूप आत्माकार अंतः-
करण वृत्तीचे प्रसादापासून झालेले सुख ते सात्विक सुख असें योग्यानी म्हटलेंआहे। आवृत्ति करून ज्या सुखाचे ठा-
यीं रममाण होतो ज्याचे ठायी दुःखाचे अवसानाप्रत पावतो तें गुणभेदाने त्रिविध सुख माझे वाक्या वरून ऐक असा-अ

भ्यासाद्रमते - याचा अन्वय। यत्तदग्रे - याश्लोकानें सात्विक सुखाचें लक्षण सांगितलें अशी कोणी व्याख्या करतात॥ ३७॥ आ
तां राजस सुख सांगतात। विषयेंद्रिय संयोगात् जातं यत् - म्हणजे जे विषय आणि इंद्रियांचे संयोगानें उत्पन्न होतें असें जें अ-
ति प्रसिद्ध स्त्री चंदन पुष्प माला दिक विषयांच्या आणि इंद्रियांच्या संबंधापासून उत्पन्न होणारें। अग्रे अमृतोपमं - म्हण-
जे मनाचा निग्रह करणें इत्यादिक क्लेश नसल्यामुळें आरंभीं मात्र अमृता प्रमाणें गोड। परंतु परिणामे विषमिव - म्हण
जे शेवटीं विषय वियोग किंवा नाश अवश्य होणारा आहे यामुळें ऐहिक किंवा पारलौकिक दुःख देणारें विषा प्रमाणें-
च आहे। असें जें सुख - तत् सुखं राजसं प्रोक्तं - म्हणजे तें राजस सुख असें योग्यानीं म्हटलें आहे॥ ३८॥ आतां ताम
स सुख सांगतात। यत् अग्रे च अनुबंधे आत्मनः मोहनं - म्हणजे आरंभीं आणि परिणामीं आत्म्यास मोह करणारें। आणि निद्रा-

विषयेंद्रियसंयोगात् यत्तदग्रेऽमृतोपमं॥ परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतं॥ ३८॥
यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः॥ निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतं॥ ३९॥
नतदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः॥ सत्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात् त्रिभिर्गुणैः॥ ४०॥

लस्य प्रमादोत्थं - म्हणजे निद्रा आणि आलस्य आणि प्रमाद म्हणजे कर्तव्याचा निश्चय न होतां केवळ मनोराज्य मात्र त्यापासू
न उत्पन्न होतें। सात्विक सुखा प्रमाणें बुद्धीचे प्रसादापासून उत्पन्न होत नाहीं आणि राजस सुखा प्रमाणें विषयेंद्रिय संयोगा
पासून उत्पन्न होत नाहीं असें जें सुख तें तामस सुख असें योग्यानीं म्हटलें आहे॥ ३९॥ आतां न सांगीतलेल्याचा संग्रह कर
न भगवान् प्रकरणाची समाप्ति करतात। प्रकृतिजैः एभिः त्रिभिः गुणैः मुक्तं - म्हणजे सत्वादिक गुणांची जी साम्यावस्था
ती प्रकृति तीपासून उत्पन्न झालेले म्हणजे विषमावस्थेप्रत पावले जे हे तीन सत्व रज तमोगुण। प्रकृति गुण त्रय रूपच आ
हे यामुळें गुण प्रकृतीपासून उत्पन्न झाले असा मुख्यार्थ संभवत नाहीं यास्तव गुणांची विषमावस्था उत्पन्न होते त्या वस्था
त्या अवस्थेनें युक्त गुण प्रकृतीपासून उत्पन्न होतात असा गौण अर्थ इथें केला। अथवा प्रकृति म्हणजे माया तीपासून मा

लेले म्हणजे त्या मायेने कल्पिलेले जेहे बंधकरणारे तीन सत्वरज तमो गुण त्यांहीं मुक्त म्हणजे गुणत्रय रहित। यत्स्यात्
तत्-म्हणजे जे होईल असे। सत्वं-म्हणजे प्राणि किंवा अप्राणि असे अनात्मवस्तु। पृथिव्यांवा दिविपुनः देवेषु नास्ति-म्हण
जे पृथिवीचे ठायीं मनुष्यादिकांत आणि स्वर्गाचे ठायीं आणि देवादिकांत कोठेही नाहीं॥ ४०॥ याप्रमाणे सत्वरजतमोगुणा
त्मक क्रिया कारक फलरूप संसार सर्वही मिथ्या अज्ञानकल्पित केलेला अनर्थास हेतु म्हणोन चतुर्दशाध्यायांत सांगितलेल्या
चें निरूपणाची समाप्ति केली। पंचदशाध्यायाचे ठायीं त्या संसारास वृक्षरूपाची कल्पना करून तो वृक्ष रूपाने वर्णून-
अश्वत्थमेनं सुविरूढमूल मसंगशस्त्रेण दृढेन छित्वा॥ ततः पदं तत् परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः-या श्लोका
ने-विषयवैराग्यरूप दृढ असंग शस्त्राने त्या संसार वृक्षाचा छेद करून परमात्म्याचा शोध करावा असे सांगितलें। सर्व त्रि
गुणात्मक असलें तरीं त्रिगुणात्मक वृक्षाचा छेद कसा होईल असंग शस्त्राचा असंभवच आहे अशी शंका आली तर तिचें

**ब्राम्हण क्षत्रिय विशां शूद्राणाञ्च परंतप॥ कर्माणि प्रविभक्तानि स्वभाव प्रभवैर्गुणैः॥ ४१॥**

निराकरण करण्यासाठीं आप आपले अधिकारा प्रमाणें शास्त्रविहित जे वर्णाश्रम धर्म त्यांचे अनुष्ठानानें संतोषाप्रत पा
वविलेला जो परमेश्वर त्याचे प्रसादापासून असंग शस्त्राचा लाभ होतो असे सांगण्यासाठीं इतकाच वेदार्थ आहे त्याचे अ
नुष्ठान परम पुरुषार्थ जो मोक्ष त्याची इच्छा करणाऱ्यानीं करावें। असें सांगून गीताशास्त्रार्थाची समाप्ति करावी यासाठीं
पुढील ग्रंथाचा आरंभ करतात। त्याविषयीं हा श्लोक सूत्रभूत सांगतात। हे परंतप ब्राम्हण क्षत्रिय विशां-हे शत्रूंस ताप
देणाऱ्या अर्जुना-ब्राम्हण क्षत्रिय वैश्य। आणि शूद्राणां-म्हणजे शूद्र या वर्णांची। कर्माणि म्हणजे पुढें सांगावयाचीं क
र्में स्वभाव प्रभवैः गुणैः विभक्तानि-म्हणजे ब्राम्हण्यादिक स्वभाव प्राप्त होण्यास कारणभूत जे सत्वादिक गुण त्यांहीं-
करून परस्पर विभागाने म्हणजे ब्राम्हणांचें हे कर्म क्षत्रियांचे हें कर्म वैश्यांचे हें कर्म शूद्रांचें हें कर्म अशा व्यवस्थेनें
युक्त आहेत। तें असें-ब्राम्हणस्वभावाचा शांतत्वास्तव सत्वगुणच कारण आहे। क्षत्रिय स्वभावाचा प्रभुत्व शक्तित्वास्त

व किंवा शासन शक्तिरूप त्व सत्वगुण अंगभूत आहे त्यास असा रजोगुण तोच हेतु आहे। वैश्य स्वभावाच्या इच्छास्वभा यत्या त्व तमो गुण आहे अंगभूत त्याला असा रजो गुणच कारण आहे। शूद्र स्वभावास मूढत्वात्व रजो गुण आहे अंग भूत ज्याला असा तमो गुणच कारण आहे। एथ ब्राम्हण क्षत्रिय विशांच्या एका समास युक्त पदांत ब्राम्हण क्षत्रिय आणि वैश्य याति यांचे ग्रहण जें केलें तें तिघांस द्विजत्वामुळे वेदाध्ययनादिक धर्म तुल्य आहेत असे कळविण्या करता केलें। शूद्राचें पृथक् निराळे पदानें जे ग्रहण केले ते शूद्रास एक जातित्वामुळे वेदाध्ययनाचा अधिकार नाहीं असे सूचन करण्या करता केलें यास प्रमाण। ब्राम्हण क्षत्रिय वैश्य शूद्र हे चार वर्ण त्यात ब्राम्हण क्षत्रिय वैश्य तीन वर्ण द्विजाति - म्हणजे त्यांचें मातेपासून एक जन्म होतें आणि दुसरे मौंजीबंधनानें होतें। दुसरे जे जन्म होतें त्यास माता सावित्री म्हणजे गायत्री आहे-आणि पिता गायत्रीचा उपदेश करणारा आचार्य आहे। परमेश्वरानें गायत्री छंदानें ब्राम्हणाची उत्पत्ति केली। त्रिष्टुप छंदानें क्षत्रियांची उत्पत्ति केली। जगती छंदानें वैश्याची उत्पत्ति केली। शूद्राची कोणते ही छंदानें उत्पत्ति केली नाहीं यास्तव शूद्रास संस्कार नाहीं। शूद्र चवथा वर्ण एक जाति आहे अशा अर्थाच्या वसिष्ठ गोतमादिकांच्या स्मृति आणि द्विजातिपदांचा-अर्थ सांगणारें निरुक्त आहे। अथवा। स्वभाव प्रभवैर्गुणैः कर्माणि प्रविभक्तानि- यांची दुसरी व्याख्या अशी आहे। स्वभाव म्हणजे मायाख्य प्रकृतिरूप उपादान कारण त्यापासून आहे प्रभव म्हणजे उत्पत्ति ज्यांची किंवा प्राक् जन्मीं केलेले कर्माचा जो याजन्मीं फल देण्यासाठीं अभिव्यक्त झालेला संस्कार तो स्वभाव तो आहे ज्यांचे उत्पत्तीस निमित्त कारण असे जे गुण त्याहीं करून ब्राम्हणादिक चार वर्णांची कर्में प्रविभक्त आहेत असा पूर्वोक्त च अर्थ। कर्मांची पूर्वोक्त व्यवस्था करणारें शास्त्र ही व्यवस्था करण्यास स्वभावांची अपेक्षा करतें यास्तव शास्त्रानें व्यवस्था केलेलीं कर्में ही गुणानीं व्यवस्था केलेलीं असे म्हटले। अर्थ बोधन करणारे जे शब्द त्यांस अर्थबोधन करण्यास अधिकारी शक्ति सहकारी आहे असा न्याय याविषयी प्रमाण आहे। ती व्यवस्था कशी शास्त्रांत केली आहे तिचें ज्ञान होण्या

साठीं संक्षेपानें एथें लिहितों। गोतमस्मृतींत द्विजातीस म्हणजे ब्राम्हण क्षत्रिय वैश्य या तीन वर्णास वेदाध्ययन करणें यज्ञ करणें दानकरणें हीं तीन कर्में ब्राम्हणास अध्यापन करणें म्हणजे पढविणें याजन म्हणजे दुसऱ्याचे यज्ञांत ऋत्विक् होऊन त्यापासून यज्ञ करविणें प्रतिग्रह करणें म्हणजे दान घेणें हीं तीन कर्में क्षत्रिय वैश्यापेक्षां अधिक आहेत। यास हा कर्मातील पहिलीं अध्ययन यज्ञ दान हीं तीन कर्में ब्राम्हणानीं अवश्य केलीं पाहिजेत। अध्यापन याजन प्रतिग्रह हीं तीन कर्में ब्राम्हणास उपजीवनार्थ आहेत हीं केलींच पाहिजेत असा नियम नाहीं। क्षत्रियांस प्रजेचें किंवा सर्व भूतांचें रक्षण करणें आणि यथा न्याय दंड करणें हें ब्राम्हण वैश्यापेक्षां अधिक कर्म आहे। वैश्यांस कृषिकर्म करणें वाणिज्य म्हणजे धन वृद्धीसाठीं व्यापार करणें पशूंचें पालन करणें हें ब्राम्हणक्षत्रियांपेक्षां अधिक कर्म आहे। चवथा वर्ण शूद्र तो एकजाति त्यास सत्य अक्रोध शौच आचमन करण्यासाठीं हस्तपादांचें मात्र प्रक्षालन। श्राद्धकर्म भृत्यांचें भरण म्हणजे पोषण करणें आपले विवाहित स्त्री शीं रत असणें ब्राम्हणक्षत्रिय वैश्य या तीन वर्णांची सेवा करणें हें साधारण आणि असा साधारण धर्म असे सांगितलें आहे। वसिष्ठस्मृतींत ही याप्रमाणेंच ब्राम्हणास वेदाध्ययनादिक साहा कर्में क्षत्रियवैश्यांस प्रथम तीन कर्में ब्राम्हणास अध्यापनादिक पुढील तीन कर्में उपजीवनार्थ आहेत क्षत्रियास शस्त्रानें प्रजापालन करून जीवन करणें वैश्यांस कृषिवाणिज्य पशुपालन करून जीवन करणें। शूद्रांस ब्राम्हणादिक तीन वर्णांची सेवा करणें अशी कर्मांची व्यवस्था सांगितली आहे। आपस्तंबस्मृतींत ही ब्राम्हण क्षत्रिय वैश्य शूद्र हे चार वर्ण। यांत पहिला पहिल्या जन्मेंकरूनच दुसऱ्यापेक्षां श्रेष्ठ आहे वेदाध्ययनादिक साहा कर्में ब्राम्हणाचीं। क्षत्रियांचीं अध्यापनादिक तीन सोडून वेदाध्ययनादिक तीन आणि दंड युद्धादिक हीं कर्में। वैश्यास दंडयुद्धादिक सोडून वेदाध्ययनादिक तीन कर्में आणि कृषि गायी आदिक पशूंचें रक्षण आणि वाणिज्य हीं कर्में। ब्राम्हणादिक तीन वर्णांची सेवा करणें हें शूद्राचें कर्म असें सांगितलें आहे। याप्रमाणेंच मनुस्मृति आदिकांत सांगितलें आहे॥ ४१॥ ⁂ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥

आतां ब्राम्हणाचीं स्वाभाविकगुणकृत कर्मे सांगतात। शम. - अंत:करणाचा उपरम। दमः - बाह्येंद्रियांचा उपरम। तपः - देवद्वि जगुरुप्राज्ञ इत्यादिक श्लोकानी सांगीतलेलें शारीरादिकतप। शौच - बाह्य आंतर असें दोन प्रकारचें पूर्वी सांगीतलेंच आहे। क्षां ति - क्षमा पूर्वी सांगितली। आर्जवं - कुटिलभावनसणं। ज्ञानं - सांगवेदार्थाचें ज्ञान। विज्ञान - कर्मकांडांतील यज्ञादिका चे अनुष्ठानाविषयीचें कुशलत्व। ब्रम्हकांडाचे ठायीं ब्रम्हात्मैक्यानुभव। आस्तिक्यं - सात्विकीश्रद्धा। हे शमादिक नव। ब्रम्ह कर्म स्वभावजं - सत्वगुणाचे स्वभावानें केलेलें ब्राम्हणजातीचें कर्म। जरी हे नऊ शमादिक धर्म चार वर्णांसही सात्विकाव स्थेचे ठायीं संभवतात। तथापि बहुतकरून हे धर्म ब्राम्हणजातीचे ठायीं असतात। कारण ब्राम्हणांचा सतत्स्वभाव आहे म्हणून सत्वाचा उद्रेक म्हणजे सत्वगुण जेव्हां दृढ प्रत पावतो तेव्हां दुसरे वर्णांचे ठायीं ही हे संभवतात परंतु कदाचित् संभव तात। याच तात्पर्यानें शास्त्रांतराचे ठायीं हे धर्म साधारण आहेत असें सांगीतलें आहे। ते असें - विष्णुस्मृतींत - क्षमा सत्यं द

शमो दमःस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेवच॥ ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रम्हकर्म स्वभावजं॥ ४२॥

मः शौचं दानमिंद्रियसंयमः॥ अहिंसा गुरुशुश्रूषा तीर्थानुसरण दया॥ आर्जवं लोभशून्यत्वं देवब्राम्हणपूजनं॥ अन भ्यसूया न्यतथा धर्म. सामान्य उच्यते - हे धर्म सामान्य म्हणजे चारी वर्णांचे प्रायः चार आश्रमांचे साधारण आहेत अ सें सांगीतलें आहे। बृहस्पतिस्मृतींत ही - दया क्षमान सूयाच शौचानायासमंगलं॥ अकार्पण्यमस्पृहत्वं सर्वसाधारणानि च। एणेकरून दयादिक सर्व साधारणधर्म असें सांगितलें आहे। या दयादिकांची लक्षणें सांगितली आहेत ती एथे लिहि तों। पर किंवा बंधुवर्ग किंवा मित्र किंवा द्वेष करणारा आपत्तीने युक्त झाला असतां त्याचें रक्षण करणें यास दया असें म्हण तात। बाह्य किंवा आध्यात्मिक दुःख उत्पन्न झालें असतां कोप करीत नाहीं किंवा मारीत नाहीं तीस क्षमा असें म्हणता त। जो गुणी आहे त्याचे गुणांचा अपलाप करीत नाही अल्पगुणी असला तरी त्याचे गुणाची स्तुति करतो दुसऱ्याचे दोषांक डे प्रीति नाहीं तिला अनसूया म्हणतात। अभक्ष्याचे भक्षण न करणें। जे निर्गुण आहेत त्यांशीं संसर्ग न करणें स्वधर्माचे-

ठार्यी राहणें यास शौच असें म्हणतात। जें चांगलें आहे परंतु त्याचे अनुष्ठानानें शरीरास फार पीडा होते त्याकर्माचें अनुष्ठान नकरणें त्यास अनायास म्हणतात। ते प्रशस्त असेल त्याचें आचरण करणें जें प्रशस्त नसेल त्याचें वर्जन करणें त्यास तत्त्वदर्शी मुनींनी मंगल असें म्हटलें आहे। आपल्या पाशीं स्वल्प जरीं असलें तरी दीनाचे मनन करून त्यांतून ही कांहीं थोडेंसें ही प्रत्यही दान करणें यास अकार्पण्य म्हणतात। जें मिळेल त्यावरून संतोष पावणें आणि दुसऱ्याचे अर्थावर इच्छा न ठेवणें त्यास अस्पृहा म्हणावे॥ हे च आठ आत्म्याचे गुण असे गोतमस्मृतींत सांगीतलें आहे। महाभारतांत ही—सत्यं दमः तपः शौचं संतोषो ह्रीः क्षमार्जवं॥ ज्ञानं शमो दया ध्यानमेष धर्मः सनातनः—सर्व भूतांचें हित करणें त्यास सत्य म्हणावे। मनाचा निग्रह करणें त्यास दम म्हणावें। स्वधर्म करण्यास तत्पर असणें यास तप म्हणावे। संकर न करणें त्यास शौच म्हणावे। विषयांचा त्याग करणें यास संतोष म्हणावें। अधर्मापासून निवृत्त होणें यास ह्री. असे म्हणावे। शीतोष्णादिक द्वंद्वाचें सहन करणें यास क्ष

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनं॥ दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजं॥ ४३॥**

मा म्हणावे। समचित्तता असणें त्यास आर्जव म्हणावें। तत्त्वार्थाचा उत्तम जो बोध त्यास ज्ञान म्हणावे। चित्ताची जी शांतता त्यास शम म्हणावें। भूतांचें हित करण्याची जी इच्छा तीस दया म्हणावे। मन निर्विषय करणें यास ध्यान म्हणावे। देवल स्मृतींत ही—शौचं दानं तपः श्रद्धा गुरुसेवा दया क्षमा॥ विज्ञानं विनयः सत्यमिति धर्मसमुच्चयः—व्रत उपवास नियमादिक करून शरीरास ताप करणें तें तप। धर्म कार्याचे ठायीं जी बुद्धि ती श्रद्धा। त्यास श्रद्धा नाही त्याचें कर्म निष्फळ आहे। लौकांतील किंवा वेदशास्त्रांतील सकल विद्यांचें धारण करणें तें विज्ञान। निरंतर जे शम आणि दम यांस विनय असें म्हटलें आहे। याज्ञवल्क्य स्मृतींत ही—इज्या-म्हणजे यज्ञ। आचार-दम-अहिंसा-दान-वेदाध्ययन-या कर्मा मध्यें योगाभ्यासानें आत्मसाक्षात्कार होणें हा उत्कृष्ट धर्म आहे। ही सर्व देवी संपत्ति ब्राह्मणास स्वाभाविक आणि दुसऱ्यास नैमित्तिक आहे यास्तव विरोध नाही॥ ४२॥ शौर्यं—म्हणजे जो फार बलिष्ठ असेल त्यास ही मारण्याची प्रवृत्ति जीस विक्रमअ

सहों म्हणतात। तेजः-म्हणजे दुसऱ्याचे कडून अवमान होऊनये अशी प्रगल्भता। धृति-म्हणजे मोठी विपत्ति प्राप्त झाली तरीं शरीर इंद्रियें यांचे पतन न होण्याचा प्रयत्न। दाक्ष्य-म्हणजे अकस्मात उपस्थित झाले ते कार्याचे ठायीं व्यामोह न होतां प्रवृत्ति होणे। युद्धेच अपलायन-म्हणजे युद्धाचे ठायीं परा ङ्मुख न होणे। दानं-म्हणजे संकोचन करतां द्रव्याचें दान करणें। ईश्वरभावः-म्हणजे प्रजापालन करण्यासाठीं त्यांचे नियमन करावयाचे आहे-यांविषयींची प्रभुशक्ति। क्षात्र कर्म स्वभावज-म्हणजे हे क्षत्रिय जातीस विहित कर्म पूर्वोक्त क्षत्रियस्वभावापासून उत्पन्न होणारे आहे। अन्न किंवा धान्य उत्पन्न होण्यासाठीं भूमि नांगरणें पेरणें इत्यादिक कर्म कृषि। गायी आदिक पशूंचें पालन हें गोरक्ष्यं। वाणिज्यं-म्हणजे द्रव्य वृध्यर्थ व्यापार करणें। क्रयविक्रयादिक करणें। हे वैश्य जातीचे पूर्वोक्त वैश्यस्वभावापासून होणारे कर्म आहे। परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्य स्वभावजं-म्हणजे ब्राम्हणादिक तीन वर्णांची सेवा करणे हे शूद्र जातीचे पूर्वोक्त शूद्रस्वभावापासून उत्पन्न होणारे कर्म आहे। याप्रमाणे हे चार वर्णांचे गौण म्हणजे सत्वादिक गुणामुळें होणारे धर्म सांगितले, याशिवाय हो यांचे दुसरे धर्मशास्त्रांत सांगितले आहेत। भविष्य पुराणांत-श्रेय म्हणजे कल्याणास साधन आणि पापाला उत्पन्न करणारा जो त्यास धर्म म्हणावे। तो अभ्युदय फल आहे। म्हणजे स्वर्गादि लोकी सुखानुभव होण्यास साधन आहे। त्या धर्मास मूळ वेद आहे आणि तो शाश्वत आहे। वर्ण धर्म १ आश्रम धर्म २ वर्णाश्रम धर्म ३ गौण धर्म ४ नैमित्तिक धर्म ५ या भेदानीं तो धर्म पांच प्रकारचा आहे। एके वर्णत्व मात्राचा आश्रय करून जो धर्म प्रवृत्त होतो तो वर्ण धर्म जसे उपनयन। जो आश्रमाचा आश्रय करून धर्म प्रवृत्त होतो तो आश्रम धर्म जसा भिक्षा मेखला दंड धारण इत्यादि। वर्ण आणि आश्रम या दोहोंचे आश्रयाने जो धर्म प्रवृत्त होतो तो वर्णाश्रमधर्म जसा मौंजी मेखला म्हणजे मुंजा याना वाच्या तृणाची मेखला ब्राम्हणास बांधावी धनुर्ज्या क्षत्रियास बांधावी-मौर्वी वैश्यास बांधावी-ब्राम्हणास बेलाचा किंवा पलाशाचा क्षत्रियांस वडाचा किंवा खदिराचा वैश्यास पिंपळाचा किंवा उंबराचा दंड ब्राम्हणास एण मृगाचे क्षत्रियास रुरु मृगाचे वैश्यास बोकडाचे अजिन म्हणजे चर्म इत्यादिक-

जा गुणाचे योगानें प्रवृत्त होतो तो गौण धर्म जसा जो मूर्धाभिषिक्त आहे म्हणजे ज्यास राज्याभिषेक झाला आहे त्या गुणानें रक्ष
णें प्रजापालन करणें हा धर्म। पापरूप निमित्त झाल्यामुळें जें प्रायश्चित्त करणें हा नैमित्तिक धर्म। महाभारतांत - अनृशंस्यम
हिंसा च प्रमादः संविभागिता॥ श्राद्धकर्मातिथेयं च सत्यमक्रोध एव च॥ स्वेषु दारेषु संतोषः शौचं नित्यानुसूयता। आत्मज्ञानं
तितिक्षा च धर्मः साधारणो नृप। असा हा सर्व ब्राम्हणादिक चारवर्णांचा साधारण धर्म सांगितला आहे। ब्रम्हचारी गृहस्थ वा
नप्रस्थ संन्यास असे हे चार आश्रम यांचे साधारण धर्म पूर्वी भविष्यपुराणांत सांगीतले ते लिहिलेच आहेत। आणि प्रत्ये
क वर्णांचे आणि आश्रमांचे असाधारण धर्म षोडशाध्यायांत - अभयं सत्वसंशुद्धिः - यास आरंभ करून - नातिमानिता - य
थ पर्यंत अडीच श्लोकानीं सांगीतलेच आहेत। त्यांचे सविस्तरें करून व्याख्यान त्या श्लोकांचें व्याख्यानांत केलें आहेच।
वसिष्ठ आपस्तंब गौतम मनु आदिकांचे स्मृतींत - ब्रम्हचारी गृहस्थ वानप्रस्थ परिव्राजक म्हणजे सन्यासी हे चार आ

कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजं॥ परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजं॥ ४४॥

श्रम। त्यांमध्यें ब्रम्हचारिव्रताचा त्याग न करतां एक वेद किंवा दोन वेद किंवा बहूत वेदांचे अध्ययन करून नंतर दुस
ऱ्या ज्या आश्रमांत जाण्याची इच्छा असेल त्या आश्रमाचा स्वीकार करावा असें सांगून चारी आश्रमांचे पृथक् पृथ
क् पूर्वोक्तच धर्म सांगितले आहेत आणि हारितादिक स्मृतींत नैष्ठिक ब्रम्हचारी असा एक ब्रम्हचाऱ्यांत भेद सांगीत
ला आहे। तसाच यायावर म्हणून एक गृहस्थाश्रमांत भेद सांगीतला आहे। तसाच अनुज्ञापिक म्हणोन एक वानप्र-
स्थाश्रमांत भेद सांगीतला आहे। तसाच चातुराश्रम्यसिद्ध म्हणोन एक सन्यासाश्रमांत भेद सांगितला आहे आणि त्या
विशेष आश्रमाचें विशेष धर्म ही सांगीतले आहेत। आणि पूर्वोक्त वर्णाश्रमोचित सांगीतलेले धर्मानुष्टानांची फलें ही
स्मृतींत सांगितलीं आहेत त्याचा संक्षेप लिहितों। श्रुति आणि स्मृति यांत सांगीतलेले धर्मांचें अनुष्ठान करणारा मनु-
ष्य या लोकीं कीर्तीप्रत पावतो आणि मरणोत्तर उत्कृष्ट सुखाप्रत पावतो असें मनुस्मृतींत सांगीतले आहे। सर्व वर्णां-

स स्वधर्मानुष्ठानानें अपरिमित उत्कृष्ट सुख स्वर्गलोकीं होतें तें भोगल्यावर तेथून शेष कर्मानें यालोकीं जन्म होऊन त्यांत जाति-रूप-वर्ण-बल-वृत्त-मेधा-प्रज्ञा-द्रव्य-धर्मानुष्ठान-हीं फलें प्राप्त होतात। असें आपस्तंब स्मृतीत सांगीतलें आहे। वर्ण आणि-आश्रम-स्वकर्मनिष्ठ होत्साता-मरणानंतर कर्मफलाचा अनुभव स्वर्गलोकीं करून-नंतर [illegible] कर्मानें चांगले देशीं चांगले जा-तींत चांगले कुळांत चांगलें रूप चांगलें आयुष्य चांगले अध्ययन चांगलें आचरण चांगलें वित्त म्हणजे द्रव्य चांगलें सुख चांग-ली मेधा ज्यास आहे असे जन्मास एतात। जे विपरीत म्हणजे स्वधर्मानुष्ठान सोडून यथेष्ट व्यापार करणारे पूर्वोक्ताहून विपरी-त-ते नरकांचे ठायीं कृमिकीटादिकांचे जन्मास येऊन सर्व पुरुषार्थापासून भ्रष्ट होतात। असें येथें मन स्मृतींत सांगीतलें-आहे। ब्रम्हसूत्रात तृतीया ध्यायाचे ठायी प्रथम पादात श्रीवेदव्यासानीं-प्राणोपाधिक जीव मरणानंतर यालोकीं केले-ले कर्माचे फलोपभोगासाठीं परलोकीं गमन करते वेळेस परलोकी उपभोगासाठीं उत्पन्न होणाऱ्या शरीरास बीजभूत जीं-भूत सूक्ष्में तीं ही करून वेष्टित गमन करतो असें सांगून स्वर्गास कर्मफलोपभोगासाठीं गेलेला जीव स्वर्गफलार्थ केलेले क-र्माचा फलोपभोग करून ब्रम्हवर्चस कामानें सूर्य देवतो देशे करून चरूनें होम करावा। ज्यांस पशूची इच्छा आहे त्यांनी चित्रा यानावाचे इष्टीनें यजन करावें। अशीं जी प्रत्येक फलें यालोकची प्राप्त व्हावी यासाठीं केलेलीं शुभ कर्में त्यांचे फल-चें उपभोगासाठीं यालोकीं ब्राम्हण किंवा मनुष्य जन्म पावतात। तसेंच नरकप्रद दुष्टकर्म करणारे यमाचे लोकीं जाऊन नरकादिक यातनांचा अनुभव करून ब्रम्हहत्यादिक जीं नाना कीट पशू आदिक योनींत जन्म होण्यास साधनभूत क-र्में त्यांचे फलोपभोगासाठीं यालोकीं त्यात्या योनींत जन्मास एतात असे प्रतिपादन केलें आहे। तीं कर्में पूर्वोक्त स्मृतींतील शे-ष शब्दानें घ्यावीं। कोणी काम्य जीं यज्ञदान तपें त्याहीं करून स्वर्गादिक लोका प्रत पाऊन पुनः यालोकीं जन्मास एतात। जे काम्य कर्मानें रहित सत्य यज्ञ दानांहीं करून युक्त ते अक्षय लोकां प्रत जातात असा कामना आणि तिचा अभाव यामुळें फलभेद हारीत स्मृतींत सांगीतला आहे। भविष्यपुराणांत फलाशिवाय ही नित्य कर्मांचे अनुष्ठान स्पष्ट आहे। का

भिक्षाटनादिक करूं नये असें तात्पर्य। जर स्वधर्मास्तव युद्ध करावें तर बंधुवधानें पाप लागेल अशा शंकेचें निवारण करतात। स्वभावनियतं कर्म कुर्वन् किल्बिषं नाप्नोति–म्हणजे पूर्वोक्त जो शमोदमः तपः शौचं–शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं इत्यादिक स्वभाव त्यापासून उत्पन्न होणारें कर्म करणारा पापाप्रत पावत नाहीं। शास्त्र विधिविहित ज्योतिष्टोमाग भूत पशु हिंसानिमित्तक जसें पाप नाहीं त्याप्रमाणें क्षत्रियास शास्त्रविहित युद्धांतील बंधुवधनिमित्तक पाप नाहीं असें तात्पर्य॥ ४७॥ ज्या कारणास्तव शास्त्रविहित हिंसादिकास पापसाधनत्व नाहीं आणि परधर्म हा भयप्रद आहे आणि कोणतेंही कर्म केलें तरी त्याचे ठायीं सामान्य कांहींतरी दोष आहेच यास्तव हे कौंतेय हे अर्जुना सदोषं अपि सहजं कर्म न त्यजेत–म्हणजे आपलें शास्त्रविहित स्वभावज कर्म–ज्योतिष्टोम युद्धादिक हिंसादि दोषयुक्त असलें तरी तें अंतःकरणशुद्धी पूर्वी वर्णाश्रमाभिमान युक्त अज्ञान्यानीं टाकूं नये।–हि सर्वारंभाः धूमेन अग्निरिव दोषेण आवृताः–म्हणजे ज्या कारणास्तव जो आत्मवेत्ता नव्हे तो क्षणमात्रही कर्म केल्यावांचून राहण्यास समर्थ नाहीं आणि परधर्मानुष्ठानानें पापापासून मुक्त होत नाहीं कारण अग्नि जसा आपले बरोबर उत्पन्न झालेल्या धूमानें आवृत आहे त्याप्रमाणें सर्व स्वधर्म किंवा परधर्म त्रिगुणात्मक त्यास्तव सामान्य दोषानें आवृत आहेतच।

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्॥ स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषं॥ ४७॥

सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत्॥ सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः॥ ४८॥ ॥

यास्तव विषांतील कीट विषास जसा न सोडून विषांतच सहतो त्याप्रमाणें–अगत्या म्हणजे जो आत्मज्ञ नाही त्यांणी हिंसादि दोष युक्त जरी आपलें सहज कर्म असलें तरी सर्व कर्म त्यागास आपलें सामर्थ्य नाही याकारणामुळें त्याचा त्याग करूं नये। जो ज्ञानी सर्व कर्म त्याग करण्यास समर्थ आहे त्याणे त्याचा त्याग करावा असा अभिप्राय॥ ४८॥ ब्रम्हात्म वस्तूच नित्य सत्य आहे अनात्म वस्तु सर्व मिथ्या अनित्य आहे अशा नित्यानित्य वस्तु विवेकानें ज्यास या लोकचे उपभोगाविषयीं आणि परलोकचे उपभोगाविषयीं वैराग्य झालें आहे आणि कर्मानुष्ठानानें चित्ताचा मल जाऊन शमदमादि साधन संपन्न हो

रुन शुद्ध ब्रम्हात्मैक्य साक्षात्काराची इच्छा जास झाली आहे असा जो गुरुरूप मनी करून वेदांत वाक्य विचारसमर्थ मुमुक्षु ज्याचे उद्देशानें वेदांत विचारात्मक अथातो ब्रम्ह जिज्ञासा इत्यादिक चतुरा ध्यायी रूप ब्रम्ह मिमांसा प्रवृत्त झाली आहे तोच सर्व कर्म त्याग समर्थ आहे। त्याणे आपले इष्ट जे ब्रम्हात्मैक्य ज्ञान तत्साधन भूत वेदांतवाक्य विचार करण्यास विक्षेप करणारक र्मांच्या निवृत्ती साठीं श्रवणाग भूत कर्म सन्यास करावा असें श्रुति स्मृतींत सांगीतले आहे त्याचे स्वरूप सांगतात। सर्वत्र- असक्त बुद्धि.- म्हणजे स्त्रीपुत्रादिक जे आसक्ति करण्यास योग्य पदार्थ त्यासर्वांचे ठायी - हे माझे आणि मी यांचा अशीज्याची बुद्धि सक्त नाही। कारण - जितात्मा - म्हणजे विषया पासून आवरून वश ज्याणे मन केले आहे असा। आणि विगत स्पृह.- म्हणजे विषयाक डे मन जाण्यास कारण भूत विषयेच्छा ज्याची गेली आहे। अथवा देह भोगी जीवित याविषयी ही जो निरिच्छ अथवा सर्व दृश्यप दार्थांचे ठायीं नश्वरत्व मिथ्यात्व रूप दोष दर्शने आणि नित्यबोधानंद रूप मोक्षकरव रूप आत्मदर्शनें करून जो सर्वत्र विरक्त। आ

असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः॥ नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति॥ ४९॥

णि - स्वकर्मणा तमभ्यर्च्य - या श्लोकांत सांगीतलेले ज्ञाननिष्ठा योग्यतारूप सिद्धीप्रत पावलेला जो तो। सन्यासेन - म्हणजे शि खायज्ञोपवीतादि सर्व कर्म त्याग करून म्हणजे तत्पूर्वक वेदांतविचार करून। परमां - म्हणजे कर्मापासून उत्पन्न होणारीजी चित्त शुद्धि द्वारा ज्ञान योग्यता रूप अपर सिद्धि तिचीफल भूतजी - नैष्कर्म्य सिद्धि - म्हणजे निष्कर्म म्हणजे कर्म रहितजे ब्र म्हात्म तत्व तद्विषयक जे वेदांत वाक्य जन्य ज्ञान तें नैष्कर्म्य तद्रूप सिद्धि। तीप्रत अधिगच्छति - म्हणजे साधनपरिपाकानें पा वतो। अथवा - सन्यासेन - म्हणजे कार्यमित्येवयत्कर्म नियतं क्रियतेर्जुन। संगंत्यक्त्वा फलं चैव सत्यागः सात्विको मतः- या श्लोकात सांगीतलेला सात्विक कर्मफल त्याग रूप सन्यास तेणे करून। सर्वत्र असक्तबुद्धिः - इत्यादिक सांगीतलेले- अर्थाच्या विशेषणानी युक्त होऊन - परमां - पूर्वोक्त अमुख्य त्यागापेक्षां श्रेष्ठ अशीजी - नैष्कर्म्य सिद्धि - स्वरूपतः कर्मत्या गरूप सिद्धि जीस पारम हंस्य म्हणतात अशा ब्रम्हात्मतत्व ज्ञानहोण्यास योग्यतायेणे एतद्रूप सिद्धीप्रत पावतो॥ ४९॥ ॥

स्वकर्मनिरतः सिद्धिं यथाविंदति तत् शृणु-एणेकरून जे सांगण्याची प्रतिज्ञा केली होती तें सांगून पूर्वोक्त साधनसंपन्न सर्व कर्म सन्याशास ब्रम्हात्मज्ञान होण्यास साधन क्रम सांगण्याची प्रतिज्ञा करतात। हे कौंतेय सिद्धिंप्राप्तः-म्हणजे स्वकर्मानुष्ठानानें ईश्वराचे अराधनानें झालेले ईश्वरप्रसादापासून स्वकर्मत्याग पर्यंत ज्ञानोत्पत्ति योग्यतारूप अंतःकरणशुद्धीप्रत पावलेला। यथाब्रम्ह प्राप्नोति-म्हणजे ज्याप्रकाराने शुद्ध ब्रम्हात्म्याप्रत साक्षात्कारात्मक ज्ञानाने अनुभवितो। तथा समासेन मे निबोध-म्हणजे त्याप्रकाराप्रत त्याचे अनुष्ठान करण्यासाठी संक्षेपाने माझे वाक्यानें निश्चित कर किंवा जाण। तो प्रकार जाणल्यानें काय होतें ते सांगतात। निष्ठा ज्ञानस्य यापरा-म्हणजे जी ज्ञाननिष्ठा प्राप्त झाल्यानंतर दुसऱ्या साधनानुष्ठानाची गरज नाहीं अशी मोक्षास साक्षात् साधनभूत जी। पूर्वोक्त सिद्धीप्रत पावलेल्याची ब्रम्हप्राप्तिरूप वेदांतविचारजन्य उत्कृष्ट ज्ञान निष्ठा तीप्रत ही संक्षेपानें माझे वाक्यानें निश्चयात्मक ज्ञानानें जाण॥ ५०॥ तीच ब्रम्हप्राप्तिरूप ज्ञान निष्ठा प्रकारास्फुट सांगतात।

सिद्धिं प्राप्तो यथा ब्रम्ह तथाप्नोति निबोध मे॥ समासेनैव कौंतेय निष्ठा ज्ञानस्य या परा॥ ५०॥

बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च॥ शब्दादीन् विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च॥ ५१

विशुद्धयायुक्तः-म्हणजे संशयविपर्यय असंभावनादि दोषरहित अशी जी वेदांत विचारजन्य मी ब्रम्हच आहे अशी अंतःकरण वृत्ति रूप बुद्धि तिणे करून युक्त होत्साता। धृत्या आत्मान नियम्य च-म्हणजे धैर्ये करून देहेंद्रिय संघात रूप आत्म्याप्रत विपरीत मार्गाचरणापासून निवारणानें आत्मचिंतनपरायण करून। च शब्दानें योग शास्त्रोक्त चित्तैकाग्र्य साधन संपन्न होऊन। शब्दादीन विषयान् त्यक्त्वा-म्हणजे शब्दस्पर्श रूपरस गंधादिक जे भोग द्वारा प्रतिबंधक विषय त्यांप्रत टाकून म्हणजे शब्दादिक विषयांपासून श्रोत्रादिक इंद्रियास आवरून किंवा फिरवून। रागद्वेषौ व्युदस्य च-म्हणजे शरीरनिर्वाहार्थ अवश्य पाहिजेत अशा विषयाचे ठायी ही लाभानें जो प्रीति आणि लाभ न झाल्यानें जो द्वेष त्यांप्रत टाकून। चकारें करून। याशिवाय ज्ञानास जे प्रतिबंधक असेल त्याचा त्यागक

रून। ब्रम्हभूयाय कल्पते-असा पुढे अन्वय आहे ॥ ५१॥ कोणते साधनाने ब्रम्हभाव रूप मोक्ष प्राप्त होण्यास यो-
ग्य होतो ते सांगतात। जो- विविक्तसेवी-म्हणजे चित्तविक्षेप करणार जनसंमर्द रहित पवित्र जे अरण्य गिरिगुहादि
क त्याचे ठायी वास करण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा। आणि लघ्वाशी-म्हणजे निद्रा आलस्यादिक न यावी यासाठीं प
रिमित आणि हितकारक आणि शुद्ध असें जे आहारादिक ते करण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा। आणि यतवाक्काय
मानस -म्हणजे स्वाधीन आहेत वाणी शरीर मन ज्यास असा यमनियम आसन प्राणायामादिक योगांगानी युक्त। ध्या
न योगपर नित्यं- म्हणजे मंत्रजप तीर्थयात्रा तत्पर नसता निरंतर आत्माकार अंतःकरणवृत्ति प्रवाहरूप ध्यान आणि
अंतःकरणास वृत्तिरहित करणे असा योग तत्पर। वैराग्य समुपाश्रितः-म्हणजे दृष्ट किंवा अदृष्ट विषयाचे ठायीं स्पृहा
होण्यास विरोधी जो अंतःकरण वृत्तिविशेष त्याचा आश्रय केलेला म्हणजे तेणे करून निरंतर युक्त ॥ ५२॥ अहंकारं-म्ह

विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः॥ ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः॥ ५२॥
अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहं॥ विमुच्य निर्ममः शांतो ब्रम्हभूयाय कल्पते॥ ५३॥

णजे मी मोठ्या कुलांत उत्पन्न झालो आहे माझेसारखा दुसरा कोणी नाही असा अभिमान। बलं-म्हणजे असत्य-
क्षाविषयींचा आग्रह। एथें बल शब्दाने शारीर बल घेता येत नाही कारण ते स्वाभाविक आहे यामुळे त्याचा त्याग कर
ण्यास अशक्य आहे। दर्प-म्हणजे धर्माचे अतिक्रमण करण्यास कारणभूत मद। यास प्रमाण-जो हृष्ट आणि दर्प
युक्त आहे तो धर्माचा अतिक्रम करतो अशी स्मृति आहे। काम-म्हणजे विषयाभिलाष। वैराग्यं समुपाश्रितः। एणे क
रून कामत्याग सांगितला आहे तथापि पुनः त्याचा त्याग करावा असे जें सांगीतलें ते काम त्यागाविषयीं मोठा यत्न क
रावा असें सूचविण्या करिता। क्रोधं-म्हणजे द्वेष। परिग्रह-म्हणजे स्वतः निःस्पृह असतां ही दुसऱ्याने दिलेली जी श
रीर धारणोपयोगी उपसाधने ती। यांप्रत। विमुच्य-म्हणजे टाकून। शिखा यज्ञोपवीतादिकांप्रत ही टाकून। शास्त्रो-

क्त दंडकमंडलु कौपीनाच्छादनादिक शरीर निर्वाहमात्रोपयोगी जें आहे त्याचें मात्र ग्रहण करून परमहंस परिव्राजक होऊन ॥ नि-
र्मम-म्हणजे जें देह निर्वाहोपयोगी दंडकमंडलु आदिक त्याचें ठायीं-हीं माझीं अशी ममत्वबुद्धि ज्याची गेली आहे असा अ-
हंकार म्हणजे अहंकार गेल्यामुळें हर्ष विषाद नसून शांत चित्त विक्षेपरहित जो यति तो ज्ञानसाधनाच्या परिपाकानें। ब्रम्ह-
भूयाय कल्पते-म्हणजे ब्रम्हात्मसाक्षात्कार होऊन ब्रम्हस्वरूपानें स्थिति होणें अशा मोक्षप्राप्तीस योग्य होतो॥ ५३॥
त्याविषयीं क्रम सांगतात। ब्रम्हभूतः-म्हणजे श्रवणमननादिकांचे अभ्यासानें मी ब्रम्हच आहें अशा दृढ निश्चयानें युक्त। आ-
णि प्रसन्नात्मा-म्हणजे शमदमादिकांच्या अभ्यासानें शुद्ध चित्त। यांच कारणास्तव-न शोचति न कांक्षति-म्हणजे नष्ट झाले
त्याचा शोक करीत नाहीं आणि प्राप्त न झालें त्याची इच्छा करीत नाहीं। याच कारणास्तव रागद्वेष नसल्यामुळें-सर्वेषु भूते-

ब्रम्हभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति॥ समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते परां॥ ५४॥
भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्वतः॥ ततो मां तत्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरं ॥५५॥

षु समः-म्हणजे आपल्याप्रमाणें सर्वत्र सुखदुःख पाहणारा। याप्रकारचा ज्ञाननिष्ठ। मद्भक्तिं लभते परां-म्हणजे मी जो शु-
द्धात्मस्वरूप परमेश्वर त्याचे ठायीं। जी उत्पन्न झाल्यानंतर दुसरे साधनाची अपेक्षा नसतां ब्रम्हात्मसाक्षात्कारच होतो अ-
शीजी मदाकार चित्तवृत्तिरूप उपासना श्रवणमननफलभूत जीस परिपक्व निदिध्यासन म्हणतात अशा भक्तीप्रत पावतो॥ अ-
थवा-चतुर्विधा भजंते मां-या श्लोकांत सांगितलेल्या चार भक्तींतील शेवटची जी ज्ञाननिष्ठालक्षण भक्ति तीप्रत पावतो॥ ५४
॥ तदनंतर-भक्त्या मां यावान् अस्मि यश्चास्मि तत् तत्वत. ज्ञानाति-म्हणजे निदिध्यासनात्मक अथवा ज्ञाननिष्ठालक्ष-
ण भक्तीकरून मी परमेश्वर विभु नित्य परिपूर्ण सत्यज्ञानानंदघन सर्वदा सर्वोपाधिरहित अखंडैकरस अद्वितीय प्र-
त्यगात्मस्वरूप आहे। असें तत्वतः म्हणजे साक्षात्कारात्मक ज्ञानानें मजप्रत जाणतो। ततः मां तत्वतो ज्ञात्वा म्हणजे याप्रमा-
णें अखंडानंदाद्वितीय ब्रम्ह मीच आहें असें मजप्रत साक्षात्कारात्मक ज्ञानानें जाणून तदनंतर विशते-म्हणजे ज्ञानानें-

अज्ञान आणि त्याचे कार्याची निवृत्ति होऊन बलवत प्रारब्धभोगानें देहपात झाल्या नंतर सर्वोपाधि रहित स्वरूपानें ब्र
म्हरूपच होतो। ज्ञाना नंतर असा अर्थ ज्ञात्वा एथें ल्यप् प्रत्ययानें च होतो यास्तव देहपाता नंतर असा एथें अर्थ आहे।
एणे करून तत्वज्ञान्यास विदेहकैवल्य प्राप्त होण्यास प्रारब्धकर्म फलोपभोगानें जोंपर्यंत देहपात झाला नाहीं तित
काच विलंब आहे देहपात झाल्यानंतर विदेहकैवल्य रूप मोक्षाप्रत पावतो अशा अर्थाच्या श्रुतीचा अर्थ एथे भग
वंतानी सांगीतला। ज्ञान अज्ञानासी विरोधि आहे यास्तव दीपानें जसा तमाचा नाश होतो त्या प्रमाणे ज्ञानानें अज्ञाना-
चा कार्यासह नाश होतो तथापि प्रारब्ध कर्म भोग होऊन देहपात होई तोपर्यंत अज्ञान कार्य देहाहंकारादिक बाधि-
तानुवृत्तीनें राहतो यास दृष्टांत दशमाचे अज्ञानानें मृत झाला असा भ्रम होऊन जे शिरस्ताडन कृतव्रणादिक झाले तें द
शम मी असा आप्ल्याच्या उद्देशानें साक्षात्कारात्मक ज्ञान होऊन दशमाज्ञान नाश झाला तरीं तत्काल शांत होत नाहीं।
पुढें औषधलेपानें हळू हळू शांत होते। किंवा रज्जूचे अज्ञानानें भ्रमांत भास झाला सर्प पाहून जो हृदयांत धडकी बसते दे
हकंप होतो त्याची रज्जूचे साक्षात्कारानें रज्जूचे अज्ञानाची आणि सर्पभ्रांतीची निवृत्ति झाली तरीं तत्काल शांति नहोतां
नंतर कांहीं कालानें होते किंवा तार्किक मतीं उपादान कारणाचा नाश कार्याचे नाशास कारण आहे तो झाल्या नंतर का
र्य नाश होतो ते कार्य उपादान कारणा शिवाय एकक्षणपर्यंत उपादान नाश झाल्यानंतर जसें राहतें यास्तव जोपर्यंत प्रति
बंधक आहे तोपर्यंत विरोधी उत्पन्न झाले तरी नाश होत नाहीं। ज्ञानानें अज्ञान नाश झाला तरी तत्कार्य देहाहंकारा
दिकाचे नाशास प्रारब्ध कर्म प्रतिबंधक आहे असें श्रुतीचे प्रमाण करून आणि अनुभवा करून सिद्ध आहे। मुक्त झाले जातु
क होतो देहपाताचे अंतीं विश्वमायेची निवृत्ति पुनः होते अशा अर्थाच्या श्रुति आणि पूर्वोक्त श्रुति आणि ज्ञान्याचा ज्ञा
नोत्तर तत्काल देह पातन होता कांहीं कालपर्यंत पुढेंही राहतो असा अनुभव सर्व संमत आहे। आणि ज्ञानोत्तर तत्
काल देहपात होण्यास शिष्यसेवकादिकांचे अदृष्टही प्रतिबंधक आहे यास्तव ज्ञानानें झालेला अज्ञान नाश बाधु

वोक्त प्रतिबंधकांचा प्रारब्धकर्म फलोपभोगानें नाश झाला म्हणजे देहांतःकरणादिक जे अज्ञानाचें कार्य त्याचा नाश करि
तो त्यासाठीं पुनः ज्ञानाची अपेक्षा नाहीं। यास प्रमाण – तीर्थे श्वपचगृहे वा नष्टस्मृतिरपि परित्यजन्देहं। ज्ञानसमकालमुक्तः
कैवल्यं याति हतशोकः – तीर्थाचे ठायीं अथवा चंडालगृहाचे ठायीं स्मृति नष्ट झालेला हा देहत्याग करून शोकरहित
होत्साता कैवल्य मोक्षाप्रत पावतो असें वाक्य आहे॥ ५५॥ तो आत्मज्ञ नाहीं आणि अंतःकरण शुद्धी न झाल्यामुळें क
र्मकरण्यासच अधिकारी आहे त्याणें कर्मत्याग करूं नये। जो शुद्धांतःकरण आहे तो कर्मसन्यास करून नैष्कर्म्य सिद्धी
प्रत पावतो असें सांगीतलें। सन्यास करण्यास ब्राम्हणासच अधिकार आहे क्षत्रियवैश्यांस अधिकार नाहीं असें – तृती
याध्यायांत – कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः म्हणंकरून सांगीतलें आहे। असें असतां जो क्षत्रिय शुद्धांतः
करण आहे त्याणें कर्मानुष्ठान करावें किंवा कर्मसन्यास करावा। जर कर्मानुष्ठान करावें तर – आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म

सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः॥ मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययं॥ ५६॥

कारणमुच्यते॥ योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते – म्हणेकरून त्याचें अंतःकरण शुद्धिसाली आहे त्यास कर्मा
नुष्ठानाचा निषेध सांगीतला आहे। जर कर्मसन्यास करावा तर – स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः – म्हणेकरून ब्रा
म्हणाचा जो धर्म सन्यास त्याचा क्षत्रियास निषेध सांगितला आहे। कर्मानुष्ठान किंवा कर्मसंन्यास यांहून तिसरा प्रका
र तर नाहींच। ते क्षांशुद्धांतःकरण क्षत्रियांस दोहों तील एका प्रतिषेधाचें उल्लंघन करणें अगतीस्तव आवश्यक आ
हे। त्यांत कर्मसन्यास ज्ञानास साधन आहे आणि कर्मत्यागानें बंधुवधादिक होणार नाहींत यास्तव तोच श्रेयस्कर अ
पणास आहे। कर्मानुष्ठान चित्तविक्षेपास कारण असल्यामुळें ज्ञानास प्रतिबंधक आहे आणि त्यांत बंधुवधादिक
ही होतील यास्तव ते श्रेयस्कर नाहीं असा अर्जुनाचा अभिप्राय जाणून भगवान् बोलतात। जो कर्मानुष्ठानानें शुद्धांतःकर
ण आहे तो भगवदेकशरणतादि यत्न अनःकरण शुद्धीचें स्वरूप आहे यास्तव भगवदेकशरणच आहे असा जो सन्या

याप्रमाणे वर्णाश्रम धर्मानुष्ठान पूर्वक साधनाच्या फलाचा ब्रह्मविद्येचें निरूपण करून भगवान् त्यासाठीं साध
नभूत भक्तियोग पुनः सांगतात। ज्याकारणास्तव मोक्षास साधन मलाशरण होणें असा मदेकशरण तूं आहेस
धर्मानुष्ठान किंवा संन्यास नाहीं याकारणास्तव क्षत्रिय जाती तूं - चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य - म्हणजे विवेकबु
द्धीनें दृष्टादृष्टार्थ फल साधन भूत सर्व कर्मांचें - यत्करोषि यदश्नासि - या श्लोकांत सांगितले प्रमाणें मी जो ईश्वर-
याचे ठायीं अर्पण करून। मत्परः - म्हणजे मी भगवान् वासुदेवच आहें प्रिय ज्यास असा होत्साता। बुद्धियोगमु-
पाश्रित्य सततं मच्चित्तः भव - म्हणजे कर्माचरणास मोक्षहेतुत्व संपादन करणारा जो - सिद्ध्यसिद्ध्योः समो भू
त्वा - एणें करून सांगीतलेला बुद्धियोग त्याचा आश्रय करून सर्वदा माझेच ठायीं आहे चित्त ज्याचें राज्य किंवा स्त्री
चेतसा सर्वकर्माणि कुर्वाणो मद्व्यपाश्रयः॥ बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव॥ ५७॥
मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात् तरिष्यसि॥ अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि ५८
यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे॥ मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति॥ ५९॥
पुत्रादिकांचे ठायीं नाहीं असा मदेकशरण हो॥ ५७॥ असा हो - मच्चित्तः मदेकशरण झालास म्हणजे - मत्प्र
सादात् सर्वदुर्गाणि तरिष्यसि माझे प्रसादानें कामक्रोधादिक अथवा आध्यात्मिकाधिभूत आधिदैविक जी संसा
रदुःख साधनभूत दुस्तर संकटें त्यापासून तूं आपल्या आयास न करतां तरशील। अथ चेत्त्वं अहंकारात् न श्रोष्य
सि - म्हणजे जर तूं माझे बोलण्यावर विश्वास न करून मी पंडित आहें अशा गर्वानें मी बोलल्या अर्थाचें श्र
वण न करशील म्हणजे अनुष्ठान न करशील आणि आपले इच्छे प्रमाणें मन्मान्य करशील तर। विनंक्ष्यसि - म्ह
णजे आपले पुरुषार्थापासून भ्रष्ट होशील॥ ५८॥ यत् अहंकारं आश्रित्य न योत्स्ये इति मन्यसे - म्हणजे जर
धार्मिक मी क्रूर कर्म करणार नाही अशा मिथ्या अभिमानाचा आश्रय करून मी युद्ध करणार नाहीं असें तूं

मानशील तर। मिथ्या एष. व्यवसाय [illegible] म्हणजे हा युद्ध निश्चय निष्फल होईल। प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति - म्हणजे कार-
ण क्षत्रियजातीय शरीरास उत्पन्न कारण [illegible] त्रिगुणात्मक तुझा स्वभाव युद्ध करण्या विषयीं तुझी प्रेरणा करील ॥ ५९॥
प्रकृतीचेंच व्याख्यान करतात ॥ हे कौंतेय - हे कुंतीपुत्रा अर्जुना। स्वभावजेन स्वेन कर्मणा निबद्धः - म्हणजे तूं क्ष-
त्रिय स्वभावापासून उत्पन्न झालेले शौर्य [illegible] आदिक कर्मानें वश केलेला हे। यत् मोहात् कर्तुं नेच्छसि - म्हणजे बंधुव-
ध होईल यास्तव युद्धादिकापासून [illegible] अविवेकानें [illegible] तसें करीन असा स्वमान करण्यास [illegible] नेच्छसि। अव-
शोपि तत्करिष्यसि - म्हणजे [illegible] तूं कर्म परतंत्र आहेस आणि ईश्वर परतंत्र आहेस यास्तव तें करशी-
लच ॥ ६०॥ स्वभाव परतंत्रता सांगून ईश्वर परतंत्रता सांगतात ॥ हे अर्जुन ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशे तिष्ठति - म्ह-
णजे हे अर्जुना जो पृथिवी आदिकांचे [illegible] पृथिव्यादिकांचा [illegible] पृथिव्यादिक जाणत नाही पृथि-

स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ॥ कर्तुं नेच्छसि यन्मोहात करिष्यस्यवशोपितत् ॥ ६०॥
ईश्वरः सर्व भूतानां हृद्देशेर्जुन तिष्ठति ॥ भ्रामयन सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ ६१ ॥

व्यादिक ज्याचे शरीर आहे अशा अर्थाच्या अंतर्यामि ब्राह्मणांत आणि जें कांहीं हें दृश्य जग पाहण्यांत किंवा ऐकण्यां-
त येतें त्या सर्वांच्या आंत आणि बाहेर व्यापून नारायण स्थित आहे अशा अर्थाच्या नारायणोपनिषदांतील श्रुतींत
आणि सर्व भूतांचे ठायीं एक देव म्हणजे प्रकाशस्वरूप परमात्मा गूढ म्हणजे सूक्ष्म जें अंतर्यामिस्वरूप तेणेंक-
रून राहिलेला आहे तो सर्व जगांत कारणभूत सद्रूपानें व्यापक आहे। आणि तो सर्वभूतांचा अंतरात्मा आणि क-
र्माध्यक्ष म्हणजे सर्व जीवांच्या कर्मांचा प्रवर्तक आणि फल देणारा आणि सर्व भूतांचे ठायीं अंतर्यामि स्वरूपानें
राहत असतां सर्व जीवांच्या शुभाशुभ कर्मांचा केवळ द्रष्टा म्हणजे साक्षी आणि त्या कर्मफलानें किंवा कर्मानें
अलिप्त असंग निर्गुण असा आहे अशा अर्थाच्या श्वेताश्वतरोपनिषदांत सर्वांतर्यामी सर्व प्रेरक सर्वांचें निय-

मन करणारा सर्वशक्ति परमेश्वर सांगितला आहे तो सर्व प्राण्यांच्या हृदय देशाचे ठायीं म्हणजे बुद्धीचे ठायींस्थि
त आहे। सर्वव्यापक असतांही त्यास्थळीं अभिव्यक्त होतो या कारणाकरून हृदय देशाचे ठायीं राहतो असें म्हट
लें। जसा श्रीराम सर्व सप्त द्वीप पृथिवीचा अधिपति असतां ही अयोध्येचे ठायीं त्याचें दर्शन आहे यामुळें त्यास-
अयोध्याधिपति असें लोक म्हणतात त्याप्रमाणें। अर्जुन या संबोधनानें तूं शुद्धांतःकरण आहेस यामुळें अशा परमे
श्वरास जाणण्यास योग्य आहेस असें सूचविलें। ईश्वर सर्व प्राण्यांचे हृदय देशीं काय करीत असतां राहतो तें सांगता
त। मायया भ्रामयन् सर्व भूतानि–म्हणजे परतंत्र सर्व प्राण्यांस आपली शक्तिरूप जी माया तिचे योगानें प्रवृत्ति-
निवृत्तिरूप किंवा विहित प्रतिषिद्ध रूप कर्मांचे ठायीं भ्रमवित असतां म्हणजे प्रवृत्त करवीत असतां राहतो। यास दृष्टां
त सांगतात। यंत्रारूढानीव–म्हणजे जसा मायावी पुरुष सूत्र संचाररूप यंत्रावर बसविलेल्या काष्ठनिर्मित स्त्रीपुरु-
षादिरूप कृत्रिम बाहुल्यांप्रत आपले मायाशक्तीनें नाचवितो त्याप्रमाणें। अथवा देहादि स्वरूप जो पंजर तद्रूप यं
त्रांचे ठायीं जीं आरूढ म्हणजे देहादिक मीच आहें किंवा माझे आहे अशा अभिमानाप्रत धारण करणारीं भूतें म्ह
णजे प्राणी त्यांप्रत शास्त्र विहित किंवा प्रतिषिद्ध कर्मांचे ठायीं प्रवृत्त करीत होत्सातां अंतर्यामी जो मायोपाधिक प-
रमेश्वर तो आपले शक्तिस्वरूप मायेचे योगानें सर्व भूत शब्दानें सांगितलेले जे हृदय स्थित विज्ञानमय स्वरूप
जीव त्यांचे रूपानें विकार पावतो म्हणजे तद्रूप होतो। जर ईश्वरच माया शक्तीनें विज्ञानमय शब्द वाच्य जीवस्वरूपा
नें परिणाम पाऊन विहित प्रतिषिद्ध कर्मांचे ठायीं जीवांस प्रवृत्त करतो तर कोणतेही कर्म करण्याचा जो प्रयत्न जीव
करतात तो व्यर्थ होईल अशी शंका करूं नये। आपले शक्तीनें परमेश्वर जसा विज्ञानमय स्वरूपानें विकार पावतो
त्याप्रमाणें त्यात्या कर्मांचे ठायीं जो पुरुष प्रयत्न होतो तद्रूपानें ही परमेश्वरच मायाशक्तीनें विकार पावतो। असें आ
हे तर ईश्वर सर्व प्राण्यांस त्यात्या कर्मांचे ठायीं प्रवर्तवितो भ्रमवितो असें अंतर्यामि ब्राह्मणादिकांत आणि यांस्मो

कोन आणि — जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः। जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः — केनापि देवेन हृदिस्थितेन यथा नियुक्तोस्मि त
था करोमि — मी धर्माप्रत जाणतों परंतु माझी त्याविषयीं प्रवृत्ति होत नाहीं। मी अधर्माप्रत जाणतों परंतु त्यापासून माझी निवृ
त्ति होत नाहीं। हृदयाचे ठायीं स्थित जो कोणी देव तो जशी माझी प्रेरणा करतो त्याप्रमाणें मी करतों अशा स्मृतींत कर्ता-
भोक्ता असा जो भ्रम झाला आहे तो — सर्व कारणात्मक ईश्वर च आहे कर्तृत्वादिकाविषयीं आपलें स्वातंत्र्य नाहीं आपलें स्व
रूप असंग आहे अशा दृढ बोधानें जावा हें च आहे। आत्मासंगत्व बोधानें मोक्षफल होतें असें च श्रुतिस्मृतींनी सांगि-
तलें आहे यास्तव आत्मासंगत्व ज्ञान सफल आहे यास्तव तें तीवास अवश्य आलें च पाहिजे॥ ६१॥ हे भारत तमेव सर्व
भावेन शरणं गच्छ — म्हणजे हे भरतकुळोत्पन्ना अर्जुना मनानें वाणीनें कर्मानें सर्वात्मना त्या परमेश्वराप्रत च संसारोद्धा
रणासाठीं शरण जा म्हणजे त्याचा च आश्रय कर। तत्प्रसादात् — म्हणजे तत्त्वज्ञानोत्पत्ति पर्यंत जो त्या परमेश्वरा-

तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत॥ तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतं॥ ६२॥

इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया॥ विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु॥ ६३॥

चा प्रसाद म्हणजे अनुग्रह तेणें करून। परां शांतिं शाश्वतं स्थानं च प्राप्स्यसि — म्हणजे कार्यासकट अविद्येची जी
निवृत्ति आणि अद्वितीय स्वप्रकाश परमानंद रूपानें स्थिति होणें असा नित्य मोक्षरूप स्थान प्रत तूं पावशील॥
॥ ६२॥ सर्व गीतार्थाचा उपसंहार करून भगवान। इति ते गुह्यात् गुह्यतरं ज्ञानं मया आख्यातं — म्हणजे या प्रकारा
नें माझा अतिप्रिय जो तूं यास सर्वरहस्यभूत जे मंत्र तंत्र रसायनादिकाहून ही रहस्य असें अथवा कर्मयोग-
कर्मसंन्यासरूप जें रहस्य त्यापेक्षांही त्याचें फलभूत मोक्षसाधन आत्मविषयक ज्ञान सर्वज्ञ परम आप्त जो
मी याणें सांगितलें। एतत् अशेषेण विमृश्य — म्हणजे यास सांगीतलेल्या गीता शास्त्र प्रतिपाद्यार्थाचा साक
ल्यें करून किंवा पूर्वापर सर्व शास्त्रार्थाच्या एकवाक्यतेनें विचार करून। यथेच्छसि तथा कुरु — म्हणजे आ

पलेअधिकाराप्रमाणें जसें करण्यास इच्छितोस तसें कर ॥ ६३ ॥ यागीता शास्त्रांत एथपर्यंत असें सांगितलें कीं मुमुक्षूस मोक्षसाधन ज्ञानोत्पत्ति योग्यता एण्यास प्रतिबंधक पापादिकांचे नाशार्थ फलाभिसंधि परित्याग करून भगवदर्पण बुद्धीनें वर्णाश्रम विहित धर्मानुष्ठान आवश्यक आहे। त्या अनुष्ठानानें अंतःकरण शुद्ध होऊन विविदिषा उत्पन्न झाल्यानंतर ब्राह्मणानें गुरूस शरण जाऊन ज्ञानसाधन वेदांतविचारार्थ सर्वकर्म संन्यास करावा नंतर भगवदेक शरण होऊन ज्ञानसाधन भूत विविक्त देश सेवित्वादिकांचा अभ्यास करावा नंतर वेदांतश्रवणादिक करावें म्हणजे त्यापासून ब्रह्मात्म साक्षात्कार होऊन सर्वानर्थ कारण अज्ञानाच्या कार्यासह नाशानें मोक्ष होतो संन्यासानधिकारि मुमुक्षु क्षत्रियादि अंतःकरण शुद्धी झाल्यानंतर ही भगवदाज्ञा पालन करण्या साठीं किंवा लोकसंग्रहा साठीं भगवदेक शरण होऊन कर्में करावीं म्हणजे त्यास पूर्वजन्म कृत संन्यासपरि

सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः ॥ इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितं ॥ ६४ ॥

पाकानें किंवा हिरण्यगर्भास मन्यासावांचून भगवत्प्रसादेंकरून जसें ज्ञान उत्पन्न झालें त्याप्रमाणें ज्ञान उत्पन्न होऊन अथवा पुढील जन्मीं ब्राह्मण जन्म होऊन संन्यासपूर्वक ज्ञान उत्पन्न होऊन मोक्ष होतो इतका शास्त्रार्थ सांगीतला। या अतिगंभीर शास्त्रार्थाचें साकल्यें करून पर्यालोचन करण्यास बहुत क्लेश आहे तो नव्हावा या साठीं कृपाळु भगवान स्वतांच आपण गीता शास्त्रार्थांचा सारांश सांगतात। सर्वगुह्यतमं मे परमं वचः भूयः शृणु-म्हणजे पूर्वीं गुह्य जो कर्मयोग सांगितला त्यापेक्षांही गुह्य ज्ञान सांगितलें। आतां कर्मयोग आणि तत्फलभूत ज्ञानापेक्षां ही फार गुह्य पूर्वीं सांगितलें तें ही तुझेवर अनुग्रह करण्यासाठीं मी पुनः सांगतों त्या उत्कृष्ट माझ्या वाक्य एक। मी तुला सांगतों तें आपले लाभासाठीं किंवा पूजेसाठीं किंवा ख्यातीसाठीं सांगतों असें नाहीं तर-इष्टोऽसि मे दृढमिति-म्हणजे तूं मला फार प्रिय आहेस या कारणास्तव तूं प्रश्न केला नाहींस तथापि। ततः ते हितं व-

ष्यामि - म्हणजे तुझे श्रेयस्कर वाक्य सांगतो. अथवा मीच तुझे हित सांगतो. तें सर्व प्रमाणानें दृढ आहे। कोणी - दृढमति असा पाठ करून तुझा माझे ठायीं दृढनिश्चय आहे म्हणून तुझें हित मी बोलतों असा अर्थ करतात ॥ ६४॥ तेंच सांगतात। मन्मना भव - म्हणजे मी जो वासुदेव त्याचे ठायींच आहे मन ज्याचें असा तूं हो म्हणजे सर्वदा माझेंच चिंतन कर। कंस शिशुपाळांचें ही मन द्वेषानें तुझे ठायीं होतें तसें असावें की काय असें म्हणाल तर सांगतात। मद्भक्त - म्हणजे माझे ठायीं प्रेमानें अनुरक्त हो। प्रेमानें माझे ठायीं सर्वदा चिंतन कर। तुझे विषयीं अनुराग कसा होईल असें म्हणाल तर त्याचें साधन सांगतात। मद्याजी भव - म्हणजे माझें पूजन करणें म्हणून जे पूजनादिक करण्याचा स्वभाव ज्याचा आहे तसा सर्वदा मत्पूजातत्पर हो। जर पूजासामग्री न सांपडेल तर - मां नमस्कुरु - म्हणजे कायानें मनानें वाणीनें नम्र भावानें माझे नमस्कार रूप आराधन कर। हें अर्चन आणि वंदन - श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम्। अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेद-

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ॥ मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥ ६५॥**

नं। इति पुंसार्पिता विष्णौ भक्तिश्चेन्नवलक्षणा। क्रियते भगवत्यद्धा तन्मन्येऽधीतमुत्तमं। या श्लोकरूप श्रीमद्भागवतांत सांगितलेल्या श्रवणकीर्तनादिक भागवतधर्माचें उपलक्षण आहे। हीनवविध भक्ति विष्णूचे ठायीं पुरुष करील तर तें उत्तम अध्ययन असें मानितों असा याचा अर्थ आहे। मामेवैष्यसि - म्हणजे याप्रमाणें सर्वदा भागवतधर्मानुष्ठानानें माझे ठायीं अनुराग उत्पन्न होऊन मन्मना होशील तर मी जो भगवान वासुदेव त्याप्रत च वेदांतवाक्यविचारापासून अस्मदात्मैक्य बोध होऊन येशील म्हणजे मद्रूपच होशील। याविषयीं संशय करूं नको। प्रतिजाने प्रियोऽसि - म्हणजे याविषयीं मी सत्य प्रतिज्ञा तुझे जवळ करतों कारण तूं माझा प्रिय आहेस। प्रियापाशीं प्रतारणा वंचना करणें योग्य नाहीं। अथवा - सत्यं ते - म्हणजे सति - अंते - असा पदच्छेद करून प्रारब्धकर्माचा भोगानें नाश झाला म्हणजे मजप्रतच येशील॥ ६५॥ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥ छ ॥श्रीनारायणार्पणमस्तु॥ छ ॥

यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततं । स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः - एणें करून जें पूर्वी सांगीतलें त्याचें व्याख्यान केलें ॥ आतां - ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति । तमेव शरणं गच्छ असें जें सांगीतलें त्याचें व्याख्यान करतात । सर्वधर्मान् परित्यज्य - म्हणजे वर्णधर्म आश्रमधर्म साधारणधर्म असे जे पूर्वोक्त विद्यमान किंवा अविद्यमान सर्वधर्म त्यांपासून दूर करून म्हणजे हे मज तारतील यांचे आश्रयानें मी तरेन अशा बुद्धीचा त्याग करून । मां एकं शरणं व्रज - म्हणजे अद्वितीय सर्व धर्मांचा प्रवर्तक आणि फलदाता असा जो मी परमेश्वर वासुदेव त्या प्रत शरण जा म्हणजे धर्म असोन किंवा नसोन दुसऱ्याची अपेक्षा करणाऱ्या पासून काय व्हावयाचें आहे दुसऱ्याची अपेक्षा न करणारा जो भगवत्स्वरूप त्यालाच शरण जाऊन मी कृतार्थ होईन अशा दृढनिश्चयानें परमानंद घनमूर्ति अनंत जो वासुदेव श्रीभगवान् त्याचेंच क्षणोक्षणी भजन कर । किंवा हा भगवान वासुदेवच परमतत्त्व आहे याहून दुसरें अधिक नाहीं असें विचारपूर्वक प्रेमाचे आधिक्यानें अनन्य कर।

**सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ॥ अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ६६ ॥**

त्वं चिंता रहित जी अविच्छिन्न मनोवृत्ति तीणेकरून चिंतन कर । एथें एका मलाच शरण जा असें सांगीतल्यानेंच सर्व धर्मांच्या पूर्वोक्त त्यागाचा लाभ झाला असतां सर्वधर्मांचा त्याग करून असें जें अनुवादानें सांगीतलें तें सर्व धर्मांचे अनुष्ठानानें जें फल व्हावयाचें तें भगवंतास शरण जाण्यानें होतें असें स्पष्ट करण्यासाठीं सांगीतलें । यावरून सर्व धर्मानें जें फल व्हावयाचें तें मज पासून प्राप्त होतें या स्तव मला जो शरण आला त्यास धर्माचरणाची अपेक्षा नाहीं असें सिद्ध केलें । एथील धर्मपद अधर्मांचें किंवा कर्मसामान्याचें उपलक्षण करून सर्व कर्मपरित्याग करून सर्वात्मा सर्वभूतस्थ सम जो मी एक त्या प्रत शरण जा मज वांचून दुसरें कोणीं नाहीं असा निश्चय कर एथें नैष्कर्म्यच विवक्षित आहे असा अर्थ भाष्यकार करतात । ही व्याख्या उत्तम नाहीं कारण एथें कर्मत्याग विवक्षित नाहीं । कर्मानुष्ठान करित असतां ही त्याविषयीं आदर नसून ब्रह्मचारी गृहस्थ वानप्रस्थ अन्य ही यांस सर्वांनी भगवंताला शरण जावें इतकेंच विवक्षित आहे।

स्वधर्माविषयीं सर्वांचा आदर आहे तो जाऊन भगवंताचें कार्य आदर होण्यासाठीं हें वचन सफल आहे। अधर्म तर अनर्थास कारण आहे त्यामुळें त्याविषयीं आदर कोणास वाटत नाहीं असें असून त्याचा आदर करूं नये असें जर सांगीतलें तर हें वचन निष्फळ होईल। आणि अधर्माचा परित्याग करावा हें दुसऱ्या शास्त्रांतील वचनानें सिद्धच आहे त्याविषयीं एथें विधीचें प्रयोजन नाहीं। वर्णाश्रम धर्मास स्वर्गादिक साधनरूप अभ्युदयाचें हेतुत्व असें आहे तसें मोक्षहेतुत्वही आहे अशी शंका होईल तिचें निराकरण करण्यासाठीं हें वचन असें म्हणावें। सन्यासविधायक शास्त्रानें आणि अधर्मनिषेधशास्त्रानेंच सर्व कर्मत्याग किंवा धर्माधर्मत्याग सिद्ध आहे यामुळें त्याविषयीं एथें अपूर्वविधीचें प्रयोजन नाहीं। सन्यास शास्त्राचा एथें उपदेश केला असें संभवत नाहीं। एथें भगवदेक शरणता विषयींचा विधि विवक्षित आहे कारण सर्वधर्मपरित्याग करून भगवंतास शरण जा असा उपदेश करून गीताशास्त्रार्थाची समाप्तिच केली। आणि भगवदेकशरणतेशिवाय सन्यासास सफलत्व नाहीं आणि सन्यासानधिकारी जो अर्जुन त्यास सन्यासाच्या उपदेशाचें प्रयोजनही नाहीं। अर्जुन पुढें करून त्याचे निमित्तानें सन्यासाधिकाऱ्यास हा उपदेश असें म्हणावें तर तझें हित सांगतो सर्वपापापासून तुला मुक्त करीन तूं शोक करूं नको असा उपक्रम उपसंहार अर्जुनाविषयींचे संभवणार नाहीत यास्तव सन्यासधर्माचे ठायीं ही अनादर करून भगवदेकशरण व्हावें अशा विधी विषयींच एथें भगवंताचें तात्पर्य आहे या कारणानें प्रथम व्याख्याच उत्तम असें कोणी व्याख्याकार म्हणतात। यांचा अभिप्राय असा आहे - या गीताशास्त्रांत साधन आणि फलभूत कर्मनिष्ठा ज्ञाननिष्ठा भगवद्भक्तिनिष्ठा अशा तीन निष्ठा विवक्षित आहेत। त्यांतील सर्वकर्मसन्यासपर्यंत कर्मनिष्ठेचा उपसंव्हार - स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः - एणें करून केला। संन्यासपूर्वक वेदांत श्रवणादि परिपाक सहित ज्ञाननिष्ठेचा उपसंव्हार - ततो मां तत्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरं। एणें करून केला। भगवद्भक्तिनिष्ठा पूर्वोक्त दोन्ही निष्ठेस साधनभूत आहे आणि त्या दोहो निष्ठेची फलभूत म्हण

जे त्यापासून होणारी आहे निष्ठा उपसंव्हार - सर्वधर्मान परित्यज्य मामेकं शरणं व्रज - या श्लोकांत केला। भाष्यकाराचा अभि-
प्राय असा आहे कीं - मन्मना भव मद्भक्तः - या श्लोकानें भगवंताचे सत्यप्रतिज्ञत्व जाणून भगवद्भक्तीचें फल मोक्ष आहे असा निश्च-
य करून भगवदेक शरण हो असे सांगी तलें यावरून सर्व कर्म योग निष्ठेचे रहस्य जें भगवत्शरणता रूप भगवद्भक्ति निष्ठा ति-
चा उपसंव्हार करून तत्फलभूत वेदांत विहित ज्ञान सांगण्यासाठीं ज्ञाननिष्ठेचा उपसंव्हार शास्त्रांतरसिद्ध सर्व कर्म सन्यासाचा अ-
नुवाद करून एथें या श्लोकानें केला। तुसें हित सांगतों सर्वपापापासून तुला मुक्त करीन तूं शोक करूं नको इत्यादिक संवाद प्रस्ता-
वनेंत लिहिल्या प्रमाणें उपनिषदांतील जनक याज्ञवल्क्यादिकांचे संवाद प्रमाणें विद्यास्तुत्यर्थ आहे असे हे मत भेद या श्लो-
काचे व्याख्ये विषयी चे दाखविले आहेत यांतून निर्मत्सर बुद्धीनें विचार करून जो चांगला वाटेल त्या अर्थाचा स्वीकार
पंडितानीं करावा। मत भेदानें त्या त्या श्लोकांत उपसंव्हार करून सांगितलेली भगवदेक शरणता स्वरूप भगवद्भक्तिनिष्ठा
- त्या भगवंताचाच मी आहे - तो भगवान माझाच आहे - तो भगवान् मीच आहें - अशा तीन प्रकारच्या भावना भेदानें क्रमें क-
रून मृदु मध्य अति मात्र अशी तीन प्रकारची आहे। पूर्व पूर्व भावनेच्या अभ्यास परिपाकानें उत्तरोत्तर भावना रूप भगव-
द्भक्ति निष्ठा प्राप्त होते। त्या त्रिविध भगवद्भक्ति निष्ठेचीं उदाहरणे संक्षेपानें एथें लिहितो। सत्यपि भेदापगमे नाथ तवा-
हं न मामकीनस्त्वं। सामुद्रो हि तरंगः क्वचन समुद्रो हि तारंगः - हे नाथ भगवन् तुझे आणि माझे स्वरूपाशी भेद नसला त-
री मीं तुझा आहे तूं माझा नव्हेस जसा तरंग समुद्राचा आहे रंतु समुद्र तरंगाचा नाहीं अशी भावना मृदु भगवन्निष्ठा
। हस्तमुत्क्षिप्य यातोसि बलात्कृष्ण किमद्भुतं। हृदयाद्यदि निर्यासि पौरुषं गणयामि ते - हे कृष्णा हातास झटका-
देऊन बलानें गेलास यात अद्भुत म्हणजे आश्चर्य ते काय। तूं माझाच म्हणोन मी तुला हृदयांत ठेवला आहे तो तूं जर
माझे हृदयापासून जाशील तर तू पराक्रमी असें मानीन। हे मध्यम भगवद्भक्ति निष्ठेचे उदाहरण। सकलमिदमहं च वासु-
देवः परमपुमान् परमेश्वरः स एकः। इति मतिरचला भवत्यनंते हृदयगते व्रजतान् विहाय दूरात् - हे सर्व जग वासुदेव

च आहे परम पुरुष अद्वितीय परमेश्वर वासुदेव तो मीच आहें अशी त्यांची सर्वांतर्यामी अनंताचे ठायी बुद्धि झाली आहे त्यांप्रत दा कून त्वं दूर जा असें यमाचे आपले दूतांस भाषण आहे। हे अतिमात्र भगवत भक्ति निष्ठेचें उदाहरण आहे अहंत्वां सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि - सर्व धर्मांचा अनादर करून किंवा सर्व कर्मांचा त्याग करून तूं एकदेक शरण आलास म्हणजे बंधुवधादि निमित्तक संसार हेतुभूत सर्व पापापासून मी तुला प्रायश्चित्ता वांचून ही मुक्त करीन - माशुचः - युद्धाविषयीं मी प्रवृत्त झालों तर बंधुवध निमित्तक प्रत्यवायापासून माझा निस्तार कसा होईल असा तूं शोक करूं नको धर्मापासून पापाचा नाश होतो असें श्रुतींत सांगितलें आहे मी परमेश्वर धर्म रूपच आहें असें ही श्रुति स्मृतींत सांगितलें आहे। अथवा मला तूं स्वात्मत्वें करून जाणलें म्हणजे मी आपला स्वात्म भाव प्रकाशित करून ज्ञान दीपानें अज्ञान मूलक सर्व धर्माधर्मरूप तमाचा नाश करून तुला मुक्त करीन ॥ ६६॥ गीता शास्त्रार्थ समाप्त झाला आतां शास्त्र संप्रदाय विधि सांगतात। इदंते अतपस्काय -

इदंते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ॥ नचाशुश्रूषवे वाच्यं नचमां योभ्यसूयति ॥ ६७॥

म्हणजे सर्व संसाराचे नाश करणारें तुला सांगितलें जें हें गीता शास्त्रार्थाचें तत्त्व त्याचें इंद्रिय जय नाहीं असा जो अतपस्क किंवा तप म्हणजे आलोचन तें न करणारा किंवा या शास्त्रार्थाचे अनुष्ठाना विषयीं यत्न न करणारा जो त्यास तूं सांगूं नये आणि तपस्वी आहे परंतु त्याची गुरूचे ठायीं आणि देवाचे ठायीं भक्ति नाहीं त्यास सांगूं नये आणि - नचाशुश्रूषवे - म्हणजे भक्तिमान असून ही जो गुरूची देवाची शुश्रूषा म्हणजे पूजा करीत नाहीं किंवा गुरूनें सांगितलेल्याचे अनुष्ठान करीत नाहीं त्यास सांगूं नये। नचमां योभ्यसूयति - म्हणजे मी जो वासुदेव त्या मज हा मनुष्य असर्वज्ञ आहे असें मानून मी आपली प्रशंसा करतो असा माझे ठायीं दोषारोप करून माझे ठायीं ईश्वरत्व न जाणून हास्य करतो किंवा माझे ठायीं ईश्वरत्वाचें सहन करून माझा द्वेष करतो असा जो माझा उत्कर्ष न सहन करणारा तपस्वी भक्त शुश्रूषु जरी आहे तथापि त्यास कदापि सांगूं नये अर्थात जो तपस्वी भक्त शुश्रूषु कृष्णानुरक्त आहे त्यास सांगावें असें सिद्ध होतें। एक एक विशे

षणानें ही जोरदिन आहे तो हें रहस्य सांगण्यास अयोग्य आहे असे स्पष्टविण्या करितां चार नकाराचा प्रयोग श्लोकांत केला यावरून हें रहस्य आससांगावयाचें आहे त्यास अधिकार येण्यास तपगुरुभक्ति शुश्रूषा भगवदनुरक्ति अवश्य पाहिजे व तप किंवा मेधा यांचा मात्र विकल्प आहे असे भाष्यकार मत आहे॥ ६७॥ याप्रमाणे संप्रदाय विधि सांगून – त्याचें अनुष्ठान करणारास फल सांगतात। यः इमं परमं गुह्यं मद्भक्तेषु अभिधास्यति – म्हणजे जो संप्रदाय प्रवर्तक – परमपुरुषार्थ साधनत्वात्तव सर्वत्र प्रकाशित करण्यास अयोग्य अशा या कृष्णार्जुन संवादरूप ग्रंथा प्रत माझेठायी अनुरक्त जे माझे वासुदेवाचे भक्त, त्याचेठायी ग्रंथस्वरूपानें किंवा अर्थस्वरूपानें स्थापन करील। कसें स्थापन करावें ते सांगतात। भक्तिं मयि परां कृत्वा – म्हणजे हीन ग्रंथ किंवा तदर्थ स्थापनरूप परमगुरु जो परमेश्वर त्याची शुश्रूषा वमी करतो –

**य इमं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति॥ भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः॥ ६८॥**

**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः॥ भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि॥ ६९॥**

असा दृढ निश्चय करून स्थापन करील। मामेव एष्यति असंशय – म्हणजे तो तो मी वासुदेव याची भक्ति त्या समाप्त होऊन मजप्रत लवकर येईल म्हणजे मुक्त होऊन मद्रूपच होईल याविषयीं संशय नाहीं। येथे – मद्भक्तेषु – असें पुनः भक्तीचें ग्रहण केलें यावरून पूर्वोक्त तपआदिक नानविशेषणें नसली तरी त्यास भक्ति आहे तो हे गीता शास्त्राचें रहस्य सांगण्यास अधिकारी आहे असे स्पष्ट केले॥ ६८॥ तस्मात् मनुष्येषु कश्चित् मे प्रियकृत्तमः – म्हणजे माझे भक्ताचेठायी या गीता शास्त्राची प्रवृत्ति करणाऱ्या पेक्षां दुसरा मनुष्याचेठायी माझे फार प्रिय करणारा नाहीं। न च भविता – म्हणजे पुढें ही होणार नाहीं। तस्मात् – अन्यः प्रियतरः – म्हणजे पूर्वीं ही त्याहून दुसरा फार मला प्रिय कोणी झाला नाहीं। अथवा मद्विषयीं अतिशयित प्रीति ज्याची आहे असा कोणी सांप्रत नाही पुढें ही होणार नाही पूर्वीं ही झाला नाही॥ ६९॥ श्रीकृष्णार्पण॥

अध्यापकाचें फल सांगून या गीताशास्त्राचें अध्ययन करणारास फल सांगतात. य आवयोः इमं धर्म्यं संवादं अध्येष्यते
-म्हणजे जो तूं अर्जुन आणि मी कृष्ण यांचा धर्मास उत्पन्न करणारा किंवा धर्मविरुद्ध किंवा धर्मरूप जो हा संवाद यांचें ज
परूपानें अध्ययन करील म्हणजे पठन करील तेन ज्ञानयज्ञेन अहं इष्टः स्यां इति मे मतिः-म्हणजे त्याणें चतुर्थाध्याया
त सांगितलेला जो द्रव्ययज्ञादिकापेक्षा श्रेष्ठ ज्ञानयज्ञ तेणें करून माझें सर्वेश्वराचें यजन केलें किंवा पूजन केलें असा मा
झा निश्चय आहे। जरी केवल पठन करणारा गीतार्थ न जाणून जपरूप पठन करीत नसला तथापि तें एकून मांझें हा स्तवन करतो
अशी बुद्धि मला उत्पन्न होऊन मी त्याजवळ उभा राहतो जसा लोकांत एखादें कोणी कोणाचें नाव घेऊन हाक मारिली त
र ऐकणारास हा मला च हाक मारतो अशी बुद्धि होऊन हा काय म्हणतो तें ऐकावयास तो त्याजवळ येऊन उभा राहतो त्याप्र

अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः॥ ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः॥ ७०॥ ॥

श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः॥ सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणां॥ ७१॥

माणें यास्तव केवल याचें जपमात्रानें हा अंतःकरण शुद्ध होऊन ज्ञानें त्याचा द्वारा ज्ञानयज्ञाचें जें मोक्षरूप फल तें प्राप्त
होतें मग अर्थानुसंधानपूर्वक पाठ करणारा स नर तत्कालीच साक्षात् ज्ञानानें मोक्ष होतो हें काय सांगावयाचें आहे। माझा
निश्चय आहे असें सांगीतल्यानें हा अर्थवाद नव्हे फलविधीच आहे असें जाणावें॥ ७०॥ आतां या गीताशास्त्राचें श्र
वण करणाऱ्यास फल सांगतात। श्रद्धावान् अनसूयश्च यः नरः शृणुयादपि-म्हणजे दुसरा मोठ्यानें गर्जत यागीताशा
स्त्राचें पठन करित असतां श्रद्धे करून युक्त होत्साता आणि हा मोठ्या स्वरानें किमर्थ पठन करतो हें किंवा अबद्ध कां प
ठन करतो अशा दोष दृष्टीनें रहित जो मनुष्य या गीताशास्त्राचें केवल श्रवण हि करील। सोऽपि मुक्तः पुण्यकर्मणां शुभा
न् लोकान् प्राप्नुयात्-म्हणजे केवल अक्षर मात्रांचें श्रवण करणारा हि तो सर्व पापापासून मुक्त होत्साता अश्वमेधादि

क शुभ कर्म करणाऱ्यास जे प्राप्त व्हावयाचे पुण्यलोक त्यांप्रत पावेल। अपिशब्दानें अर्थ जाणणारा शुभलोकाप्रत पावेल म्हणून काय सांगावयाचें आहे असें सूचविलें॥७१॥ शिष्यास ज्ञान होई तों पावेतों कारुणिक गुरूनें ज्ञान सांगण्याचा प्रयास करावा हें सूचविण्यास्तव सर्वज्ञही भगवान अर्जुनास पुसतात। हे पार्थ त्वया एतत् एकाग्रेण चेतसा श्रुतं–म्हणजे हे अर्जुना मी सांगितलेलें हें गीताशास्त्र तूं एकाग्र मनानें अर्थनिश्चयपूर्वक श्रवण केलेंस काय। हे धनंजय ते अज्ञान संमोहः नष्टः कच्चित्–म्हणजे हे धनंजया अर्जुना अज्ञानानें झालेला जो भ्रम तो तुझा या गीताशास्त्रार्थाचे ज्ञानानें गेला काय। जर भ्रम गेला नसेल तर पुनः उपदेश करीन असा भाव॥७२॥ असें भगवद्वाक्य ऐकून कृतार्थ झालेला अर्जुन पुनः उपदेशाची अपेक्षा नाहीं असे बोलतो। हे अच्युत त्वत्प्रसादात् मोहः नष्टः स्मृतिः लब्धा–म्हणजे हे अच्युत स्वरूपा कृष्णा अज्ञानापासू-

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा॥ कच्चिदज्ञान संमोहः प्रणष्टस्ते**

**धनंजय॥७२॥ अर्जुन उवाच॥ नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्म-**

**याच्युत॥ स्थितोस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव॥७३॥ श्रीकृष्णार्प॰॥**

न झालेला विपरीत ज्ञानात्मक माझा मोह नष्ट झाला॥ मोहनाश कशाने झाला तो सांगतो। तुझ्या प्रसादें करून तुझ्या उपदेशापासून मला नि:संशय आत्मज्ञान प्राप्त झालें। अच्युत या संबोधनानें तुझ्या आत्मत्वें करून निश्चय झाल्यानें तुझा वियोग नाहीं तुझें आत्मरूपानें सर्वदा स्मरणच आतां आहे असें सूचविलें। यास्तव–गत संदेहः स्थितोस्मि–म्हणजे सर्व संशय ज्याचे गेले आहेत असा मी पुढें कर्तव्यता रूप तुझे आज्ञेचे ठायीं स्थित आहें। आणि करिष्ये वचनं तव–म्हणजे यावज्जीवनपर्यंत परमगुरु जो भगवान वासुदेव त्याचें वचन करीन तुझे आज्ञेचें परिपालन करीन। एणेकरून गुरुआज्ञेचें परिपालन शिष्यास आवश्यक आहे असें सूचविलें आणि केलेल्या प्रयासाचें साफल्य झालें असा भगवंताचा अर्जुनानें संतोष केला। एणेकरून गीताशास्त्राचें अध्ययन करणाऱ्यास भगवत्प्रसादानें मोक्षपर्यंत ज्ञानलाभ

अनद्रूप होतो असा या शास्त्राचे फला-चा उपसंहार करतो ॥ ७३ ॥ गीतार्थ समाप्त झाला आता कथासंबंधाचे अनुसंधाना ने संजय धृतराष्ट्राप्रत बोलतो। इति अहं महात्मनः ... वासुदेवस्य पार्थस्य च - म्हणजे याप्रमाणे मी महात्मा जो वासुदेव आणि अर्जुन यांच्या। अद्भुत रोमहर्षण इमं संवाद अश्रौष - म्हणजे लोकामध्ये असंभाव्य आहे यामुळे मनाला विस्मय करणारा- आणि शरीरावर रोमांच उभे करणारा असा जो हा संवाद याप्रत ऐकता झालो ॥ ७४ ॥ तू दूर असता कसा संवाद ऐकलास अ शा शंकेचे निराकरणार्थ बोलतो ॥ व्यासप्रसादात् - म्हणजे व्यासांनी मला दिलेले जे चक्षु आणि दिव्य श्रोत्र त्यांहीकरून तद्व रचेंही मी पाहत होतो आणि ऐकत होतो एतद्रूप व्यासप्रसादाने। एतत् परं गुह्यं श्रुतवान् - म्हणजे अत्यंत गुह्य असा या गीता शास्त्राप्रत मीं ऐकलें। ते गीता शास्त्र कसे ते सांगतो। योग - म्हणजे योग प्राप्त होण्यास अव्यभिचारि कारण कृष्णा

संजय उवाच ॥ इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ॥ संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणं ॥ ७४ ॥ व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परं ॥ योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयं ॥ ७५ ॥ राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतं ॥ केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ १६

र्जुन संवाद रूप अशा शास्त्राप्रत। स्वयं योगेश्वरात् कृष्णात् साक्षात् कथयतः - श्रुत - म्हणजे आपले परमेश्वर स्वरूपानें क थन करणारा जो श्रीकृष्ण त्यापासून मी साक्षात् श्रवण केलें परंपरेनें केलें नाहीं। एणें करून भगवंताने ब्रह्मदेवास सकल शास्त्राचा उपदेश स्वमुखाने केला त्याचें श्रवण ब्रह्मदेवाने साक्षात्केलें तद्द्वारा परंपरेनें दुसऱ्यांनी केलें त्याप्रमाणे मी या शास्त्राचे मी साक्षात् भगवंताचे मुखापासून श्रवण केलें मी मोठा ब्रह्मदेवाप्रमाणे भाग्यवान् आहें असें आपलें अभिनंद न संजयानें केलें ॥ ७५ ॥ हे राजन् - हे राजा धृतराष्ट्रा। अद्भुत पुण्य केशवार्जुनयोः इमं संवाद - म्हणजे लोकांमध्ये आणि श्रव णे करून पुण्य करणारा पाप नाश करणारा जो केशवार्जुनाचा हा संवाद याचें। संस्मृत्य संस्मृत्य मुहुः मुहुः हृष्यामि च - म्हण जे वारंवार स्मरण करून मी हर्षाप्रत पावतो। हे किंवा रोमांचित शरीर होतें असा हि रुक्तीनें फार आदर सुचविला ॥ ७६ ॥

ॐविश्वरूप अर्जुना कारणीं भगवंतानें आचार्य द्वारवाटिनें त्यानें स्मरण करून बोलतो ॥ तच्च हरेः अत्यद्भुतं हरेः रूपं संस्मृत्य
संस्मृत्य – म्हणजे हरीनें अर्जुनाला जें दाखविलें अति अद्भुत विश्वरूप त्याचें स्मरण करून स्मरण करून। महाराज मे विस्मय भ
वति पुनः पुनः हृष्यामि च – म्हणजे हे महाराजा धृतराष्ट्रा मला मोठा विस्मय होतो आणि वारंवार हर्ष होतो ॥ ७७ ॥ याप्रमाणें आ
पलें पुत्राचे विजयाची आशा दूर करून को असें सांगतो। यत्र योगेश्वरः कृष्णः – म्हणजे ज्या युधिष्ठिराच्या पक्षाचे ठायीं सर्वयो
गसिद्धींचा ईश्वर सर्वज्ञ सर्वशक्ति भक्तदुःखाचा नाश करणारा श्रीकृष्ण स्थित आहे। यत्र पार्थः धनुर्धरः – म्हणजे आ
णि ज्या धर्मराजाचे पक्षाचे ठायीं गांडीव धनुष्याचें धारण करणारा नर अर्जुन स्थित आहे। तत्र श्रीः विजयः लक्ष्मीः – म्हणजे
तेथें म्हणजे वर सारा पणाची अधिष्ठिलेल्या त्या धर्मराजाच्या पक्षाचे ठायीं राज्यलक्ष्मी शत्रुपराजयानें होणार। उत्कर्ष

तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः॥ विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः॥ ७७॥ यत्र यो
गेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः॥ तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम॥ ७८॥ इति श्रीमद्भगव
द्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे मोक्षसंन्यास॰ अष्टाद॰ स॰॥१८

रूप विजय उत्तरोत्तर अभिवृद्धिप्रत पावणारा। राज्यलक्ष्मीरूप भूति – ध्रुवा – म्हणजे अवश्य होणारा। याचा सर्वत्र श्री आ
दिकाचे ठायीं अन्वय आहे। आणि नीतिः – न्याय ही अवश्य होणार आहे। मतिर्मम – या प्रमाणें माझा निश्चय आहे। या
स्तव व्यर्थ पुत्र जयाची प्रत टाकून भगवद्रूपक युक्त झाल्यामुळे लक्ष्म्यादिकांनीं युक्त होणार पांडवाबरोबर संधि
करावा हें योग्य आहे असें तात्पर्य ॥ ७८ ॥ गीताशास्त्रस्य गूढार्थप्रकाशार्थं मया कृतः॥ भाषाविवृतिदीपोयं मज्ञानां हृदिमन्दि
नः॥ श्रीकृष्णायोर्पितो भक्त्या मीराजक्रमुरुत्सरं ॥ अनेन प्रीयतां देवो श्रीपतिः श्रीपतिः स्वयम्॥ मीमांसा न्यायपंचास्य सघन
चर्य सूरिणां॥ शिष्य स्वैपाकनिर्भूयान रघुनाथस्य सन्मुदे॥ इति श्रीमद्भगवद्गीतायाः रघुनाथशास्त्रिकृत भाषाविवृतौ
अष्टादशोध्यायः समाप्तः॥ शुभंभवतु॥ ॥श्रीकृष्णप्रसादात् भवभयोत्तारणमस्तु॥ ॐ ॥

इति १७८२ सोननाम संवत्सरे फाल्गुन मासे कृष्ण पक्षे षष्ठ्यांतिथौ सोमवासरे तद्दिने हे पुस्तक समाप्त ॥

# अध्यायाची अनुक्रमणिका.



हा ग्रंथ पुणें येथें बाळकृष्ण रामचंद्र शास्त्री ठकार यांचे छापखान्यांत छापिला ॥ आवृत्ति प्रथम किंमत

इति श्री भाषाविवृतिसहित गीता समाप्त ॥